# समर्पण

माझे प्रियतम बालमित्र
सुप्रसिद्ध काँ. समाजवादी नेते
**भाई एस्. एम्. जोशी**
यांना प्रेमपूर्वक समर्पण.

—गोपीनाथ

" कोठें घरीं वनीं वा
दर्यावरीं रणीं वा
सान्निध्य गाढ तूझें
जीवास या पटावें."

# भूमिका

गेली १२-१३ वर्षे 'आनंदा'च्या पुरवणींतून मी राजकारणावर लिहीत आहे. मधुकर वृत्तीनें ज्ञान मिळवावयाचें आणि सुबोध भाषेनें तें दुसऱ्यांना द्यायचें या "वासुदेव-गोविंद" परंपरेचा नम्र वारस म्हणून मी केलेलें कार्य जनतेच्या चरणीं रुजू आहे. रा. ब. सरदेसाई, प्रो. कृ. पां. कुलकर्णी इ० नागर ज्ञानवृद्धांनीं आणि अगणित जानपद शिक्षकांनीं त्याचें सारखेंच कौतुक केलें आहे. महाराष्ट्रांतील कांहीं शाळांतून वरच्या वर्गासाठीं 'आनंदा'च्या पुरवणींतील मजकुराची चर्चा करण्याकरितां महिन्यांतून एक तास ठेवण्यात येतो असें कळलें. महिलावर्गाला तर हें राजकारणाचें सदर फार आवडतें असें आढळून आलें. आणि 'राजकारणावर सर्वसामान्य स्त्रियांना उपयुक्त असे पुस्तक तुम्ही लिहा' अशी आग्रहाची विनंति समक्ष व पत्रद्वारां अनेक भगिनींनीं केली. या सर्व प्रोत्साहनाचा अभ्यासास व लेखनास अतिशय उपयोग झाला. आणि जीवनांत उंचसखल मार्गावर धक्के बसत असताहि जिज्ञासा कायम राहिली.

आजपर्यंत राष्ट्रवादासंबंधी लिहिलेलें राजकीय लिखाण व केलेलें वाचन कांहीं एका पद्धतीनें मांडण्याचा योग येण्यास सध्यांची राजकीय परिस्थिति मुख्यतः कारण झाली. १९४२ च्या ऑगष्टमध्यें काँग्रेसच्या लोकमान्य नेत्यांच्या धरपकडीमुळें देशभर प्रचंड प्रक्षोभ झाला! हिंदी राष्ट्रवादाचा प्रचंड आधारस्तंभ असलेली एकमेव संस्था सरकारच्या दडपशाहीमुळें वनवासाला गेली! देशभर कुठें क्षोभ तर कुठें संधिसाधुपणा, कुठें हालअपेष्टा तर कुठें स्वस्थ चैन असा गोंधळ माजला. अविवेकाच्या रात्रीला अधिक भीषणपणा देण्याकरितांच कीं काय, चहूंकडे काँग्रेसच्या संकटामुळें आनंदित होऊन पिसाळलेल्यांनीं हवें तें तारस्वरानें ओरडण्यास सुरवात केली! अराष्ट्रीय परधार्जिण्या कोल्हेकुईनें कान किटण्याची वेळ आली! आमचीं मनें सुन्न होऊन गेलीं!

अशा वेळीं शुद्ध राष्ट्रवादाची ज्योत तेवत ठेवण्याचें कार्य यथाशक्ति करणें हें प्रत्येकाचें कर्तव्य आहे याची जाणीव तीव्रतेनें होऊं लागली. यांतूनच

अभ्यासमंडळाची कल्पना उदयाला येऊन ता. २४ जानेवारी १९४३ रोजीं एक अभ्यासमंडळ मीं काढलें. राष्ट्रवादाची कळकळ असणाऱ्या अशा २५ कॉलेजकन्या व अध्यापिका अभ्यासमंडळास नियमानें येऊं लागल्या. यांतील बऱ्याच जणी कॉंग्रेस व सेवादल यांत निष्ठेनें काम करणाऱ्या होत्या. २१ मार्चला हें अभ्यासमंडळ संपलें. साधारणतः आठवड्यास दोन वर्ग होत. विषयाच्या महत्त्वाप्रमाणें व व्यापाप्रमाणें व्याख्यान व नंतरची चर्चा यांचा वेळ कमीजास्त होत असे. व्याख्याता व श्रोतृगण यामध्यें विश्वास व स्नेहभाव भरपूर असल्यानें चर्चेत मोकळेपणा असे. पुढें हीं व्याख्यानें लिहून काढण्याची आग्रहाची सूचना मला करण्यांत आली. त्याप्रमाणें हें पुस्तक मीं लिहून काढलें.

यानंतर महिलांचीं अनेक लहानमोठीं अभ्यासमंडळें मीं चालविलीं. पण त्यांतला उपन्यास व विस्तार हा थोड्याफार फरकानें पहिल्या अभ्यासमंडळासारखाच होता. म्हणून त्या पहिल्या अभ्यासमंडळाचा पाया धरूनच पुस्तक विरचिलें. व्याख्यानें लिहून काढतांना दर व्याख्यानानंतरच्या चर्चेत उपस्थित झालेले प्रश्न विचारात घेऊनच तीं लिहिली आहेत. इंग्रजी अवतरणें घातलीं नाहींत. जिथें एकादी कल्पना, घटना, अथवा संज्ञा अवघड वाटली तिथेंच तिच्या स्पष्टीकरणासाठीं दोनचार वाक्यें घातलीं आहेत. पुस्तक जास्तींत जास्त वाचकांना कळावें ही इच्छा आहे. "**काय वाचावें ?**" हें स्वतंत्र व्याख्यान असें दिलें नव्हतें. पण प्रवचनांत व नंतरच्या चर्चेत ज्या पुस्तकांचा उल्लेख आला त्यांचा एकत्र परिचय या प्रकरणीं करून देण्यात आला आहे. व्याख्यान लिहून काढतांना त्या व्याख्यानाच्या तारखेपर्यंतचीच सामुग्री व माहिती उपयोगांत आणली. त्यामुळें अलीकडील काहीं जागतिक महत्त्वाच्या देशीविदेशी घटनाचा उल्लेख या पुस्तकांत सापडणा नाहीं. पण त्याला नाइलाज आहे. कुठेतरी मर्यादा ही घालावीच लागते ना ?

हें पुस्तक मुख्यतः महिला वर्गासाठीं लिहिलेलें असलें तरी सर्वसामान्य वाचकांनाहि तें उपयोगीं पडेल असा विश्वास वाटतो. वरच्या वर्गातील विद्यार्थ्यांना आधुनिक भारताचें वर्णन देताना शिक्षकाना याचें साह्य होईल. विशेषतः

सेवादलासारख्या शुद्ध राष्ट्रवादी स्वयंसेवक संघटनांत बौद्धिक वर्ग घेण्यास हें पुस्तक आधार होईल.

'आनंदा' च्या व्यावहारिक गोष्टींचा व्याप स्वतः कौशल्यानें सांभाळून वाङ्मयसेवेला मला भरपूर संधि देणारे माझे ज्येष्ठ सहकारी श्री. गोपाळ बळवंत जोशी यांच्याकडे या पुस्तकाच्या श्रेयाचा मोठा वाटा मी सानंद कृतज्ञतेनें देत आहें. **'पद्म' प्रकाशन ( लिमि. )** या हिंदविख्यात संस्थेनें पहिलें मराठी पुस्तक म्हणून **"साधना"** घेतली यावद्दल वाटणारा अभिमान मला झांकतां येणार नाहीं. पण या अभिमानात असें घडून येण्यास 'पद्म' प्रकाशन संस्थेचे कल्पक व सुविद्य तंत्री श्री. उमाकांत भेंडे व 'यशवंत'चे संपादक श्री. पाध्ये यांचे आस्थेवाईक श्रम कारणीभूत झाले हें मी कदापि विसरणार नाहीं. माझे युवक स्नेही श्री. यशवंत गो. जोशी, बी. ए. (ऑ.) यांनीं प्रुफें तपासण्याचे कामी केलेलें साह्य उल्लेखनीय वाटतें. 'हनुमान' प्रेसच्या बोकाडे बंधूंनीं ह्या पुस्तकाचे बावत जी आस्था व कळकळ दाखविली तिचा तर मला केव्हांच विसर पडणार नाहीं. माझे मित्र रा. बापूराव भडवमकर व रा. स. के. भावे यांनीं कागद मिळवून देण्याचे बावतींत अमोल साह्य केलें. या सर्व सन्मित्रांचे किती आभार मानावेत! "साधना"तल्या माझ्या वाङ्मयविलासापेक्षां त्यातल्या विचाराचें 'महात्मेपण' हेंच 'पद्म' प्रकाशन संस्थेनें हें पुस्तक स्वीकारण्यास प्रभावी ठरलें असें मी नम्रभावें समजतों.

राजकारण हें अनुभवाचें ज्ञान असतें आणि केवळ राष्ट्रीय चळवळींतच नव्हे तर हरएक व्यक्तीच्या दररोजच्या जीवनांतहि या अनुभवजन्य ज्ञानाचा प्रत्यय येत असतो. आजच्या जागतिक विप्लवांत चार राजकीय हक्क मिळविणें एवढाच हिंदी राष्ट्रवाद्यांचा संकल्प नाहीं. एका लोकोत्तर पुरुषानें नवीं शाश्वत मूल्यें जगाला देण्याचा विडा उचलून हिंदी राष्ट्रवादाचा संग्राम मांडला आहे. नाम० गोखले यांनीं 'राजकारणाचें अध्यात्मीकरण करा (Spiritualise Politics)' असा संदेश दिला आणि त्यांचे अलौकिक पट्टशिष्य गांधीजी तेंच महत्कार्य करीत आहेत. अध्यात्म हें मुख्यतः व्यक्तिजीवनाची उन्नति साधण्याचा विचार करतें.

# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना

**'साधना'** या माझ्या पुस्तकाची दुसरी आवृत्ति वाचकांचे हातीं देतांना मला अत्यंत आनंद होत आहे. पहिली आवृत्ति वर्षाचे आंतच संपली! 'पद्म' प्रकाशनाची पुण्याई, रा. भेंडे यांचें प्रचार चातुर्य, नियतकालिकांनीं दिलेले अनुकूल अभिप्राय, राष्ट्रसेवादलानें केलेला पुरस्कार, आणि विशेषतः पुस्तकांत प्रतिपादिलेल्या राष्ट्रवादी तत्त्वज्ञानाची लोकप्रियता या सर्व गोष्टींचा प्रभाव या यशाला मुख्यतः कारण झाला आहे याची मला पूर्ण जाणीव आहे. आणि म्हणूनच मराठींतल्या ललितेतर पुस्तकाला क्वचितच लाभणारें विलोभनीय यश "साधने" ने मिळविलें असलें तरी त्यामुळें माझ्या मनांत अहंकारापेक्षां कृतज्ञतेची भावनाच अधिक प्रबळ होत आहे.

या दुसऱ्या आवृत्तींत **'गेलीं दोन वर्षे'** हें एकच नवें प्रकरण घातलें आहे. आधुनिक राजकारणाचें स्थूल दर्शन अद्ययावत् करणें एवढाच या प्रकरणाचा हेतु आहे. मूलतः हीं व्याख्यानें महिलांच्या अभ्यासमंडळांपुढें दिलीं होतीं आणि त्याच स्वरूपांत तीं लिहिलीं गेलीं. **'साधना'** प्रसिद्ध झाल्यावर कांहीं थोर देशभक्तांनीं, विशेषतः माझे मित्र 'पद्म' प्रकाशनचे कल्पक तंत्री श्री. उमाकांत भेंडे यांनी अशी सूचना केली कीं, या व्याख्यानांचें आवाहन व्यापक करण्यासाठीं तीं स्त्रीपुरुषांना उद्देशून आहेत असें त्यांचें रूपांतर करावें. वास्तविक स्त्रियांना उद्देशून लिहिलेलीं उपयुक्त पुस्तकें स्त्रीपुरुष सारख्याच गोडीनें वाचतात हा अनुभव कांहीं दुर्मिळ नाहीं. परंतु मला पूज्य वाटणारे देशभक्त व मित्र० भेंडे यांचा आग्रह मीं आप्तवाच्य म्हणून पत्करला. या आवृत्तींत फक्त संबोधनें गाळलीं आहेत. तेवढ्यानें पुस्तकाचें क्षेत्र व्यापक झालें असेल तर आनंदच आहे. संबोधनें वगळण्याखेरीज कांहींच फेरफार केलेला नाहीं.

रामनारायण रुईया कॉलेजमधील मराठीचे प्राध्यापक व विख्यात पंडित न. र. फाटक यांनीं 'यशवंत' मासिकांत 'साधने'वर एक लेखमाला लिहिली

हें सानंद कृतज्ञतेनें नमूद करावेंसें वाटतें. जिज्ञासूंनीं ती अवश्य वाचावी. त्यांत 'साधनें'तल्या उणीवा दाखविल्या असल्या तरी 'साधने'नें एका कृतविद्य टीकाकाराला एवढी लेखमाला लिहिण्यास प्रवृत्त केलें याचा मला सदैव अभिमानच वाटेल.

'साधने'च्या दुसऱ्या आवृत्तीचें स्वागत पूर्वीप्रमाणेंच केलें जाईल अशी आशा आहे.

आनंदकार्यालय, पुणे. ] **गोपीनाथ तळवलकर**

---

# नवी दृष्टि : : १

आज आपण ज्ञान मिळविण्याच्या संकल्पानें येथें जमत आहोंत आणि नियमित जमणार आहोंत. पण ज्ञानापेक्षां नवी दृष्टि हें आपलें साध्य असावें असें मला वाटतें. ज्ञान हें अनंत आहे. तें पूर्णपणें पदरांत पडण्याचें समाधान मोठमोठ्या प्रतिभाशाली माणसांना लाभलें नाहीं आणि लाभणारहि नाहीं. पण नवी दृष्टि प्राप्त करून घेणें ही गोष्ट आपल्यासारख्या साध्या माणसांनाहि शक्य आहे. ज्ञानमार्गाचा प्रवास न संपणारा असला तरी तो प्रगतीच्या दिशेनें करण्यांत एक उच्च आनंद व कृतार्थता असते. मन हळूं हळूं मोकळें होत असतें. आणि म्हणूनच 'मोकळें करणारी–बंधनें तोडणारी ती विद्या' असें विद्येचें वर्णन आपल्या प्राचीन पंडितांनीं केलें आहे. आपला ज्ञानमार्गाचा प्रवास प्रगतीच्या दिशेनेंच आहे हें कळण्याचें साधन नवी दृष्टि आपणांस हस्तगत करून देते. आडरानात किंवा परागतीला जाण्याचें भय नव्या दृष्टीनें उरत नाहीं. म्हणूनच मी तुम्हांला सांगतों कीं ज्ञानापेक्षा नव्या दृष्टीची संपादणी करण्याकडे आपला मुख्य रोख ठेवूं या.

ही नवी दृष्टि बुद्धिवादानें प्राप्त होणारी आहे. मात्र याचा अर्थ बुद्धिवादाला कवटाळणें हाच मोक्ष असें समजूं नका. भावनेनें नव्हे तर भावनावशतेनें किंवा भ्रामक समजुतींनीं आपण जगाच्या घडामोडींकडे पाहतों. ही पद्धति बदलल्याशिवाय जगाचें खरखुरें ज्ञान आपणास होणार नाहीं. सूर्याच्या

*प्रकाशाची गंमत तुम्हांला ठाऊक आहे ना ? अमुक एका कोनांत तो परावर्तन* पावला म्हणजे मूळचा त्याचा पांढरा रंग फुटतो आणि मग आपणांला कळतें कीं हा पांढरा रंग मूळ सात रंगांचा झाला आहे. हेंच कार्य नवी दृष्टि करते. कुठलीहि घटना वास्तवांत काय आहे याची जाणीव नव्या दृष्टीनेंच आपणाला होईल. शास्त्रीय दृष्टिकोण (Scientific outlook) किंवा बुद्धिवादी विचारसरणी (rationalism) यालाच म्हणतात. पण मी हे दोनहि शब्द वापरणार नाहीं. कारण या शब्दांना संकुचित अर्थ आला आहे. आणि त्यावर विशिष्ट पंथाच्या आग्रहाचा मळ सांचला आहे. नवी दृष्टि या साध्याच शब्दप्रयोगाचा आपण उपयोग करूं.

पण नवी दृष्टि या शब्दप्रयोगानें मला काय सुचवायचें आहे हें मी स्पष्ट आणि विस्तारपूर्वक सांगतों. एकादी घटना अमुक भावनेच्या आधारें घडली असें आपण म्हणतों. पण त्या घटनेला खरोखरी कांहीं व्यावहारिक कारणांची किंवा परिस्थितीची मदत झालेली असते. हीं कारणें व परिस्थिति यांची संपूर्ण ओळख करून घेणें अगत्याचें आहे. मी इतिहासातल्या एकदोन घटनाच घेऊन माझें म्हणणें स्पष्ट करतों.

दोनशें वर्षांच्या पूर्वीच्या काळांत आपण प्रवेश करून हिंदुस्थानचा इतिहास न्याहाळूं. यावेळीं फ्रेंचांचा सरदार डुप्ले आणि इंग्रजांचा क्लाईव्ह आपापलें बस्तान हिंदुस्थानांत बसवतांना आपणास दिसतात. डुप्ले क्लाईव्हपेक्षा अधिक चतुर व अधिक कर्तबगार होता. पण तो आपल्या सरकारला हिंदुस्थानांत साम्राज्यविस्तार करण्यासाठीं मदत मागूं लागला कीं त्याला नकार मिळे ! आणि त्याला माघार घेतल्यावाचून गत्यंतर उरत नसे. क्लाईव्हचें इंग्लंडांतील सरकार मात्र क्लाईव्हला हवीं तेवढीं शस्त्रास्त्रें व माणसें नियमित पुरवीत असे. याचा परिणाम काय झाला ? फ्रेंचांची सत्ता हिंदुस्थानांतून लुप्त होत पाँडेचरीला अंगुष्ठमात्र उरली. *आणि इंग्रजांनीं हळूंहळूं हिंदुस्थानचा कबजा घेतला !*

शाळेच्या इतिहासांत आपण हें वाचतों तेव्हां आपणाला साहजिक काय वाटतें ? इंग्लिश सरकार मोठें धोरणी, राष्ट्रभक्त व दूरदर्शी होतें म्हणून त्यानें क्लाईव्हला मदत केली, आणि त्या मानानें फ्रेंच सरकारला कांहीं पोचहि नव्हता आणि स्वार्थाची राष्ट्रीय महत्त्वाकांक्षाहि नव्हती. पण खरी गोष्ट अशी नाही. त्यावेळचें फ्रेंच सरकार हे मोठमोठ्या जमिनदारांच्या किंवा सरदारांच्या वर्चस्वाखालीं असे. यांनाच आपण सरंजामी वर्ग म्हणतों. हा फ्रेंच सरंजामी वर्ग आपल्या देशांतल्या नैसर्गिक सुबत्तेवर संतुष्ट होता. दूर देशच्या व्यापार-पेठांची त्याला फारशी आवश्यकता नव्हती. उलट इंग्लंडमध्यें यंत्राची वाढ व्हायला लागून खंडोगणती पक्का माल तयार होत होता. तेथें व्यापाऱ्यांचें वळ वाढत होतें आणि सरकारला हे व्यापारीच सामर्थ्य पुरवीत. या व्यापाऱ्यांच्या कारखान्यांत तयार होणारा माल विकण्यासाठीं त्यांना बाजारपेठा पाहिजे होत्या म्हणून ते व्यापारी सरकारवर दडपण आणून आपल्या सरकारला हिंदुस्थानांत राज्य संपादण्यासाठीं पैसे पाठविण्यास भाग पाडीत. क्लाईव्हला जी मदत मिळे त्याचें मूळ कारण असें होतें.

आणखी एक महत्त्वाची घटना घेऊं. मध्ययुगांतलीच गोष्ट आहे ही. आशिया व युरोप यांच्या वाटेवरील पॅलेस्टाईन प्रांतांत येरुसलेमची पवित्र भूमि कोणाच्या ताब्यांत असावी याबद्दल मुसलमान आणि ख्रिस्ती यांच्यांत भांडणें लागलीं. मुसलमानांचें म्हणणें येरुसलेम आपणांला पाहिजे आणि ख्रिस्त्यांचें म्हणणें ही भूमि आमची आहे. अनेक वर्षे हें युद्ध चाललें होतें. या पवित्र भूमीसाठीं शेंकडों ख्रिस्ती आणि इस्लामी वीरांनीं रक्त सांडलें ! ह्या युद्धांतले रोमांचकारी प्रसंग आणि युद्धांतून थोडी उसंत मिळतांच आपापल्या देशांत आपल्या विरहिणी प्रियांना गुप्त वेषानें भेटायला आलेले शिलेदार प्रियकर यांच्या रम्याद्भुत कथा युरोपियन वाङ्मयांत कितीतरी आहेत ! पण आपणांला असें दिसतें कीं एकदम हें युद्ध थांबलें! म्हणजे इस्लामी लोक शहाणे झाले कीं ख्रिस्ती लोकांनीं नमतें घेतलें ? का दोघांनाहि

एकदम अहिंसा सुचली ? पुढे या दोन जमातींचे पराक्रम पाहिले म्हणजे *असें कांहीं झालें असेल असें वाटत नाहीं.*

मग हीं 'धर्मयुद्धे' कां थावलीं ? त्याला कारण असें झाले कीं वास्को डी *गामा यानें या सुमारास* हिंदुस्थानला येण्याचा जलमार्ग शोधून काढला. तेव्हां येरुसलेमवरून आशियाखंडांत, यायला जो खुष्कीचा मार्ग होता त्याची *आतां ख्रिस्ती राष्ट्रांना गरज राहिली नाहीं. याचा अर्थ येरुसलेमच्या* पवित्र भूमीसाठीं ख्रिस्ती लोकांनीं मांडलेला संग्राम मूलतः व्यापारी मार्गासाठीं होता. नवा दुसरा मार्ग सांपडतांच धर्मभूमीच्या प्राप्तीविषयींची ख्रिस्ती राष्ट्रांची चळवळ थंडावली. ख्रिस्ती राष्ट्राचा विरोध नष्ट होतांच इस्लामी राष्ट्रांनींहि शस्त्र खालीं ठेवलें.

वरील दोन घटनांवरून मी नवी दृष्टि कोणती म्हणतों तें लक्षांत येईल. ही नवी दृष्टि प्रसिद्ध तत्ववेत्ता कार्ल मार्क्स यानें दिली. केवळ भावनात्मक दृष्टीनें इतिहासांतील घडामोडी न पाहतां त्यांचीं मूळ भौतिक कारणें कशीं शोधावीं हें मार्क्सनें आपणांला शिकविलें.

मार्क्सबरोबरच आणखी एका प्रसिद्ध माणसाचा आदरानें उल्लेख करायला हवा. त्याचें नांव फ्राईड. इतिहासाच्या विचारांत जशी मार्क्सनें क्रांति केली तशी फ्राईडनें मानसशास्त्राच्या दृष्टिकोणांत केली. माणसाच्या जीवनांत ज्या विकृति किंवा मनात जे गोंधळ निर्माण होतात ते माणसाच्या अतृप्त राहिलेल्या वासनांमुळें होतात असें फ्राईडनें सिद्ध केलें. माणसाला एक प्रकट मन असतें तसेंच दुसरें अप्रकट मन असतें. प्रकट मन आपणांला कळतें, त्यावर आपण संयम घालूं शकतों. अप्रकट मनाचे व्यापार आपणांला सहजासहजीं कळत नाहींत. एकादा प्रेमळ भोळा पति ज्याप्रमाणें नानातऱ्हेच्या वस्तू, पैसा कमावून आपल्या दक्ष पत्नीच्या स्वाधीन करतो तद्वत प्रकट मन दररोज शेंकडों अनुभव कमावून अप्रकट मनाच्या स्वाधीन करीत असतें. यांतल्या

संतापजनक अनुभवांचा दाह माणसाला सारखा सोसावा लागून त्याच्या वागणुकीवर त्याचा परिणाम होतो. अप्रकट मनांत घर करून राहिलेले हे अनुभव ओळखायचे कसे ? त्यांचा थांग लागल्याशिवाय त्यांच्यावर उपाययोजना तरी कशी करावयाची ? फ्राईडनें याचेंहि तंत्र शोधून काढलें. माणसाला जीं स्वप्नें पडतात त्यांत त्याच्या अतृप्त वासना पुष्कळदां स्पष्ट होतात. कारण मनुष्य झोपला असतांना प्रकट मनहि झोपतें आणि अप्रकट मनाच्या संचाराला चांगला वाव मिळतो. फ्राईडनें ही स्वप्नमीमांसा उत्तम रीतीनें मांडली आणि अपंग, वेड्या, गुन्हेगार माणसांच्या वर्तनाचें मूळ कारण शोधून काढण्याचें शास्त्र तयार केलें. मी जी नवी दृष्टि म्हणतों ती मिळवायची असेल तर नवें मानसशास्त्रहि आपणांला स्थूल मानानें शिकावें लागेल. या नव्या मानसशास्त्राची आपली नीट ओळख झाली म्हणजे आपली विचारपद्धति उदार होईल. एकाद्या माणसाच्या हातून गैरवर्तन घडलें असलें तरी एकदम त्याचें डोकें उडविण्याचें फर्मान आपण काढणार नाहीं. त्याच्या हातून असें वर्तन घडण्यास कोणत्या अतृप्त वासना कारण झाल्या हें आपण पाहूं, आणि त्या त्याच्या वासना जर न्याय्य असतील तर त्या तृप्त न होण्यास समाजपद्धतींतले कोणते दोष कारण झाले याचा अंदाज घेऊं. इतकें केलें म्हणजे व्यक्तीच्या उन्नतीच्या मार्गांत येणाऱ्या समाजरचनेंतल्या दोषांचा नायनाट करण्याची आंच आपणांस लागेल. म्हणजेच हें नवें मानसशास्त्र आपणास नवी दृष्टि देऊन क्रांतिकारक बनवील.

इतिहास, अर्थशास्त्र, आणि मानसशास्त्र याप्रमाणेंच जडवाद आणि अध्यात्मवाद यांचीहि तोंडओळख आपणांला करून घेतली पाहिजे. कारण आपल्या विचारावर व वर्तनावर या वादाचे परिणाम कळत नकळत होत असतात. जडवाद आणि अध्यात्मवाद या शब्दांनीं उगीच बुजून जाऊं नका. ते शब्द आपणांला सहज कळतील इतके सोपे आहेत. आपण पाहतों ही सर्व सृष्टि आहे अशीच पहिल्यापासून होती आणि तिच्या वाढीच्या कुठल्या तरी अव-

निक राज्यव्यवस्थेनें कात्रूंत ठेवण्याचे सामर्थ्य इंग्रजांपाशीं होतें. हा काळपर्यंत देशभर चाललेलीं लहानमोठ्या जमातींचीं व रियासतींची युद्धें, ठग, पेंढारी यांचे पुंडावे, दुष्काळ, इ० मुळें त्रासलेले देशातले लोक शांततेसाठीं धांदावले होते. 'युद्ध हा मनुष्याचा स्वभावधर्म आहे' ही हिंसात्मक वाणी कुणाला खरी वाटेल ती वाटो ! पण बहुसंख्य नागरिकांची वृत्ति पाहिली तर शांततेसाठीं केव्हांहि भुकेलेली असते. आपल्या प्राथमिक गरजा विनासायास भागून जगांतील विविध ज्ञान व प्रेम यांचा अधिकाधिक लाभ घडावा यासाठींच सभ्य नागरिक आतुरलेले असतात. युद्धाची किंवा अशांतीची कास धरावीच लागली तर ती केवळ नाइलाज म्हणून धरायची अशीच त्याची वृत्ति असते. अनेक वर्षांच्या असुरक्षित व बेभंरवशी दशेला संपुष्टांत आणून इंग्रजांनीं लोकांना प्रबळ सुराज्य दिलें केलें होतें. तेव्हां लोकांनीं त्याचें स्वागत केलें, मोठ्या उत्साहानें केलें, यांत कोणतें आश्चर्य!

—आणि इंग्रजांनीं नुसती शांतताच आणली का? नाहीं. त्यांनीं पाश्चात्य वाङ्मय व यंत्रसंस्कृति आणिली. लोकशाही, स्त्रीपुरुषांचे समान हक्क, मतस्वातंत्र्य, राष्ट्रवाद यादि गोष्टी तारायंत्र, आगगाडीबरोबर या देशात ते घेऊन आले. आपल्या देशात विज्ञानयुगाची पहाट फुटली या वेळीं जे कोणी ज्ञाते दूरदर्शी लोक जागृत होते त्याना या पहाटेनें हिंदुस्थानात उत्कर्षाचें नवें युग सुरू होणार अशीं चिन्हें दिसूं लागलीं. 'इंग्रजाचा संबंध दैवयोगानें जडला आहे. आतां त्याचा फायदा आपण आपल्या देशाच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं करून घेऊं या.' असें ही थोर मंडळी सांगू लागली. राममोहन, दादाभाई, रानडे, लोकहितवादी हे ते जागृत लोकनेते होत. इंग्रजांनीं या देशाचा कारभार चालविण्यासाठीं कारकून मिळावेत म्हणून इंग्रजी शिक्षण देण्यास सुरुवात केली. पण तेच इंग्रजी शिक्षण 'वाघिणीचें दूध' ठरलें. नवविचार व स्वातंत्र्याची स्फूर्ति या दुधांतूनच हिंदी लोकांना मिळाली. आणि नवे देशभक्त उदयास येऊं लागले. अर्थात् या देशभक्ताना आपला देश स्वावलंबी व

स्वतंत्र व्हावा असें वाटणें साहजिकच होतें. आणि त्या दिशेनें त्यांनीं प्रयत्न सुरू केले. १८५१ साली ब्रिटिश इंडियन असोसिएशन म्हणून एक संस्था बंगालमध्यें उदयास आली. डॉ. राजेंद्रलाल मित्र यांनीं या संस्थेच्याद्वारें पुष्कळ काम केलें. मुंबईची बॉंबे असोसिएशन, पुण्याची सार्वजनिक सभा बंगालची इंडियन असोसिएशन या संस्था कॉंग्रेसच्या जन्माच्या अगोदर जन्माला आल्या होत्या. कॉंग्रेसचा उदय होण्याचीं हीं प्रसादचिन्हें होतीं.

पण प्रत्यक्ष कॉंग्रेसला जन्म देण्याचें श्रेय एका इंग्रजाकडे गेलें ! पुढें अर्ध शतक उलटल्यावर ज्या कॉंग्रेसनें इंग्रजांना उद्देशून 'चले जाव' ची घोषणा केली त्या कॉंग्रेसची प्रतिष्ठापना एका सज्जन इंग्रज माणसानें करावी हा विचित्र योगायोग नव्हे काय? पण इतिहास अशा आश्चर्यांनीं खच्चून भरलेला आहे. असो. मि. ह्यूम या नांवाचे एक उदारमतवादी इंग्रज अधिकारी होते. यांनीं कॉंग्रेस स्थापण्याचे कामीं पुढाकार घेतला. "तुमच्यातील जो सर्वश्रेष्ठ असेल तो तुमचा सर्वात नम्र सेवक व्हावा" अशी हिंदी लोकांना ते शिकवण देऊं लागले. हिंदी लोकानीं सुसंघटित राजकीय संस्था स्थापावी यासाठीं सरकारी व बिनसरकारी लोकांत त्यांनीं प्रचाराला सुरवात केली. बिन सरकारी लोकांनीं ह्यूम यांना पाठिंबा दिला हें साहजिकच झालें. पण त्या वेळचे व्हाईसरॉय लॉर्ड डफरीन यांनींहि ह्यूमसाहेबाची कल्पना विशेष उचलून धरली! डफरीनच्या गादीवर पुढें आलेल्या कित्येक वड्या लाटांनीं कॉंग्रेसला नेस्तनाबूद करण्याचे कमे कडक उपाय योजले हें पाहिलें म्हणजे काळाच्या करणीचें कौतुक वाटतें.

पण कौतुक तरी कसलें? त्यावेळची परिस्थितीच तशी होती. ज्या काळीं, माणसाची भरभराट होत असते त्या काळात औदार्यानें वागणें त्याला जड जात नाहीं. १९ व्या शतकाचा मध्यकाल म्हणजे इंग्लंडच्या ऐश्वर्याचा कळसच म्हणायचा. वसाहतींतून भरपूर द्रव्याचा ओघ इंग्लंडांत येत होता. समुद्रावर

पूर्ण वर्चस्व होतें. जगांत फार मोठा प्रतिस्पर्धी कोणी नव्हता. हिंदुस्थानमागें साम्राज्याखालील देश बरेच मागासलेले होते. अशा वेळीं स्वदेशांतील आबादीआबाद साहजिकच इंग्रजी मनाला जरा मोकळें व उदार व्हायला प्रोत्साहन देत होती. उदारमतवादी तत्त्वज्ञान याच वेळीं इंग्लंडांत मान्यता पावलें. ह्यूम-डफरीन याच तत्त्वज्ञानानें भारलेले होते. सर्व व्यापारी पेठा सर्वांना मोकळ्या असाव्या, प्रत्येक माणसाला राज्यकारभारात आपलें मत प्रभावी करण्याची संधि असावी, भाषणस्वातंत्र्य असावें अशा उदार कल्पना इंग्लंडात लोकप्रिय झाल्या. आणि हिंदुस्थानावरहि त्याचे अस्पष्ट परिणाम होऊं लागले.

—आणि म्हणून येथील सरकारी–बिन-सरकारी इंग्रज नेते राष्ट्रीय सभेच्या स्थापनेला साह्य करूं शकले. ता. २८ डिसेंबर १८८५ रोजीं दुपारीं बारा वाजतां मुंबईच्या गोकुळदास तेजपाळ संस्कृत कॉलेजमध्यें श्री. डब्ल्यू. सी. बानर्जी यांच्या अध्यक्षतेखालीं काँग्रेसचें पहिलें अधिवेशन भरलें. हें अधिवेशन म्हणजे हिंदी राष्ट्रवादाची गंगोत्री होय असें म्हणण्यास हरकत नाहीं. येथून निघालेल्या राष्ट्रवादाची गंगा पुढें कशी विशाल होत गेली आणि तिनें हिंदुस्थानचा इतिहास कसा सुसंपन्न केला हें पाहिलें म्हणजे प्रेमाचें भरतें येतें! अभिमान शरीराच्या कणांकणांत नेळूं लागतो.

पहिलीं २० वर्षे काँग्रेस कमालीची सनदशीर दिसते. वरिष्ठ व्यापारी वर्ग, उच्च विद्याविभूषित अधिकारी, डॉक्टर, वकील असा समाजाचा वरवरचा वर्ग काँग्रेसच्या अधिवेशनांत वावरतांना दिसे. आय् सी. एस्. ची परीक्षा हिंदुस्थानात व्हावी, वरच्या कौन्सिलांत हिंदी लोकांना जागा द्यावी अशा नेमस्त मागण्या सालोसाल काँग्रेस करीत असे. पितामह दादाभाईना परदेशीं आपल्या देशाचा प्रचार करण्याची उपयुक्तता आरंभीच कळून आली होती. इंग्लंडात स्वदेशाच्या वतीनें दादाभाईनीं प्रचार तर केलाच पण स्वतः पार्लमेंटमध्यें निवडून येऊन त्या महत्त्वाच्या व्यासपीठावरून त्यानीं देशाची निर्भीड वकिली केली. परदेशी प्रचाराचें हें तत्त्व पुढें गोखले, टिळक, गांधीजी, नेहरू

यांनी किती पूर्णतेला नेलें व त्याचा देशाला केवढा उपयोग झाला हे आपण पाहतोंच आहोंत! असो. अर्जविनंतीचा काँग्रेसच्या अमदानींतला हा काळ स्वदेशांत जागृति करण्याच्या दृष्टीनेंहि फार उपयुक्त ठरला.

१९०५ सालीं बनारस येथें झालेली काँग्रेस विशेष महत्वाची आहे. नाम० गोपाळ कृष्ण गोखले हे अध्यक्ष होते. त्यांच्यासारख्या नेमस्त पण तळमळीच्या देशभक्तानें स्वदेशीची महति गायिली, करबंदीची चळवळ ही सुद्धां सनदशीर-पणाच्या मर्यादेंत बसते असें निर्भयपणें सांगितलें आणि विशेष म्हणजे हिंदुस्थानच्या राजकीय विकासाची परिणति म्हणजे 'वसाहतीचें स्वराज्य' असें ध्येय ठरविलें. राज्यपद्धतींत हिस्सा मागणारी किंवा थोडेफार अधिकार पदरांत पाडून घेण्यांत कृतार्थता मागणारी काँग्रेस वसाहतीच्या स्वराज्याची भाषा बोलूं लागली.

याच सुमारास वंगभंगाच्या प्रकरणानें बंगाल व एकंदर देश खवळून उठला होता. हिंदूंपासून मुसलमान वेगळे करण्याच्या उद्देशानें बंगालची फाळणी करण्याचा धूर्त डाव कर्झनसाहेबांनीं टाकला. पण तो सरकारवरच उलटला. कारण फाळणीनें विशेषतः मध्यम वर्ग दुखविला गेला आणि तो काँग्रेसकडे आकर्षिला गेला. तोंवर काँग्रेस वरिष्ठ वर्गाची प्रतिनिधी होती. पण लो० टिळक, पाल, अरविंद, घोष, सुरेन्द्रनाथ यानीं मध्यम वर्गाची प्रचंड फळी काँग्रेसच्या पाठीशीं उभी केली. काँग्रेसची बैठक अधिक विस्तृत झाली. तिचें व्यासपीठ आता केवळ अल्पसंख्य वतनदारांच्या मालकीचें असें राहिलें नाहीं.

पण काँग्रेसच्या या चढत्या वैभवाला दुर्दैवानें पायबंद बसला! सुरतेच्या काँग्रेसमध्यें तंटे झाले! बहुजन समाजाचे अग्रणी लो. टिळक याना लौकरच सहा वर्षांची शिक्षा झाली! लोकमान्य हाडाचे लोकसत्तावादी होते. उघड्या मैदानांत गांवोगांवीं सभा भरवून त्यांतून काँग्रेसला प्रतिनिधी निवडावे अशी *टिळकांनीं सूचना केली होती. यावरून त्यांच्या लोकाभिमुख वृत्तीची कल्पना।*

कनवाळू प्रेम व मृत्यूलाहि कवटाळण्यास न भिणारी निष्ठा त्याचे अंगीं होती. कामकरी व सारे दलित लोक यांनीं त्याला पाहिलें व ऐकिलें तेव्हां त्यांचीं मृतप्राय अंतःकरणें नवचैतन्यानें थरारलीं; त्यांना अपूर्व आशा वाटूं लागली; आणि आनंदानें त्यांनीं जयघोष केला,

"महात्मा गांधी की जय."

आणि दुःखाच्या दरींतून बाहेर पडण्याचा निर्धार केला. परंतु ज्या जीर्ण यंत्रानें इतके दिवस त्यांची पिळणूक चालविली होती तें यंत्र त्यांना सुखासुखी थोडेंच बाहेर पडूं देणार! त्याचीं चक्रें फिरूं लागलीं. त्यांना चिरडून टाकण्याकरितां त्या यंत्रानें नवीं शस्त्रें, नवे कायदे, नवे वटहुकूम काढले, त्यांना बांधण्याकरिता नव्या शृंखला तयार केल्या. आणि नंतर-? पण तें सांगण्याचा माझ्या या इतिहास-कथनाचा उद्देश नाहीं. उद्यां उगवणार आहे, 'उद्यां' चें 'आज' मध्यें रूपांतर केव्हा होणार तें दिसेलच. पण तें होणार याविषयीं कुणाला शंका आहे?"

[ Glimpses of World History ]

'स्तवार्थ तुझिया तुझ्यास्तव कवी कधीं जन्मती' असें मोरोपंत म्हणतात. पण कधीं कधीं असा दुर्मिळ योग घडून येतो यात शंका नाहीं. पं. जवाहरलालसारख्या राष्ट्रपुरुषानें गांधीजींचें वर दिलेलें वर्णन करावें हा असाच दुर्मिळ योग नव्हे काय?

गरिबांवर होणाऱ्या अन्यायाचें निर्मूलन करण्याकरिता सरकारविरुद्ध संघटित रीतीनें निःशस्त्र प्रतिकाराची चळवळ करण्याचें तंत्र गांधीजींनीं वापरून यशस्वी करून दाखविलें होतें. मानवी इतिहासात हा प्रयोग अभिनव होता. युरोपला 'शांतिपर्वा' चा मार्ग दाखविणारे भीष्माचार्य टॉलस्टाय यांनी स्वतः गांधीजींना पत्र पाठवून त्याच्या सत्याग्रहाच्या तंत्राबद्दल त्याना धन्यवाद दिले. गोखले म्हणाले कीं, 'जगांतील वीर-पुरुष ज्या द्रव्यानें केले त्याच द्रव्यानें ह्या माणसाची घटण परमेश्वरानें केली आहे.'

## काँग्रेस ( १९२० ते १९४३ पर्यंत ) : : ३

नव्या युगाचा काँग्रेसमध्यें आरंभ झाला हें मीं मागें सांगितलें. त्या युगाचें स्वरूप सांगण्यापूर्वी जगाची परिस्थिति त्या सुमारास काय होती याची थोडी कल्पना मीं तुम्हांला देणें जरूर आहे. समुद्र आणि जमीन याच्या हवामानांचे संबंध तुम्हीं कदाचित् वाचले असतील. समुद्र आणि जमीन ह्यांचें तापण्याचें आणि निवण्याचें प्रमाण वेगळें आहे. समुद्र हळूंहळूं तापतो आणि सावकाश निवतो. जमीन लवकर तापते आणि लवकर निवते. जमीन किंवा समुद्र यांपैकीं ज्या ठिकाणीं उष्ण वातावरण असेल त्या ठिकाणीं थंड वातावरणांतून हवा येऊन घुसते. आणि अशा रीतीनें समुद्रालगतच्या प्रदेशांत वारे सारखे खेळत राहतात. हा दृष्टांत राष्ट्रीय आणि आतर्राष्ट्रीय परिस्थितींतल्या घटना एकमेकांवर कसे परिणाम करतात याकरितां मीं सांगितला. राष्ट्रांत आणि आंतर्राष्ट्रीय जगांत होणाऱ्या नरमगरम घडामोडींतून दर्यावरील वाऱ्याप्रमाणें एकमेकांकडे अनेक प्रवाह जात येत राहतात. म्हणून आपल्या राष्ट्रांतील आंदोलनांचा विचार करतांना आपण आंतर्राष्ट्रीय चळवळींची पार्श्वभूमि पाहिली पाहिजे.

लोकमान्यांचें देहावसान होऊन गांधीजींनीं असहकारितेची भेरी फुंकली. त्यावेळीं पाश्चात्य देशांत महायुद्ध संपलें होतें. भांडवलशाही राष्ट्रें युद्धाच्या आपत्तीनें खिळखिळीं होऊन जिकीरीस आलीं होतीं. १९१४ सालपर्यंत इंग्लंड,

अशा या लोकोत्तर पुरुषानें हिंदभूमीसाठीं हें शांतियुद्धाचें तंत्र प्रथम चंपारण्यांत वापरलें (१९१७). *या देशांतले गोरे मळेवाले हिंदी कुळांना* हरतऱ्हेनें पिळून काढीत. साहेब तंदुरुस्तीसाठीं हवेच्या ठिकाणीं जाणार असला तरी त्याचा खर्च कुळावर पडे ! साहेबाच्या मुलीचें लग्न म्हणजे कुळाचें दिवाळें ! *या अन्यायाविरुद्ध गांधीजींनीं दाद मागितली. तेथील* हुकूम मोडून चंपारण्यांत प्रवेश केला ! अखेर सरकारला हार खावी लागली. याच प्रकारची एक आवृत्ति गुजराथेंत खेडा जिल्ह्यांत निघाली. आणि गांधीजींचें सत्याग्रहतंत्र *हिंदी लोकांच्या परिचयाचें झालें. कांग्रेसमध्यें गांधी म्हणजे* एक प्रबळ शक्ति आहे याची जाणीव लोकांना झाली.

पण गांधीजी अद्यापिहि इंग्रजांचे स्नेही व इंग्रज सरकारच्या न्यायबुद्धीवर विश्वास ठेवणारे असे होते. पुढें *पंजाबांत जालियनवाला बाग प्रकरण घडलें ! अन्यायी कायद्याच्या निषेधार्थ जमलेल्या निःशस्त्र लोकांवर गोळीबार करण्यांत* आला ! शेंकडों ठार झाले ! पंजाब हा लष्करी लोकांचा प्रांत आहे. या ठिकाणीं राष्ट्रवादाची चळवळ वाढूं न देण्याचा सरकारचा निर्धार होता. आणि लोकांनीं त्याला विरोध केला. विरोध थोडा मर्यादेबाहेर गेला; पण सरकारनें मात्र प्रचंड प्रमाणांत सूड उगविला !

या मूडाची पुरती माहिती होताच गांधीजी इंग्रजी राज्यपद्धतीचे कट्टे द्वेष्टे बनले. यावेळीं महायुद्ध संपलें होतें. ब्रिटिशांनीं कांहीं सुधारणा देऊं केल्या होत्या. भारतमंत्री मॉंटेग्यू व व्हाईसरॉय चेम्सफोर्ड यांच्या दोघांच्या प्रयत्नानें त्या सुधारणा घडविल्या गेल्या म्हणून त्यांना 'मॉंट-फर्ड सुधारणा' असें नांव मिळालें होतें. १९१९ सालीं अमृतसरला कॉंग्रेस भरली ! पं. मोतीलाल नेहरू अध्यक्ष होते. पंजाब प्रकरणासंबंधीं सरकारवर कडक टीका झाली. 'मॉंट-फर्ड' सुधारणा स्वीकारण्याची प्रतियोगी सहकारितेची भूमिका टिळकांनीं घेतली व ती सर्वसंमत झाली !

पण कॉंग्रेसला वेगळेंच वळण लागायचें होतें. ३१ जुलै १९२० रोजीं लोकमान्य स्वर्गस्थ झाले ! आणि १ ऑगस्ट १९२० रोजीं गांधीजींनीं सत्याग्रहाची भेरी फुंकली ! कांग्रेस सामुदायिक चळवळीची प्रचंड प्रमाणावर उठावणी करणारी संस्था बनली !

२९-१-४३

## काँग्रेस ( १९२० ते १९४३ पर्यंत ) : : ३

नव्या युगाचा काँग्रेसमध्यें आरंभ झाला हें मीं मागें सांगितलें. त्या युगाचें स्वरूप सांगण्यापूर्वी जगाची परिस्थिति त्या सुमारास काय होती याची थोडी कल्पना मीं तुम्हांला देणें जरूर आहे. समुद्र आणि जमीन याच्या हवामानांचे संबंध तुम्हीं कदाचित् वाचले असतील. समुद्र आणि जमीन ह्यांचें तापण्याचें आणि निवण्याचें प्रमाण वेगळें आहे. समुद्र हळूंहळूं तापतो आणि सावकाश निवतो. जमीन लवकर तापते आणि लवकर निवते. जमीन किंवा समुद्र यांपैकीं ज्या ठिकाणीं उष्ण वातावरण असेल त्या ठिकाणीं थंड वातावरणातून हवा येऊन घुसते आणि अशा रीतीनें समुद्रालगतच्या प्रदेशांत वारे सारखे खेळत राहतात. हा दृष्टांत राष्ट्रीय आणि आंतर्राष्ट्रीय परिस्थितींतल्या घटना एकमेकांवर कसे परिणाम करतात याकरितां मीं सांगितला. राष्ट्रांत आणि आंतर्राष्ट्रीय जगांत होणाऱ्या नरमगरम घडामोडींतून दर्यावरील वाऱ्याप्रमाणें एकमेकांकडे अनेक प्रवाह जात येत राहतात. म्हणून आपल्या राष्ट्रांतील आंदोलनांचा विचार करतांना आपण आंतर्राष्ट्रीय खळबळीची पार्श्वभूमि पाहिली पाहिजे.

लोकमान्यांचें देहावसान होऊन गांधीजींनीं असहकारितेची भेरी फुंकली. त्यावेळीं पाश्चात्य देशांत महायुद्ध संपलें होतें. भांडवलशाही राष्ट्रें युद्धाच्या आपत्तीनें खिळखिळीं होऊन जिकीरीस आलीं होतीं. १९१४ सालपर्यंत इंग्लंड,

मिळावे, त्यासाठीं लोकांनीं संघटित व्हावें म्हणून व्यक्तिजीवन व सामाजिक जीवन यांत अगदीं क्रांति व्हावी, हिंदी स्वराज्य हें गरिबाच्या हिताचेंच ठरावें आणि त्यायोगें जगाला सत्यअहिंसेचा संदेश मिळावा एवढी गांधीजींची विशाल कल्पना होती. अस्पृश्योद्धार, मद्यपानबंदी, ग्रामोद्योग, खादी, सत्याग्रही राजकारण असा व्यापक कार्यक्रम गांधीजींनीं आंखला होता. जीवनाच्या सर्व शाखा पल्लवित करण्याची गांधीजींची योजना होती. आणि क्रांतिशास्त्राला हें सारें जुळतहि होतें. लो. टिळकांना ह्याचा पूर्ण अंदाज होता. टिळकांवर मृत्यूची सावली पडूं लागली असतां त्यांचे निष्ठावंत शिष्य कर्नाटकचे पुढारी गंगाधरराव देशपांडे हे त्यांच्याकडे एकदां गेले. नुकत्याच होऊं घातलेल्या एका जिल्हा परिषदेचे गंगाधरराव अध्यक्ष होते. गंगाधररावांनीं 'मी कोणता संदेश या अध्यक्षपदावरून देऊं?' असें टिळकांना विचारलें. तेव्हां टिळकांनीं सांगितलें, "गांधींचाच संदेश तुम्हीं द्या. कारण यापुढील नेतृत्व त्यांचेकडेच जाणार आहे. (He is the coming man.)" 'टिळक असते तर' हा प्रश्न करून तर्कवितर्कांचीं वादळें माजवून बुद्धिभेद करणारांना हा एकच प्रसंग निरुत्तर करण्यास समर्थ नाहीं का ?

पण ज्यांना कांहींच करायचें नव्हतें त्यांनीं कसले खरेखोटे बहाणे केले हें पाहण्यांत आपण वेळ न दवडलेलाच बरा! गांधीजींनीं आणखी एक गोष्ट केली. खिलाफत प्रकरणीं मुसलमानांच्या भावना दुखावल्या होत्या. या कामीं झालेला अन्याय दुरुस्त करण्यासाठीं मुसलमानांनीं हिंदी स्वातंत्र्ययुद्धांत भाग घ्यावा असें गांधींनीं उपदेशिलें. खिलाफत प्रकरणाचा पुढें केमालपाशानेंच स्वतंत्र शेवट लावला आणि एवढ्यापुरतेच कॉंग्रेसमध्यें आलेले कांहीं पुढारी पुढें प्रतिगामी झाले ही गोष्ट वेगळी! पण खिलाफत प्रकरण आणि खादीप्रचार यांत गांधीजींनीं मुसलमान समाजाचा कांहीं भाग कायमचा आत्मसात् केला

फ्रान्स वगैर जीं राष्ट्रें पृथ्वीवरील मागासलेल्या वसाहतींतून भरपूर लूट आणून आपली भरभराट साधीत होतीं त्यांच्या स्वास्थ्याच्या कल्पनेला महायुद्धानें चांगलाच धक्का दिला. या धक्क्यामुळें कुटुंब, समाज, व्यक्तिस्वातंत्र्य, खुला व्यापार, उदारमतवाद इ० पत्त्यांचे बंगले धडाधड कोसळले. सर्वांनीं एकत्र येऊन सहकार्याच्या तत्त्वानें नांदावें ह्या मतानें बळ धरिलें. आणि प्रबळांना व दुर्बळांना सामुदायिक संरक्षण (Collective security) मिळावें या उच्च ध्येयानें राष्ट्रसंघ जन्मास आला. विल्सननीं मानवी शांततेसाठीं चौदा तत्त्वरत्नें काढलीं; आणि सेसिलसारखे इंग्रजी शांतिवादी युद्धाला कायमची मूठमाती देण्याचा मनोभावें यत्न करूं लागले. ( दुर्दैवानें, ज्या उच्च ध्येयावर राष्ट्रसंघ अधिष्ठित झाला त्या ध्येयाची पुढें साम्राज्यवादी मुत्सद्यांनीं भेसूर विटंबना केली ही गोष्ट वेगळी ! ) भांडवलशाहीच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेतून जर मानवता वाचायची असेल तर खाजगी मालमत्तेचा हक्क नष्ट केला पाहिजे आणि समतावादी (Socialism) तत्त्वज्ञान पत्करलें पाहिजे असा पाश्चात्य जहालांचा आग्रह सुरू झाला. आणि या आग्रहाचें रशियांत प्रत्यक्ष क्रियेंत रूपांतर होऊन ती सुविख्यात राज्यक्रांति झाली. मजूर व शेतकरी यांच्या सत्तेची प्रतिष्ठापना होऊन जगांतल्या दलित व परतंत्र लोकांना एक नवें आशास्थान निर्माण झालें. भांडवलशाही या क्रांतीकडे सभय वृत्तीनें पहातच होती. संधि येताच आपलें वर्चस्व कायमचें टिकविण्यासाठीं भांडवलशाहीनें सघटित व्हायला सुरवात केली. यातूनच नाझीवाद व फॅसिझम् जन्माला आले ! त्यांनीं काय प्रळय केला हें आपण पाहतोंच आहोंत !!

काँग्रेसमध्यें नवें युग सुरू झालें तेव्हां महायुद्धानें छिन्नविछिन्न केलेल्या युरोपची स्थिति ही अशी होती. गांधीजींनीं काँग्रेसला सत्याग्रहाचा मंत्र दिला आणि काँग्रेस ही लढाऊ राजकारण करणारी अग्रगण्य संस्था बनली. मी जें नवयुग म्हणतों त्याचें वर्णन एवढ्यानें संपत नाहीं. केवळ राजकीय चळवळ एवढेंच गांधीजींचें ध्येय नव्हतें. हिंदुस्थानला स्वराज्य मिळावें, तें अहिंसेनेंच

मिळावें, त्यासाठीं लोकांनीं संघटित व्हावें म्हणून व्यक्तिजीवन व सामाजिक जीवन यांत अगदीं क्रांति व्हावी, हिंदी स्वराज्य हें गरिबाच्या हिताचेंच ठरावें आणि त्यायोगें जगाला सत्यअहिंसेचा संदेश मिळावा एवढी गांधीजींची विशाल कल्पना होती. अस्पृश्योद्धार, मद्यपानबंदी, ग्रामोद्योग, खादी, सत्याग्रही राजकारण असा व्यापक कार्यक्रम गांधीजींनीं आंखला होता. जीवनाच्या सर्व शाखा पल्लवित करण्याची गांधीजींची योजना होती. आणि क्रांतिशास्त्राला हें सारें जुळतहि होतें. लो. टिळकांना ह्याचा पूर्ण अंदाज होता. टिळकांवर मृत्यूची सावली पडूं लागली असतां त्यांचे निष्ठावंत शिष्य कर्नाटकचे पुढारी गंगाधरराव देशपांडे हे त्यांच्याकडे एकदां गेले. नुकत्याच होऊं घातलेल्या एका जिल्हा परिषदेचे गंगाधरराव अध्यक्ष होते. गंगाधररावांनीं 'मी कोणता संदेश या अध्यक्षपदावरून देऊं?' असें टिळकांना विचारलें. तेव्हां टिळकांनीं सांगितलें, "गांधींचाच संदेश तुम्ही द्या. कारण यापुढील नेतृत्व त्यांचेकडेच जाणार आहे. ( He is the coming man.)" 'टिळक असते तर' हा प्रश्न करून तर्कवितर्कांचीं वादळें माजवून बुद्धिभेद करणारांना हा एकच प्रसंग निरुत्तर करण्यास समर्थ नाहीं का ?

पण ज्यांना कांहींच करायचें नव्हतें त्यांनीं कसले खरेखोटे बहाणे केले हें पाहण्यांत आपण वेळ न दवडलेलाच बरा! गांधीजींनीं आणखी एक गोष्ट केली. खिलाफत प्रकरणीं मुसलमानांच्या भावना दुखावल्या होत्या. या कामीं झालेला अन्याय दुरुस्त करण्यासाठीं मुसलमानांनीं हिंदी स्वातंत्र्ययुद्धांत भाग घ्यावा असें गांधींनीं उपदेशिलें. खिलाफत प्रकरणाचा पुढें केमालपाशानेंच स्वतंत्र शेवट लावला आणि एवढ्यापुरतेंच काँग्रेसमध्यें आलेले कांहीं पुढारी पुढें प्रतिगामी झाले ही गोष्ट वेगळी! पण खिलाफत प्रकरण आणि खादीप्रचार यात गांधीजींनीं मुसलमान समाजाचा कांहीं भाग कायमचा आत्मसात् केला हें निर्विवाद आहे.

१९२० च्या चळवळींत. दारूबंदी, खादीप्रचार, पदव्या व सरकारी नोकऱ्या सोडणें, राष्ट्रीय विद्यापीठाची स्थापना, युवराजांच्या स्वागतावर बहिष्कार, असे अनेक कार्यक्रम होते. पुढें चौरीचुरा येथें कांहीं लोकांनीं पोलिसांना जाळून मारलें! ही गोष्ट अहिंसा तत्त्वाच्या विरुद्ध झाली म्हणून गांधीजींना उद्वेग आला! अद्यापी अहिंसेचीं बीजें जनतेच्या मनांत पुरेशीं रुजलीं नाहींत असें त्यांना वाटलें आणि कायदेभंगाची चळवळ तहकूब करण्याविषयीं गांधीजींनीं आदेश दिला! (१९२२) यानंतर लौकरच गांधीजींना सरकारनें अटक केली आणि रीतसर त्यांची चौकशी करून सहा वर्षांची शिक्षा दिली!

सुमारें दोन वर्षे चाललेल्या चळवळीची फलश्रुती काय असा प्रश्न तुम्ही मला विचाराल. रुपये, आणे, पै मध्यें या चळवळीची फलश्रुती तुम्हांला मला सांगता येणार नाहीं. स्वातंत्र्य युद्ध हें एकाच मोहिमेंत यशस्वी होत नसतें. अनेक लढ्यांतून संघटना वाढवून, नवे नवे धडे शिकून बळ वाढवावयाचें आणि नवे नवे झगडे करून आपल्या सामर्थ्याचा अंदाज घ्यावयाचा असें स्वातंत्र्यसंग्रामाचें तंत्र असतें. वीस सालच्या चळवळीनें नेहरू, दास, राजाजी, राजेंद्र असे मातब्बर लोक आणि इतर हजारों कार्यकर्ते सर्वस्वाचा त्याग करून राष्ट्रीय चळवळींत शिरले. राजकारण हा फावल्या वेळांतला उद्योग राहिला नाहीं! खादीमुळें वरिष्ठ वर्गाचा स्नेहसंबंध बहुजनसमाजापर्यंत जाऊन पोचला. अहिंसा या तत्त्वाच्या प्रचारानें एक उच्च प्रकारचें ध्येय माणसांना शिकवलें. शेतकरी हा वर्ग राष्ट्रीय सभेकडे आस्थेनें पाहूं लागला. त्यामुळें ब्राह्मण–ब्राह्मणेतर वाद थोडाफार निवळण्यास मदत झाली. एवढे संस्कार करणारी चळवळ वायां गेली असें म्हणणारे जे आहेत त्याना ब्रह्मदेव तरी काय पटवूं शकणार?

असहकारितेची लाट ओसरली. आणि नंतर काँग्रेसमध्यें उघड दोन तट झाले. त्यांना 'फेर' आणि 'नाफेर' अशीं नावें पडलीं. 'फेर' म्हणजे

असहकारितेचें धोरण बदलून कौन्सिलांत शिरावें म्हणणारा. दास-नेहरूंचा स्वराज्यपक्ष, आणि 'नाफेर' म्हणजे जुनें असहकारितेचें धोरण कायम टेवावें असें म्हणणारा पक्ष. राजगोपालचारी या पक्षाचे प्रमुख होते. हें ऐकून आजचें राजकारण जाणणाऱ्यांना हसूं यावें हें साहजिकच आहे. कारण मंत्रिमंडळ बनविण्यासाठीं अधीर झालेले राजाजी आज काँग्रेसमधून बाहेर पडतांना दिसतात ! राजकारणांत असे रंगपालट दुर्मिळ नाहींत ! असो.

१९२२ सालीं गया येथें भरलेल्या काँग्रेसमध्यें जरी नाफेरवाल्यांचा विजय झाला तरी फेरवाल्यांचें बंड चांगलेंच जोर धरणार अशीं चिन्हें स्पष्ट दिसूं लागलीं होतीं. आणि १९२३ मध्यें मौलाना अबुल कलम आझाद यांच्या अध्यक्षतेखालीं दिल्ली येथें जी काँग्रेस भरली तींत फेरवाले विजयी झाले ! आज कौन्सिलांत जावेंसें वाटे त्यांना तसें आचारस्वातंत्र्य देण्याचा काँग्रेसनें विचार केला ! इतकेंच नव्हे तर कौन्सिल-विरोधी प्रचारहि बंद पाडण्याची शिफारस झाली. १९२४ मध्यें स्वराज्यपक्ष मध्यवर्ति असेंब्लींत निवडून आला आणि हिंदी राज्यघटनेचा विचार करण्यासाठीं हिंदी पुढाऱ्यांची गोलमेजपरिषद बोलवावी अशा अर्थाचा ठराव पास करून घेऊन स्वराज्यपक्षाचे प्रतापशाली धुरीण पं० मोतीलाल नेहरू यांनी आपल्या पराक्रमाचें तेज दाखविलें !

कौन्सिल प्रवेशाचें राजकारण शिजत होतें तेव्हां गांधीजी तुरुंगांत होते. प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळें त्यांची मुदतीच्या अगोदरच सुटका झाली. १९२४ च्या उन्हाळ्यांत दास-नेहरूंनीं त्यांची गांठ घेऊन फेरवाल्यांचा दृष्टिकोण सांगितला. पण गांधीजींनीं तो पत्करला नाहीं. मात्र एवढे आदरणीय पुढारी म्हणतात तर त्यांना त्यांच्या वाटेनें जाऊं द्यावें असें गांधीजींनीं ठरविलें.

याच वर्षी गांधीजींनीं हिंदु-मुस्लिम ऐक्यासाठीं २१ दिवसांचें उपोषण केलें ! आणि याच वर्षी बेळगांव येथें भरलेल्या काँग्रेसच्या अध्यक्षपदीं त्यांची निवड झाली. "बहिष्कारांत सर्वांत मोठा बहिष्कार हिंसेवरचा होय...

गेले ते सल्लागार म्हणून, सरकारी राज्ययंत्र चालविणारे नोकर म्हणून नव्हे. आणि तीहि जागा त्यांनीं पुढें सोडली! विठ्ठलभाई यांना तर निवडून आलेल्या सभासदांनीं बहुमतानें अध्यक्ष निवडिलें. सरकारी अधिकारी–मंडळाशीं त्यांचा जो संबंध आला तो मुख्यतः भांडण्यांतच! राजकारणांतला हा सूक्ष्म भेद न कळल्यानें पुष्कळदां दिशाभूल केली जाण्याचा संभव असतो म्हणून हें मुद्दाम स्पष्टीकरण केलें.

१९२७ सालीं व्हॉईसरॉयसाहेब लॉर्ड अर्विन दौऱ्यावरून घाईघाईनें परत राजधानीस आले आणि त्यांनीं प्रमुख हिंदी पुढाऱ्यांना भेटीस बोलावलें. त्याप्रमाणें गांधीजी जातांच अर्विनसाहेबांनीं एक पत्रक त्याच्या हातीं दिलें. हिंदी राज्यघटनेचा विचार करण्यासाठीं ७ गोऱ्या सभासदांचें एक मंडळ सायमनसाहेबांच्या नेतृत्वाखालीं नेमल्याचें वृत्त त्या पत्रकांत होतें. 'एवढेंच का काम?' गांधीजींनीं हसून विचारिलें! 'हो' असें लाटसाहेबांनीं उत्तर देतांच गांधीजी म्हणाले, "मग हें काम एक आण्याच्या तिकिटानेंहि करतां आलें असतें.!' असो. ८ नोव्हेंबर २७ रोजीं सायमन् कमिशनच्या नेमणुकीची बातमी जाहीर झाली आणि सर्व देशभर प्रचंड प्रक्षोभ माजला. काँग्रेसनें तर या कमिशनवर बहिष्कार टाकलाच पण इतर पक्षांनींहि या बहिष्कारांत भाग घेतला. पूर्वी कधीं दिसून आली नव्हती इतकी एकी या कमिशनच्या बहिष्काराचे बाबतींत झाल्याचें अपूर्व दृश्य भारतवर्षात दिसलें! सायमन् कमिशन् नेमून सरकारनें हिंदुस्थानचा स्वयंनिर्णयाचा हक्क नाकारला आहे असा एकच निषेधाचा सूर उठला!

ह्या निषेधाच्या आगेमागें झालेल्या हकीकती फार महत्त्वाच्या आहेत. याच सुमारास बार्डोली तालुक्यांत शेतकऱ्यांचा लढा चिकाटीनें चालवून सरदार वल्लभभाई पटेल किसान–नेते म्हणून भारतांत पुढें आले. सर्वपक्षीय परिषद् भरून तिनें वसाहतीच्या स्वराज्याची मागणी केली आणि हिंदी राज्यघटनेचें

अहिंसात्मक चळवळीनें आत्मक्लेश सोसण्याचें आपलें सामर्थ्य वाढलें यांत शंका नाहीं. स्वराज्य हें आपलें ध्येय आहे आणि चरखा, हिंदु-मुस्लिम ऐक्य, व अस्पृश्यतानिवारण हीं त्याचीं साधनें आहेत...साधनाचें ज्ञान झालें म्हणजे मला बस्स आहे. साधन आणि साध्य हीं माझ्या जीवनांतील महत्त्वाचीं अंगें आहेत. ब्रिटिश साम्राज्यात राहण्याचा मी प्रयत्न करीन पण ब्रिटनच्या चुकीमुळे जरूर पडल्यास मी साम्राज्याशी संबंध तोडण्यासहि मागें पाहणार नाहीं." गांधीजींच्या भाषणातले हे प्रमुख मुद्दे होते.

काँग्रेसमध्ये 'फेर' आणि 'नाफेर' यांच्या लोकप्रियतेची भरतीओहोटी चालू असे. 'फेर'. पक्ष कर्तृत्वसंपन्न असला तरी त्याचा ओढा सनदशीरपणाकडेच असायचा. 'नाफेर' पक्ष हा त्या मानानें केव्हांहि क्रांतिकारक. १९२५ सालीं फरीदपूर येथें प्रांतिक परिषदेंत भाषण करतांना देशबंधु दास यांनीं आपला क्रांतिमार्गावरील अविश्वास प्रकट करून सरकारची एकप्रकारें आळवणीच केली! दुर्दैवानें दास त्याच वर्षी स्वर्गस्थ झाले आणि एका महान् त्यागी नेत्याच्या मार्गदर्शनाला देश मुकला! स्वराज्यपक्षांत एक उपपक्ष निघाला. "असां एकदां कौन्सिलात गेलों ना? मग अडवणुकीचें धोरण नेहमीं कशाला? सरकारी जागा स्वीकारायला तरी काय हरकत आहे?" अशी या उपपक्षाची वृत्ति होती. हाच तो 'प्रतिसहकार पक्ष.' स्वराज्यपक्षाचे एक मध्यप्रांतीय पुढारी तांबे यांनीं गृहमंत्रीपद स्वीकारून बंड केलें. आणि त्यांतूनच हा पक्ष उदयास आला. जयकर, केळकर, मुंजे, रामराव देशमुख इ. मंडळी या पक्षात होती. यांतले कांहीं आतां राजकारणनिवृत्त झाल्यासारखे दिसतात तर कांहीं हिंदु महासभेच्या व्यासपीठावर बसलेले आढळतात.

त्यावेळचे कुणी माहितगार तुम्हांला सांगतील कीं पं. मोतीलाल नेहरू यांनीं स्कीन कमिटीवरील जागा स्वीकारली आणि विठ्ठलभाई पटेल सभाध्यक्ष (Speaker) झाले, म्हणजे या दोघांनीं ताम्यांप्रमाणेच बंड केलें. परंतु लष्कराच्या हिंदीकरणाबाबत विचार करण्यासाठीं नेमलेल्या स्कीन कमिटीवर नेहरू

गेले ते सल्लागार म्हणून, सरकारी राज्ययंत्र चालविणारे नोकर म्हणून नव्हे. आणि तीहि जागा त्यांनीं पुढें सोडली ! विठ्ठलभाई यांना तर निवडून आलेल्या सभासदांनीं बहुमतानें अध्यक्ष निवडिलें. सरकारी अधिकारी–मंडळाशीं त्यांचा जो संबंध आला तो मुख्यतः भांडण्यांतच ! राजकारणांतला हा सूक्ष्म भेद न कळल्यानें पुष्कळदां दिशाभूल केली जाण्याचा संभव असतो म्हणून हें मुद्दाम स्पष्टीकरण केलें.

१९२७ सालीं व्हॉईसरॉयसाहेब लॉर्ड अर्विन दौऱ्यावरून घाईघाईनें परत राजधानीस आले आणि त्यांनीं प्रमुख हिंदी पुढाऱ्यांना भेटीस बोलावलें. त्याप्रमाणें गांधीजी जातांच अर्विनसाहेबांनीं एक पत्रक त्यांच्या हातीं दिलें. हिंदी राज्यघटनेचा विचार करण्यासाठीं ७ गोऱ्या सभासदांचें एक मंडळ सायमनसाहेबांच्या नेतृत्वाखालीं नेमल्याचें वृत्त त्या पत्रकांत होतें. 'एवढेंच का काम ?' गांधीजींनीं हसून विचारिलें ! 'हो' असें लाटसाहेबांनीं उत्तर देतांच गांधीजी म्हणाले, "मग हें काम एक आण्याच्या तिकिटानेंहि करतां आलें असतें. !' असो. ८ नोव्हेंबर २७ रोजीं सायमन् कमिशनच्या नेमणुकीची बातमी जाहीर झाली आणि सर्व देशभर प्रचंड प्रक्षोभ माजला. कॉंग्रेसनें तर या कमिशनवर बहिष्कार टाकलाच पण इतर पक्षांनींहि या बहिष्कारांत भाग घेतला. पूर्वी कधीं दिसून आली नव्हती इतकी एकी या कमिशनच्या बहिष्काराचे बाबतींत झाल्याचें अपूर्व दृश्य, भारतवर्षांत दिसलें ! सायमन् कमिशन नेमून सरकारनें हिंदुस्थानचा स्वयंनिर्णयाचा हक्क नाकारला आहे असा एकच निषेधाचा सूर उठला !

ह्या निषेधाच्या आगेमागें झालेल्या हकीकती फार महत्त्वाच्या आहेत. याच सुमारास बार्डोली तालुक्यांत शेतकऱ्यांचा लढा चिकाटीनें चालवून सरदार वल्लभभाई पटेल किसान–नेते म्हणून भारतांत पुढें आले. सर्वपक्षीय परिषद् भरून तिनें वसाहतीच्या स्वराज्याची मागणी केली आणि हिंदी राज्यघटनेचें

स्वरूप ठरविण्यासाठीं पं. नेहरू व सर तेजबहादुर सप्रू यांच्या नेतृत्वाखालीं एक समिति नेमली. या समितीनें तयार केलेली हीच 'नेहरू-सप्रू योजना' किंवा 'नेहरू-रिपोर्ट' म्हणून प्रसिद्ध आहे. सायमन् कमिशन् हिंदुस्थानांत दौऱ्यावर असतां त्यांच्या विरोधाचीं निदर्शनें ठिकठिकाणीं झालीं. आणि कित्येक ठिकाणीं या कमिशन-विरोधी चळवळीनें उग्र रूप धारण केलें. लाहोर येथें निषेधाच्या मिरवणुकींत लाठीहल्ला झाला आणि अग्रभागीं असलेल्या लाला लजपतरायांनाहि लाठ्या खाव्या लागल्या!! वय, देहदंड, परिश्रम इ० मुळें पोखरून निघालेलें लालाजींचें शरीर लौकरच या लाठीहल्लयाच्या धक्क्यानें निष्प्राण झालें! इकडे असेंब्लींत विरोधी नेते नेहरू आणि सभापति पटेल लोकपक्षाच्या वतीनें सरकारशीं झुंज देतच होते. देशांत पं. जवाहरलाल आणि बाबू सुभाषचंद्र यांच्या स्फूर्तीनें युवकवर्गांत जागृति होत होती. तिचें प्रसाद-चिन्ह म्हणूनच कीं काय मद्रास येथें (१९२७) पूर्ण स्वातंत्र्य हें आपलें ध्येय असल्याचें कॉंग्रेसनें जाहीर केलें.

१९२८ ला कलकत्त्याची कॉंग्रेस फार भव्य आणि तितकीच खळबळीची झाली. पांचसहा लाखांचा प्रचंड लोकसमुदाय, चांदीच्या रथांत अध्यक्ष पं० मोतीलाल बसलेले, स्वयंसेवकदलाचे अग्रणी सुभाषचंद्र पुढें अश्वारूढ होऊन चाललेले—हें रम्य दृश्य डोळ्यांपुढें आणा! मोतीलालजींनीं वैभवाची परि-सीमा गाठली. त्यांनीं केलेल्या रिपोर्टाला कांग्रेसनें मान्यता दिली. पण ती एक वर्षापुरतीच. ३१ डिसेंबर १९२९ च्या आंत सरकारनें नेहरू-योजना मान्य न केली तर अहिंसात्मक कायदेभंगाचा आदेश कांग्रेस जनतेला देईल असें कॉंग्रेसनें आपल्या ठरावांत स्पष्ट म्हटलें.

१९२९ साल फार धांदलींत गेलें. व्हॉइसरॉय लॉर्ड अर्विन यांनीं ब्रिटिश सरकारशीं विचारविनिमय करून जरी 'वसाहतीचें स्वराज्य हें हिंदुस्थानचें ध्येय' असल्याचें मान्य केलें तरी मुदतीचें कुठलेंच आश्वासन देण्यास ते पुढें येईनात. मंडलाकार परिषद बोलविण्याची घोषणा त्यांनीं केली. पण त्या परि-

पद्वेचें काम सरकारनें आंखलेल्या वर्तुळांत चालणार असें स्पष्ट दिसूं लागलें. गांधीजीप्रभृति नेत्यांनीं अर्विनसाहेबाची भेट घेऊनहि कांहीं उपयोग झाला नाहीं ! यानंतर लौकरच पं. जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं लाहोरची ती सुविख्यात कांग्रेस भरली. तरुण हिंदुस्थानचे पुढारी पं. जवाहरलाल उत्सवाचे मुख्य होते. ३१ डिसेंबर रोजीं मध्यरात्र उलटतांच हजारों लोक जमले. झेंडावंदन झालें. पं. नेहरूंनीं पूर्ण स्वातंत्र्याचा जयजयकार केला. लाहोर कांग्रेसमध्यें नेहरू–रिपोर्ट रद्द झाला ! वृद्ध पित्यानें सनदशीरपणाच्या वळणाला लावलेली कांग्रेसच्या राजकारणाची गाडी युवकपुत्रानें क्रांतीच्या वाटेवर आणली !

" मी स्वत: समाजसत्तावादी व लोकसत्तावादी आहें...स्वातंत्र्याची कोणतीहि चळवळ बहुजनसमाजाचीच असली पाहिजे...स्वातंत्र्याचा अर्थ ब्रिटिश वसाहती व ब्रिटिश साम्राज्यशाही यांपासून पूर्ण मुक्तता असा आहे. आपण आपलें स्वातंत्र्य मिळविल्यावर जागतिक सहकार्याचे व संघटनेचे सर्व प्रयत्न हिंदुस्थान मोठ्या आनंदानें मान्य करील यांत शंका नाहीं. इतकेंच नव्हे तर ज्या मोठ्या विश्वसंघाचा हिंदुस्थान हा एक घटक आहे त्यांतील एकाद्या मोठ्या घटकाच्या कल्याणासाठीं हिंदुस्थान मग आपल्या स्वातंत्र्याचाहि एकादा हिस्सा सोडण्यास तयार होईल." पंडितजींच्या विशाल ध्येयवादाच्या चतुःसीमा या त्यांच्या अध्यक्षीय भाषणांतील उताऱ्यावरून सहज लक्षांत येतील.

१९३० या वर्षी २६ जानेवारीला कांग्रेसच्या आज्ञेप्रमाणें लोकांनीं देशभर स्वातंत्र्यदिन पाळला. लक्षावधि लोकांनीं त्यांत भाग घेतला. फेब्रुवारी महिना संपताच व्हॉईसरॉयसाहेबांना हिंदी स्वातंत्र्याच्या मागणीचें पत्र पाठवून त्याला प्रतिकूल उत्तर येतांच गांधीजींनीं 'दांडीयात्रा' सुरू केली ! हिंदुस्थानच्या नागरिकाचा स्वातंत्र्यविषयक हक्क सिद्ध करण्याचें प्रतीक म्हणून, समुद्रकिनाऱ्यावरील दांडी या गांवीं कायदा मोडून मीठ गोळा करण्याकरितां गांधीजी आपल्या निवडक अनुयायांसह अहमदाबादेहून निघाले !

यानंतर कायदेभंगाचें विराट् स्वरूप दिसलें ! तुमच्यापैकीं कित्येकांना तो अद्‌भुत काळ आठवत असेल. एका प्रख्यात इंग्लिश कवीनें फ्रेंच राज्यक्रांतीच्या रोमांचकारी कालखंडाला उद्देशून म्हटलें आहे–"त्या काळीं नुसतें जिवंत असणें म्हणजे केवढें भाग्य ! पण तरुण असणें म्हणजे तर स्वर्गीय आनंद !!" बरोबर हेंच उद्गार त्या तीस सालच्या चळवळीला उद्देशून मी लावीन. कारण तो स्वर्गीय आनंद मीं उपभोगलेला आहे. शेंकडों स्त्रीपुरुष प्रभातफेऱ्यांत भाग घेत, देशाचा व देशभक्तांचा जयजयकार प्रभातींच कानीं पडे, दररोज कुणी तरी थोर देशभक्त पकडला किंवा कुठें तरी गोळीबार झाला अशी वार्ता येऊन प्रचंड खळबळ माजे, मिरवणुकी आणि हरताळ हा तर रोजचाच देखावा असे, गुप्त हस्तपत्रकें अचानक हातीं येत–एकंदर देश आमूलाग्र ढवळून निघाला. यांतच शेंकडोंनीं शिरलेल्या युवकांनीं कारागृहांतून समाजवादाचा अभ्यास आरंभिला आणि काँग्रेसच्या राष्ट्रवादी प्रवाहाला नवा समाजवादी लोंढा येऊन मिळण्यास आरंभ झाला.

ही चळवळ एक वर्ष झाल्यानंतर व्हॉईसरॉय लॉर्ड अर्विन आणि गांधीजी यांच्यांत एक समेटाचा करार झाला. काँग्रेस कारागृहाबाहेर आली. आणि तो करार कराची येथे भरलेल्या काँग्रेसमध्यें मान्य करण्यांत आला ( १९३१ ). कराचीला सरदार पटेल अध्यक्ष होते. सर्व लोकाना सुख व समान संधि देण्याबद्दलचा काँग्रेसचा जाहीरनामा येथेंच प्रसिद्ध झाला. गांधीजी गोलमेज परिषदेच्या दुसऱ्या बैठकीला गेले. त्यांनीं हिंदुस्थानबद्दलची राष्ट्रीय भूमिका उत्कृष्ट रीतीनें इंग्लिश लोकांपुढें मांडली. त्यांच्या लोकोत्तर व्यक्तित्वानें पाश्चात्य लोक भारावून गेले. पण इकडे हिंदुस्थानांत दडपशाहीची तयारी चालली होती ! गांधीजींचे पाय हिंदुस्थानच्या किनाऱ्याला लागण्याचे आधींच पं. जवाहरलाल नेहरूंना अटक झाली ! गांधी–अर्विन करारांतली कलमें पाळण्याकडे सरकार दुर्लक्ष करूं लागलें. दडपशाहीचा वरवंटा जोरानें फिरूं लागला ! कांहीं दिवसांपूर्वी सन्मान्य पाहुणे म्हणून विलायतेस गेलेले गांधीजी सरकारचे कैदी बनले.

याच कारावासांत गांधीजींनीं जातीय निर्णयांतील अस्पृश्यांच्या बाबतींत जागांचें वाटप बदलून घेण्याकरितां प्रायोपवेशन सुरू केलें ! कौन्सिलांत हिंदी लोकांना कोणत्या प्रमाणांत जागा असाव्या याबद्दल मुख्य प्रधान रॅम्से मॅकडोनाल्ड यांनीं आपला निवाडा दिला होता. त्या निवाड्यास अनुसरून अस्पृष्ट समाज हा हिंदु जातीच्या बाहेरील ठरावा असें होणार होतें ! गांधीजींना तें नको होतें म्हणून अगोदर सरकारला इशारा देऊन त्यांनीं प्राणांतिक उपोषण सुरू केलें ! हिंदुस्थानांतील सर्व पक्षांचे पुढारी एकत्र येऊन पुणें येथें याबाबत नवा करार झाला. तो गांधीजींना मान्य झाला आणि सरकारनेंहि जातीय निवाड्यांत तशी दुरुस्ती करण्याचें मान्य केलें. तेव्हां गांधीजींनीं उपास सोडला. ही गोष्ट सप्टेंबर १९३२ च्या शेवटच्या आठवड्यांत घडली.

तुरुंगांत जाणाऱ्या लोकांना कर्तव्यापेक्षा सुखविलास अधिक महत्वाचे वाटतात अशीं गांधीजींना कांहीं उदाहरणें आढळलीं आणि त्यांनीं कायदेभंग तहकूब केला ! पुनः काँग्रेस सनदशीर ठरली. अन्सारी, बिधनचंद्र रॉय, भुलाभाई वगैरे 'उजव्या गटा'च्या लोकांनीं स्वराज्यपक्षाचें पुनरुज्जीवन केलें. मध्यवर्ति असेंब्लींत काँग्रेसपक्ष मोठ्या बहुमतानें निवडून आला.

पुढें १९३५ चा स्वायत्तता देणारा कायदा जन्माला आला. हा कायदा मोडण्यासाठीं आंत शिरायचें काँग्रेसनें ठरविलें. १९३६ सालीं महाराष्ट्रांत फैजपूरला पहिली खेडेगांवीं काँग्रेस भरली. अपूर्व उत्साह होता. पं० जवाहरलालजींना लागोपाठ दुसऱ्यांदा अध्यक्षपदीं निवडून देऊन राष्ट्रानें त्यांच्या लोकोत्तर राष्ट्रसेवेचा गौरव केला. निवडणुकीचा कार्यक्रम या काँग्रेसमध्यें ठरला. आणि ७ प्रांतांत काँग्रेसला बहुमत मिळून १९३७ सालीं काँग्रेस मंत्रिमंडळें या सर्व प्रांतांत सुरू झालीं.

या मंत्रिमंडळाच्या सुरवातीलाच मंत्र्यांच्या कारभारांत बेकायदेशीर ढवळाढवळ करणार नाहीं असें आश्वासन हिंदुस्थानसरकारकडून काँग्रेसनें जवळ जवळ वदवून घेतलें ! सर्व प्रांतिक असेंब्लींतील व कौन्सिलांतील प्रतिनिधींचें

एक राष्ट्रीय संमेलन (National Convention) पं० नेहरूंनीं बोलावून घेतलें आणि प्रत्येक प्रतिनिधीकडून राष्ट्रसेवेची शपथ घेवविली. सर्व प्रांतिक असेंब्लींत घटनासमितीचा ठराव पास करून घेण्यांत आला. आपल्या पक्षाची शिस्त ज्यांनीं पाळली त्या अल्प-संख्यांकाच्या प्रतिनिधींना कॉंग्रेसनें आपल्या मंत्रिमंडळांत जागा दिल्या. कुळकायदा करून शेतकऱ्यांना संरक्षण देणें, मद्यपानबंदी, वर्धाशिक्षणयोजना, वनचराईची माफी इ० गोष्टी कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या नांवें जमा करण्यास हरकत नाहीं. कॉंग्रेसनें संयुक्त प्रधानमंडळें बनवावीं असा एक आग्रह होता. त्या आग्रहाचा प्रपंच पुढें करूं. कॉंग्रेसमंत्रिमंडळांनीं केलें याहून खूपच लोकहित करायला पाहिजे होतें हें खरें. पण खुद्द कॉंग्रेसला अंतरंगातील विसगतींनीं घातलेल्या मर्यादा आणि कायद्यानें दिलेले तोटके हक्क या गोष्टी विचारांत घ्यायला नकोत का?

१९३८ सालीं हरिपुरा येथें कॉंग्रेस भरली. सुविख्यात बंगनेते सुभाषचंद्र बोस तिचे अध्यक्ष होते. या कॉंग्रेसच्या वेळीं संयुक्त प्रांत व बिहार येथें सरकारनें मुख्य प्रधानांच्या हाताखालील अधिकाऱ्यांना गव्हर्नरांच्या जागा दिल्यानें पेचप्रसंग निर्माण झाला होता. कॉंग्रेस मंत्रिमंडळांनीं राजिनामे दिले! पण सरकारनें नमतें धोरण स्वीकारल्यानें शेवट गोड झाला. १९३९ सालीं त्रिपुरी येथें कॉंग्रेस भरली. सुभाषबाबूंनीं पुनः अध्यक्ष निवडून येण्याचा अट्टाहास केला आणि दुसरे उमेदवार डॉ० पट्टाभिसीतारामय्या यांचा पराभव करून ते निवडूनहि आले! हा लोकांना जहाल पक्षाचा विजय वाटला, वास्तविक तो सुभाषबाबूंच्या व्यक्तिमत्त्वाचा विजय होता. कारण 'उजवे' पुढारी सहकार्य करीत नाहींत असें दिसतांच कॉंग्रेसचें विराट यंत्र चालविण्याची ताकद आपणांत नाहीं ही खात्री सुभाषचंद्रांना पटली व त्यांनीं अध्यक्षपदाचा राजिनामा दिला!

कॉंग्रेस अधिकाराच्या जागीं अधिक कांहीं काळ असती तर स्वतः आरंभिलेल्या कित्येक सुंदर योजना पुऱ्या करून तिनें जनतेचा दुवा याहून मोठ्या

प्रमाणावर मिळविला असता. पण युरोपखंडांत महायुद्ध सुरू झालें. आणि कॉंग्रेसनें मंत्रिपदाचीं वस्त्रें खालीं ठेवलीं! याचा कार्यकारणसंबंध काय याची सविस्तर चर्चा मी पुढें करीन. आज एवढेंच सांगतों कीं युद्धाशीं सहकार्य करायचें नाहीं असें कॉंग्रेसनें ठरविलें. वैयक्तिक सत्याग्रहाची चळवळ करुन २५ हजारांवर सत्याग्रही तुरुंगांत गेले! कॉंग्रेसला सहकार्याचे भूमीवर आणण्यासाठीं १९४२ सालच्या वसंतऋतूंत सर स्टॅफर्ड क्रिप्सना एक योजना घेऊन ब्रिटिश सरकारनें इकडे पाठविलें होतें. पण त्या योजनेंत संरक्षण व राष्ट्रीय सरकार या बाबतींत खऱ्या अधिकाराचें दान केलेलें नसल्यानें कॉंग्रेसनें ती योजना फेटाळली. यानंतर ८ आगस्टला मुंबईस ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीची रोमहर्षण सभा कशी गाजली, 'चालते व्हा' (Quit India) असा आदेश ब्रिटिशांना गांधीजींनीं कसा दिला, तथापि गांधीजींनीं व्हॉइसरॉयची भेट घेण्याची व तडजोडीची इच्छा प्रदर्शित कशी केली, कॉंग्रेसनें चळवळ सुरू करण्यापूर्वीच कॉंग्रेसपुढाऱ्यांना अचानक रीतीनें स्थानबद्ध कसें करण्यांत आलें, त्यामुळें लोकक्षोभ कसा माजला आणि तो दडपून टाकण्याचा निष्ठुर प्रयत्न सरकारनें कसा केला याचा इतिहास ताजा आहे! तो सविस्तर सांगायचा कशाला?

अशा रीतीनें कॉंग्रेसच्या स्थापनेपासून आतांपर्यंतचा हा भव्य इतिहास आपण पाहिला. वैभव आणि वनवास, सत्ता आणि कारावास दोनहि ऐश्वर्यें कॉंग्रेसनें भोगिलीं आहेत. कॉंग्रेसमध्यें उणीवा काय हजार आहेत! पण राष्ट्रवादाच्या अत्यंत व्यापक पायावर देशांतली राष्ट्रभक्ति आणि क्रांतिशक्ति कॉंग्रेसनें संघटित केली हें डोंगराएवढें कार्य दिसत असतां त्याकडे डोळेझाक करणारे राष्ट्राची सेवा खास करीत नाहींत! याहून त्यांचा कडक धिःकार करण्याची माझी इच्छा नाहीं. आतां कॉंग्रेसनें ज्या लोकसत्तेसाठीं गेलीं ५०-६० वर्षें झगडा केला त्या लोकसत्तेची कल्पना आपणांला करुन घ्यायची आहे.

---

३१-१-४३

# लोकशाही : : ४

कोणाचें प्रभुत्व समाजावर असावें हे जसें माणसावर असतें तसें समाजस्थितीवरहि असतें. या तत्त्वाच्या स्पष्टीकरणासाठीं मी एक दाखला देतों. एका इंग्रज नाटककारानें एका नाटकांत असें दाखविलें आहे कीं, एका मोठ्या श्रीमंत कुटुंबांत एक भला बळकट आणि कार्यकुशल चाकर असतो; हे कुटुंब एकदां एका बेटावर वादळांत सांपडतें आणि तेथें निसर्गाच्या सान्निध्यांत त्या नाजुक श्रीमंत मंडळींना आपलें रक्षण व पोषण कसें करावें हें कळत नाहीं; हा चाकर तेथें समर्थ ठरतो आणि त्यांचा पुढारी बनतो; पण पुनः शहरांत आल्यानंतर पूर्वीची स्थिति येते. श्रीमत मंडळी सत्ता गाजवूं लागतात; चाकर पुनः देवडीवर जाऊन बसतो ! कुणाचें राज्य कुठें चालतें हें कळण्यास एवढा दाखला पुरेसा नाहीं का ? याच विचारानें समाजाच्या आरंभापासून आजपर्यंत वेगवेगळ्या काळीं जसजशी समाजस्थिति बदलत गेली तसतशी शासनाची पद्धतीहि बदलली. आज सर्वसामान्य मत जर घेतलें तर 'लोकशाही ही शासनाची आदर्श पद्धति मानण्यांत येते यांत शंका नाहीं. एकत्र राहून, एकमेकांच्या सहकार्यानें आपापलीं जीवितें सुखी करण्याच्या ज्या पद्धति माणसांनीं आजवर सुधारत आणिल्या त्यांत ही पद्धति सर्वोत्कृष्ट आहे. आपल्यावर कोणीं राज्य करावें, कसें करावें, आणि आपल्या सर्वांच्या हितासाठीं शासनसंस्थेनें कसें वागावें हें ठरविण्याचा अधिकार लोकांचा आहे. असें

सांगणारी राज्यपद्धति ती लोकशाही असें थोडक्यांत सांगतां येईल. सुमारें दोन शतकांपूर्वी अमेरिकेनें इंग्रजी सत्तेच्या दास्यांतून आपली मुक्तता करून घेतली. अमेरिकेचें स्वातंत्र्ययुद्ध तें हेंच. अमेरिकेनें जगातल्या स्वातंत्र्यप्रेमी लोकांना एक कायमचें स्फूर्तीस्थान स्वतःच्या उदाहरणानें निर्माण केलें. यावेळीं अमेरिकन स्वातंत्र्यवीरांनीं एक जाहीरनामा काढला होता. त्यात असा एक भाग आहे.

"सर्व मानव हे जन्मतः समान निर्मिलेले आहेत. परमेश्वरानें त्या सर्वांना कांहीं अविनाशी हक्क दिले आहेत. अशा हक्कांत जीवित, स्वातंत्र्य आणि सुखाचा प्रयत्न हे प्रमुख आहेत. या हक्कांच्या शाश्वतीसाठींच सरकारें निर्माण करण्यात येत असतात आणि लोकांच्या सम्मतींतून त्यांचमा न्याय्य सत्तेचा उद्भव होत असतो. जेव्हा कोणतीहि राज्यपद्धति या साध्यांना हानिकारक होऊं लागते तेव्हा ती राज्यपद्धति बदलण्याचा अथवा नष्ट करण्याचा आणि आपल्या सुखास व सुरक्षिततेस अधिकांत अधिक पोषक होईल अशा तत्त्वांच्या आधारावर आपल्या मतानुसार नवें राज्य स्थापन करण्याचा हक्क तेथील लोकांना असतो."

(आचार्य जावडेकरकृत 'लोकशाही' पृ. ३६)

Glimpses of World History या आपल्या नामांकित ग्रंथांत पंडित जवाहरलाल नेहरूंनीं सूत्ररूपानें पण स्पष्टपणें 'लोकशाहीची' ओळख करून दिली आहे. पंडितजी म्हणतात—

"लोकशाही स्वातंत्र्याची राजकीय बाजू होय. हुकूमशाही आणि इतर सोटेशाही राज्यपद्धति यांच्या विरुद्ध झालेली ही प्रतिक्रिया आहे. वर्गकलह दारिद्र्य, किंवा इतर औद्योगिक प्रश्न यांवर लोकशाही कांहीं विशेष इलाज सुचवितें असें नाहीं. प्रत्येक व्यक्तीला तात्त्विक दृष्टीनें स्वातंत्र्य असावें आणि आपल्या नैसर्गिक गुणांची वाट त्या व्यक्तीनें स्वतःच्या फायद्यासाठीं करावी

आणि मग सर्व समाज उन्नत व्हावा या धोरणावर लोकशाहीचा भर असतो."
(पृ. ४०५)

" अर्थात् सर्व माणसें समान आहेत असें लोकशाही कधींच सांगत नाहीं."
(पृ. ५२८)

एकंदर मानवी जीवनाचा विचार अर्थशास्त्राच्या आधारें करण्याची नवी ऐतिहासिक दृष्टि निघाली आहे. तीमधील आत्यंतिकता तूर्त आपण सोडून देऊं. पण स्थूल मानानें विकसित होत चाललेल्या सामाजिक अवस्थांचा उलगडा या नव्या दृष्टीनें कांहीं मर्यादेपर्यंत खासच होतो हें सत्य आहे. या नव्या दृष्टीप्रमाणे समाजांत अन्नवस्त्र उत्पन्न करण्याचीं साधनें जशीं असतील तशी त्या समाजाची नीति, संस्कृति व शासनपद्धति असावयाची, आणि म्हणूनच लोकशाहीची कल्पना प्रकट होण्यास एका विशिष्ट पातळीपर्यंत समाजाची उन्नति होणें अवश्य असतें असें नवीन दृष्टीचे इतिहासतज्ञ म्हणतात.

मनुष्य टोळ्या करून रानटी स्थितींत राहात असे तेव्हां आपल्या टोळींत जो कोणी विशेष सशक्त, चतुर, हिकमती असेल त्याच्या नेतृत्वाखालीं वागावें अशी साहजिकच माणसांची प्रवृत्ति असे. निसर्गावर माणसाचा ताबा मुळींच नव्हता आणि म्हणूनच अंधश्रद्धा, भिती, विभूतिपूजन, दैववाद इ० गोष्टींचा अंमल मनुष्यमात्रावर असे. अर्थात् प्रत्येक मनुष्य स्वतंत्र आहे इ० अलीकडील विचार त्या काळीं माणसांना सुचणेंहि शक्य नव्हतें. एका टोळीचा नायक पराभूत झाला तर जो नवा प्रबलतर जेता असेल त्याच्या अंकित राहावयाचें एवढेंच माणसें जाणत.

यानंतर मनुष्यानें आपल्या बुद्धिबळावर आपलीं उत्पादन साधनें वाढविण्यास आणि अधिक प्रभावी करण्यास सुरुवात केली. हा काळ सरंजामशाहीचा होय. सम्राट्, राजे, महाराजे, सरदार, जमीनदार, यांच्या प्रभुत्वाचा उत्कर्ष या काळात झाला. ज्याच्याजवळ जमीन जास्ती तो अनेक कुळांना पदरी

पोसून धान्य निर्माण करी, आणि त्या धान्याच्या मोबदला शस्त्रास्त्रें व जीवनोपयोगी तशाच चैनीच्या वस्तू खरीद करी आणि आपल्या प्रदेशाचा नायक होऊन बसे. ह्या काळांतहि विभूतिपूजनाचा जोर होता. राजे व लक्ष्मीपुत्र यांनीं वंशपरंपरागत सत्तेचें तत्त्व वाढीस लावलें आणि समाजांतील भिक्षुकवर्ग व बुद्धिमान् शिक्षित मंडळी या सरंजामशहांच्या आधारावर जगत असल्यानें त्या तत्त्वास या लोकांनीं भरपूर खतपाणी घातलें. हिंदुस्थानांत आजहि सरंजामशाहीचे अवशेष संस्थानिक व जमीनदार यांच्या रूपानें सर्वत्र पसरलेले आढळून येतात. युरोपमध्यें मात्र सरंजामशाहीचें प्राबल्य मध्य-युगापर्यंतच होतें.

कारण हें प्राबल्य नामशेष करणारी प्रचंड शक्ति तिकडे त्या वेळीं उत्पन्न झाली. यंत्रकलेचा उदय झाला. दुर्बिणीचा शोध लागला. होकायंत्रानें अफाट समुद्रांत दिशा कळण्याची सोय झाली. वाफेच्या एंजिनांनीं वाहतूक व उत्पादन या कामीं मोठीच क्रांति केली. यंत्रकलेंतले जे कोणी संशोधक होते ते बुद्धीवर भिस्त ठेवून चालणारे होते. बायबलांत अमुक लिहिलें आहे एवढ्यावरून तें मानलेंच पाहिजे अशी या संशोधकांची प्रवृत्ति असणें शक्यच नव्हतें. प्रत्यक्ष प्रयोगावर त्यांची भिस्त होती. परंतु प्राचीन श्रद्धा व अंध रूढी यांच्या बळावरच आपली प्रतिष्ठा व वैभव ज्यांना टिकवावें लागत होतें ते राजे व सरदार आणि त्यांचे भिक्षुक वगलवच्चे या बुद्धिप्रामाण्यवादी लोकांचा छळ करूं लागले. विज्ञानशास्त्राची प्रगति व तीवरोवर येणारें बुद्धिस्वातंत्र्य यांच्याशीं सरंजामशाहीनें व धर्मसंस्थेनें उभा दावा मांडला.

पण इतिहासाची प्रगति त्यामुळें खंडित थोडीच होणार ? विज्ञानशास्त्रांचा पसारा वाढूं लागला आणि त्यांतूनच लोकशाहीची कल्पना विकसित झाली. पं. नेहरूंनीं आपल्या ' जगाच्या इतिहासां ' त हेंच थोडक्यांत सांगितलें आहे—

" धर्म आणि आस्तिकवाद यांच्या कर्मठपणाशीं या लोकशाहीच्या प्रणेत्यांनीं केलेली भाषणस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य यांची मागणी जुळण्यासारखी नव्हती. म्हणूनच लोकसत्तेनें विज्ञानशास्त्राशीं मैत्री जोडली आणि आस्तिकवादाचा दुराग्रह दुबळा करण्यास भाग केलें." ( पृ. ४३० ).

पण चारदोन संशोधकांनीं एवढ्या बलाढ्य सरंजामशाहीचा डोलारा उलथून पाडला का? मुळींच नाहीं. त्याच काळीं जो महत्त्वाकांक्षी वैश्यवर्ग उदयाला येत चालला होता त्यानें या विज्ञानशास्त्रज्ञांना साह्य केलें. यंत्रकलेंत नवे नवे शोध लागत आणि माणसांचें उत्पादनसामर्थ्य त्या प्रमाणांत वाढत जाई. खंडोगणती माल तयार करणें आणि जगाच्या बाजारपेठांत तो विकायला घेऊन जाणें ह्या कामांत व्यापारी पुढें सरसावले. अनेक शूर दर्यावर्दी लोकांनीं जिवाची तमा न करतां वारेवादळात दूरदूरच्या देशांचे जलमार्ग शोधून काढले. आणि या साऱ्या घडामोडींत व पर्यटनात नवे नवे विचारप्रवाह व्यापारी-वर्गाच्या जीवनांत येऊन विचारक्रांतीला आरंभ झाला. याच विचारक्रांतींतून पुढें धर्मक्रांति झाली.

व्यापारी वर्गानें ही जी नवीन युगाची भेरी फुकली तीमुळें पिढ्यान्‌पिढ्या सुखवस्तूपणांत घालविलेले सरंजामशहा बेचैन झाले. यंत्रकलेमुळें उत्पादनांत प्रचंड वाढ होणार आणि तीमुळें व्यापारी वर्ग बलिष्ठ व संपन्न होणार हें भवितव्य सरंजामशहांना कळून चुकलें. आणि म्हणून ते पराकाष्ठेचें जुलमी वर्तन करूं लागले. साहजिकच आपला विकास आतां खुंटत जाणार हें पाहून व्यापारी वर्ग सरंजामशाहीच्या विरुद्ध उठला. सरंजामशाहीच्या अवजड चक्राखालीं चिरडला जाणारा बहुजनसमाज व्यापारीवर्गाच्या प्रगतिपर धोरणानें थोडाफार उन्नत होणार होता. मग त्यानें व्यापारी वर्गाला आपलें पाठबळ दिलें यांत कोणतें आश्चर्य? अशारीतीनें सरंजामशाही वतनदारांचा नायनाट लोकशाहीच्या जयघोषात करून व्यापारी वर्ग पुढें सरसावला. १६४९ च्या जानेवारींत पहिला चार्लस् राजा इंग्लिश प्युरिटन लोकांनीं सुळावर चढविला! हीच लोकशाहीची पहिली फार मोठी क्रांति होय. नंतर इंग्लंडांत व युरोपांतील इतर देशात कधीं जहाल तर कधीं नेमस्त उपाय योजून लोकसत्तात्मक संस्कृतीनें सरंजामशाहीची वासलात लाविली. अठराव्या शत-कात झालेली फ्रेंच राज्यक्रांति ही देखील लोकशाहीच्या इतिहासातली एक रोमहर्षण घटना आहे.

" समता ( Equality), बंधुता (Fraternity), स्वतंत्रता (Liberty)" हा दशाक्षरी मंत्र लोकशाहीनें जगाला दिला. या मंत्राच्या जोरावरच लोकशाहीच्या प्रणेत्यांनीं फ्रेंच राज्यक्रांति यशस्वी केली. आणि याच मंत्राचा जप करीत पिट्–वेलिंग्टन प्रभृति इंग्लिश धुरंधरांनीं नेपोलियनच्या सोटेशाही सत्तेचा पाडाव केला. अशा या सामर्थ्यवान् मंत्राचें रहस्य काय ?

या दशाक्षरी मंत्रापैकीं बंधुता ही भावना सहज कळण्यासारखी आहे. अखिल मानवप्राणी हीं परमेश्वराचीं लेंकरें होत या तत्त्वाचें सूत्र बंधुता या शब्दांत गोविलें आहे. तथापि ही आध्यात्मिक कल्पना ज्या कोणास पसंत नसेल त्यांना मानवतेचें एक कुटुंब, आणि माणसें हे त्या कुटुंबाचे घटक, ही कल्पना तरी आवडेल कीं नाहीं ?

समता हा शब्द पुरेसा सुबोध आहे. पण लोकशाहींत अंतर्भूत असलेलें समतेचें तत्त्व हास्यास्पद अतिरेकाला नेण्याचें मात्र टाळलें पाहिजे. बुद्धिमान् आणि मंद, पराक्रमी आणि भेकड यांना सारख्याच मोलानें लेखावें असें लोकशाही कसें सांगेल ? लोकशाही समतेची मागणी करते ती एवढ्यापुरतीच की, कोणालाहि वंशपरंपरेनें अथवा अन्य मिरासदारीनें जादा अधिकार दिले जाऊं नयेत. प्रत्येक व्यक्तीला आपला विकास करून घेण्यास अवसर असावा. इंग्लंडचे जगविख्यात राज्यशास्त्रज्ञ प्रो. हॅरॉल्ड लास्की म्हणतात—

"समतेचा खरा अर्थ म्हणजे खास सवलतींचा अभाव हा होय."

[ Grammar of Politics, P. 153 ]

प्रो. लास्की आणि त्याचा जगन्मान्य ग्रंथ यांचीं नांवें निघालीं म्हणून त्यांचीच अधिकारवाणी पुनः तुम्हांला सांगण्याचा मोह होतो. या उताऱ्यांवरून स्वतंत्रता आणि नागरिक हक्क यांचें स्वरूप तुम्हांला कळेल.

" राजसत्तेचें काम कोणीं अंगावर घ्यावें हें ठरविण्याचा हक्क प्रत्येक जाणत्या नागरिकाला आहे." (पृ. ११५)

" भाषणस्वातंत्र्य आणि त्यांतच अंतर्भूत असलेलें सभास्वातंत्र्य हें एकतर असंतोष दूर करणारें रसायन आहे आणि दुसरें, सुधारणेचेंहि तें साधन होय." (पृ. १२१).

" माणसाला आपला सर्वांगीण विकास ज्यायोगें करून घेतां येईल अशा वातावरणाची जपणूक म्हणजेच स्वतंत्रता असें मी समजतों. स्वतंत्रता हें वृक्षाचें फळ होय." (पृ. १४२)

या उताऱ्यांच्या पूर्तीसाठीं २ मार्च १९२३ रोजीं म. गांधीजींनीं काढलेले उद्गार द्यावेसे वाटतात—

"लोकशाही म्हणजे माणसांना मेंढरासारखें वागायला लावणारी अवस्था खास नव्हे. लोकशाहीच्या छत्राखालीं व्यक्तीचें मतस्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य तत्परतेनें रक्षिलें जातें."

समता, बंधुता, स्वतंत्रता या दशाक्षरी मंत्राचें रहस्य या उताऱ्यांवरून कळून येईल. आणि तें कळलें म्हणजे लोकशाहीनें राष्ट्रवादाला कसा जन्म दिला याचें वेगळें स्पष्टीकरण करावें लागणार नाहीं. इंग्लंड व फ्रान्स या देशांत लोकशाहीच्या विजयानें सरंजामशाही कोसळून जमीनदोस्त झाली आणि अमेरिकेनें राष्ट्रवादाच्या जयजयकारांत लोकशाहीची पूजा बांधिली.

आपल्यावर कोणी राज्य करावें हें ठरविण्याचा हक्क प्रत्येक नागरिकाला असावा हें लोकशाहीचें आद्य तत्त्व आहे. या तत्त्वालाच अमेरिकन स्वातंत्र्यवादी पुढाऱ्यांनीं *No taxation without representation* (प्रतिनिधित्व नाहीं तर कर नाहीं) या घोषवाक्यानें जगभर प्रसिद्धी दिली. नागरिकाला आपला हक्क वापरण्याचें माध्यम म्हणजे मतदानाचा हक्क हें होय.

या मतदानाच्या हक्कानेंच आपणांला हितकारक होईल असें सरकार लोक नियडून आणूं शकतात, यावर कांहीं दीर्घशंकी लोक म्हणतात कीं, "अहो, बहुजनसमाज म्हणजे एक मोठा जडबुद्धि जमाव. त्यांना आपलें हिताहित काय

कळणार आहे! मतदानाच्या हक्काचा दुरुपयोग मात्र होतो.' बहुजनसमाजाला आपल्या खऱ्या हितकर्त्यांची ओळख पटत नाहीं हें म्हणणें हा माणसांच्या सामुदायिक ज्ञानाचा केवळ उपमर्द होय. रस्त्यानें जाणारा कुणीहि सामान्य माणूस आपल्या अथवा समाजाच्या हिताचा जाणकार नसेल कदाचित्, पण सर्व समाजाची सामुदायिक बुद्धि बहुधा अचूक निर्णय घेते. ही बुद्धि जिवंत व कुशाग्र राहावी याकरितां स्वतंत्र वृत्तीच्या नेत्यांनीं भाषण व कृति यांच्या साह्यानें नेहमीं उद्बोधन करीत राहिलें पाहिजे. लोकमताला वारंवार चैतन्य व नवी दृष्टि मिळत राहावी आणि कोणत्या पंथाचा अधिकार आपणांला सुखावह होईल हें कळावें यासाठीं नव-विचारांची खळबळ सारखी चालली पाहिजे. आणि म्हणूनच उदार राजनीतिज्ञांनीं भाषणस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य या तत्त्वांना उचलून धरिलें आहे.

लोकसत्तेचा ध्वज युरोपीय व्यापारी वर्गानें उंच फडफडत ठेविला आणि यंत्रकलेच्या साह्यानें त्या वर्गानें जीर्ण जगाच्या ऐवजी नवी सृष्टि निर्माण केली हें श्रेय कुणीहि नाकबूल करीत नाहीं. परंतु लोकशाहीच्या अरुणोदयकाळीं जो आदर्श म्हणून पुढें ठेवण्यांत आला होता तो सत्यसृष्टींत कधींच येऊं शकला नाहीं. व्यापारीवर्गानें सरंजामशाहीच्या विरुद्ध निकराचा व यशस्वी लढा केला हें खरें. पण पुढें याच वर्गानें भांडवलशाही संस्कृतीचा विकास करून विषमतेचें तांडवनृत्य हवें तसें चालू दिलें! बंधुभाव नाहींसा झाला आणि भांडवलशाहीची प्रौढ अवस्था जी साम्राज्यशाही तिनें स्वतंत्रतेची गळचेपी केली. राष्ट्रवादाचें निर्मळ रूप नष्ट होऊन त्यांतून फॅसिस्ट–नाझी पद्धतीचा भस्मासूर निर्माण झाला! आणि म्हणूनच पं० नेहरूंना पुढील उद्गार काढावे लागले—

"एकोणिसाव्या शतकांत लोकशाही हें मोठें ध्येय समजलें जाई. एकोणिसावें शतक म्हणजे लोकशाहीचें शतक असेंच म्हणता येईल. अखेर लोकशाही

यशस्वी झाली, परंतु ती यशस्वी झाल्यानंतरच तिच्यावरील लोकांची श्रद्धा नाहींशी होऊं लागली." [Glimpses of World History, P. 405]

हें असें झालें नसतें तरच नवल! कारण लोकशाहीचे आद्य प्रणेते हे जरी मानवतेच्या कल्याणासाठीं तळमळणारे महानुभाव होते तरी त्यांना ज्या वैश्य वर्गानें साह्य केलें तो वर्ग कळत न कळत स्वार्थी व भौतिक कारणांनींच झुंझार बनला होता. फक्त सरंजामी सत्तेचा अडसर त्याला दूर करायचा होता. लोकशाहीचा जय होतांच आपल्या उन्नतीसाठीं सारीं तत्त्वें रावविण्यास व्यापारी वर्गानें सुरुवात केली. आणि लोकांना हक्क मिळाले ते निर्भेळ दूध नसून पीठ कालविलेलें पाणी होतें हें कटु सत्य कळून आलें. कारण—

"मतदानाच्या हक्काचा उपयोग भुकेल्या माणसाला क्वचितच होतो. त्याच्या भुकेचा फायदा घेऊन आपल्या हिताकरितां त्याला राबविणें ज्यांना शक्य आहे, त्यांनाच मतदानाच्या हक्काचा खरा उपयोग होतो. यामुळेच मतदानाच्या हक्कानें मिळूं पाहणारी राजकीय सत्ता म्हणजे आर्थिक सत्तेवांचून असलेली सत्त्वशून्य छाया ठरली, आणि मतदानामागून समता अवतरेलच अशाविषयींचीं लोकसत्तेच्या आद्य प्रणेत्यांचीं उदात्त स्वप्नें हवेंतच विरलीं."

[Glimpses of World History, P. 529]

याचसंबंधीं प्रो. हॅरॉल्ड लास्की यांचें पुढील वचन ऐका—

"खऱ्या आर्थिक समतेवांचून राजकीय समतेला अर्थच नाहीं. आर्थिक समता नसेल तर राजकीय समता ही अ[illegible]नी घटीक हो[illegible]ास."

विलक्षण चढाओढ लागलेली आहे. आणि म्हणूनच आज तरी लोकशाहीच्या समंजस चहात्यांना युरोपांतल्या या दोन्ही शासनपद्धति त्याज्यच वाटतात. समाजवादाचा अध्वर्यु निकोलाय लेनिन यांनीं मानव जातीच्या अंतिम विकासाचें शब्दचित्र थोडक्यांत रंगविलें होतें...लेनिन म्हणे—

"समाजवादाच्या प्रतिष्ठापनेसाठीं धडपड करतांना आपण हें लक्षांत ठेवलें पाहिजे कीं, याचा विकास साम्यवादात होईल, आणि एकंदर जनतेविरुद्ध उपयोगांत आणलीं जाणारीं हिंसात्मक शासनें आणि एका माणसाचें वा समूहाचें दुसऱ्या माणसांशीं वा समूहाशीं राहणारें दास्याचें नातें हीं लयाला जातील. कारण मग माणसें सत्तीवांचून आपखुषीनें सामाजिक जीवनाचीं अनुशासनें पाळतील."

लेनिनचें हें सुखस्वप्न खरें ठरेल काय ! ठरलें तर सोन्याहून पिवळें होईल. पण तें तसें ठरण्याच्या मार्गांत केवढ्या दुर्लंघ्य अडचणी आहेत !

महाराष्ट्राचे विख्यात राजशास्त्रज्ञ आचार्य जावडेकर यांचे पुढील विचार या दृष्टीनें मननीय वाटतील.

"लोकशाही संस्कृति ही बुद्धिस्वातंत्र्यावर अधिष्ठित झालेली असून हें बुद्धिस्वातंत्र्य सत्यसंशोधन आणि सत्यनिष्ठेवर अधिष्ठित असतें. या सत्यनिष्ठेस परिग्रहवृत्ति किंवा लोभ आणि हिंसावृत्ति या मारक असतात. लोभ आणि हिंसा यांमुळें असत्यच सत्य भासूं लागतें आणि न्यायाच्या नांवानें अन्यायाची संस्थापना होत असते. युरोपांतील फॅसिस्ट आणि कम्युनिस्ट पक्षांत अनुक्रमें परिग्रहाचा लोभ आणि हिंसा या वृत्ति दिमून येतात. भांडवलशाही संस्कृतीची परंपरा रक्षण करण्यासाठीं निर्माण झालेलें फॅसिस्ट तत्त्वज्ञान आणि तिचा हिंसेनें उच्छेद करणारें कम्युनिस्ट तत्त्वज्ञान हीं दोन्ही लोकशाहीला मारक झालेलीं आहेत. यावरून परिग्रह किंवा हिंसा यांच्यामुळें लोकशाहीचा अंत होतो हें स्पष्ट आहे." (लोकशाही पृ. १४८)

यावर आचार्य जावडेकर यांनीं सुचविलेली योजना अत्यंत सुंदर असून राष्ट्रवाद, समाजवाद, आणि लोकशाही यांचा समन्वय तींत आहे. तिचीं मूलतत्त्वें प्राचीन हिंदुसंस्कृतीच्या आध्यात्मिक विचारसंपदेंतून निघालेलीं आहेत.

" जोंपर्यंत समाजाच्या आर्थिक घटनेंत अन्याय आहे, तोंपर्यंत...अपरिग्रही व अहिंसानिष्ठ यतींची आवश्यकता त्यांचें नेतृत्व करण्यासाठीं लागेल. सर्व समाजांतील लोभ आणि भीरुता यांच्यातून निर्माण होणारी हिंसा नष्ट करण्यास, अशा सत्यनिष्ठ अहिंसावादी व अपरिग्रही यतींच्या नेतृत्वाखालीं लोकशाहीचा राज्यकारभार बराच काळ चालला, सर्व अन्याय्य आर्थिक व सामाजिक संस्थांत क्रांति होऊन समाजरचनेचा पाया न्यायावर घातला गेला, सर्व व्यक्तींचीं अतःकरणें लोभ आणि भय यांच्यापासून मुक्त होऊन सत्यनिष्ठ आणि न्यायनिष्ठ बनलीं, असत्याचरण व अन्याय करण्यांत मनुष्याच्या अंतःकरणाला स्वभावतः दुःख होऊं लागलें आणि परदुःख निवारण्यांत आनंद होऊं लागला, म्हणजे सत्ययुगाची प्राप्ति होऊन आत्मराज्य प्रस्थापित होईल. या आत्मराज्यांत आजच्या लोकराज्यांत दिसून येणाऱ्या दंडसंस्था पोलिस, लष्कर, तुरुंग यांची समाजाला आवश्यकताच उरणार नाहीं...लोकशाहीची अंतिम परिणति हीच होय. " (लोकशाही पृ. १४९).

पण हाहि एक अशक्य ध्येयवाद नाहीं का ? असें कोणी म्हणेल. त्याचें होकारार्थी उत्तर देऊनहि त्या ध्येयवादाची कास धरली पाहिजे असें आग्रहानें सांगतों.

*ध्येयाकडे जाण्याच्या ईर्षेनेंच जगाची आजवर प्रगति होत आली आहे.* ध्येयाच्या प्राप्तीसाठीं धडपड हाच उच्च जीवनानंद नाहीं का ? पाश्चात्य देशांकडून आपला आधुनिक लोकशाहीचा वारसा मिळविला, पण तीच लोकशाही विनाशाच्या वाटेवर आहे. यावेळीं तीमधील विध्वंसक विसंगति दूर करून तिला नवजीवन देणें भारतवर्षाचें कर्तव्य आहे. जगांत लोकशाहीचे इतर बुरुज धडाधड कोसळत असतां या ठिकाणचा बालेकिल्ला तरी सुरक्षित रहावा म्हणून जग भारताकडे आशेनें पाहात आहे; आणि प्राचीन सकग मूल्यांची जोड देऊन भारतानें लोकशाही रक्षणाचा प्रयत्न केला, तर अग्निकुंडांतून अधिक सतेज होऊन वर आलेल्या सीतादेवीप्रमाणें आजच्या अग्निवर्षावांतून लोकशाही अधिक कांतिमान् होऊन बाहेर पडेल. ५–२–४३

---

## जातीय त्रिकोण : : ५

आज ज्या विषयांवर बोलावयाचें आहे तो विषय जितका नाजुक तितकाच महत्त्वाचा आहे. हिंदुस्थानच्या प्रगतीला अनर्थकारक असे जे विषय धोंड म्हणून होऊन बसले आहेत त्यांतला हा विषय आहे. मनःसंताप होऊन आपण ठरविलेले उच्च विचार आणि सहिष्णुता धोक्यांत येण्यासारखे प्रसंग घडतात ते याच विषयांत. एकीकडील हिंसात्मक धोरण मनाला भयकंपित करतें तर दुसरीकडील सहिष्णुता ही दुर्बलता तर नसेलना अशी विचित्र शंका येते. हिंदु–मुसलमानांचा प्रश्न असा भयंकर व गुतागुंतीचा आहे. पण व्यवहार निष्ठुर आहे म्हणून त्यापासून पळून कसें चालेल? आणि कांहीं संतापजनक गोष्टींनीं आपण आपणांस तत्त्वभ्रष्ट होऊं दिलें तर त्यांत पुरुषार्थ तो कोणता? म्हणूनच या प्रश्नाची तात्त्विक, भावनात्मक, ऐतिहासिक अशा सर्व बाजूंनीं छाननी करून निश्चित मार्ग आपण ठरविला पाहिजे.

*हिंदु आणि मुसलमान या जातींच्या प्रश्नाला इंग्रज ही तिसरी बाजू आहे.* कारण इंग्रजांनीं या कामीं बरीच पुण्याई खर्च केली आहे. या तीन बाजूंनीं युक्त असा हा प्रश्न आहे म्हणून याला 'जातीय त्रिकोण' असें नांव आमच्या कांहीं युवक नेत्यांनीं दिलें आहे. अगदीं समर्पक आहे हे नांव ! या त्रिकोणाची एकेक बाजू आतां आपण तपासायला घेऊं.

अरबस्तानच्या उजाड मैदानांत ७ व्या शतकात इस्लाम धर्म स्थापन झाला आणि केवळ शें सव्वाशें वर्षांच्या आंत इस्लामि राज्य इतकें पसरलें कीं, त्या राज्याच्या या टोकापासून त्या टोकाला जाण्यास वेगवान् उंटांना ५ महिने लागूं लागले ! इस्लामचा विजय सर्वत्र ठिकाणीं केवळ तलवारीच्या जोरावर झाला नाहीं. इस्लामच्या आजूबाजूला जुन्या संस्कृति पोखरलेल्या होत्या. कुठें दलित वर्ग जनावराच्या दशेला पोंचला होता. स्वतःच्याच संस्कृतींत कित्येक मानवाना किंमत नव्हती. गुलामांचा व्यापार कुठें जोरांत होता. भिक्षुकांच्या असह्य जाचानें कित्येक लोक टेकीला आले होते. अशा वेळीं हा साधा आणि समतावादी धर्म नवा उत्साह घेऊन ठिकठिकाणीं गेला, दलितांना प्रतिष्ठा देण्याचें त्यानें आश्वासन दिलें, आणि जीविताबद्दल नवी आशा त्यानें निर्माण केली. हिंदु धर्माचे एक अभिमानी व त्रिखंडपंडित डॉ. सर राधाकृष्णन् म्हणतात—

"इस्लामी धर्मात चमत्काराला स्थान नाहीं. त्याचा साधेपणा हेंच त्याचें सामर्थ्य आणि सौंदर्य. इस्लाम धर्म विचाराच्या वारकाव्यांत शिरत नाहीं आणि आधिदैविक विरोधाभासांची अथवा वेदांताच्या घटपटाची कसरतहि त्याला अवगत नाहीं. तो नैसर्गिक धर्म आहे आणि परमेश्वर हा विधाता, शास्ता व सर्व वस्तूंना पूर्णता देणारा आहे, हें एकच त्याचें मध्यवर्ती तत्त्व आहे. हा उच्च निर्मळ आस्तिक्यवाद सामान्य व अनहंकारी माणसांना चांगला मानवतो. इस्लामच्या सामाजिक संस्था निवेकवादावर उभारलेल्या आहेत. त्यांत जाति अथवा भिक्षुकवर्ग नाहीं. म्हणून आपखुषीनें माणसें या धर्माच्या अर्धचंद्रांकित ध्वजाखालीं ठायीं ठायीं गोळा होत गेलीं."

हिंदुस्थानांत काय घडलें ?

हिंदुस्थानात इस्लामनें कोणता प्रताप केला ?

याबद्दल अति उत्साहानें किंवा अति संतापानें बोलणारे पंडित आहेत. हिंदुस्थानांत पडला इतका तरी मुसलमानांचा प्रभाव कां पडला याबद्दल दांतओठ

चावणारे हिंदुत्वनिष्ठ आहेत, तर मुसलमानांची क्रांतिकारक भूमिका याहून इथें यशस्वी व्हायला पाहिजे होती, ती झाली नाहीं. म्हणून अश्रु गाळणारे रॉयसारखे विख्यात क्रांतिकारक आहेत! अर्से कां झालें आणि इतकें कां झालें नाहीं या चर्चेत चिडून रंगलेल्या या दोनही लोकाचा विचार आपण बाजूला ठेवूं. 'जगाचा इतिहास' या आपल्या सर्वमान्य ग्रंथांत पं. नेहरूनीं इस्लामच्या आगमनाचा व यशापयशाचा विवेक मोठ्या तर्कशुद्ध रीतीनें केला आहे पं. नेहरू म्हणतात—" इस्लाम धर्माचे संस्थापक अरब हे मोठे प्रगतिप्रिय लोक होते. त्यांना शुद्ध ज्ञानाची चाड होती. अगदीं प्रथम जे तुरळक धर्मजिज्ञासू प्रवासी हिंदुस्थानांत आले त्यांचा येथील पंडितांनीं सत्कार केला असा पुरावा आढळतो. पण जमावानें जे मुसलमान (तुर्क) हिंदुस्थानांत आले ते इस्लामच्या मूळ अनुयायांइतकें (अरबांइतके) प्रागतिक व उदार नव्हते. ते उशीरां म्हणजे इस्लाम धर्माच्या स्थापनेनतर ४०० वर्षांनतर हिंदुस्थानांत घुसले. या वेळपर्यंत मूळ इस्लाम धर्मातली प्रगतीची स्फूर्ति थंडावली होती. तो धर्म घेऊन हिंदुस्थानांत येणारे तुर्क वगैरे लोक अडाणी, हिंस्र असे होते. अशा रितीनें इस्लाम धर्म हिंदुस्थानांत आला तो उशीरा आला आणि चुकीच्या वाटेनें आला म्हणून हा सांप्रदाय म्हणजे तलवारींचा, क्रौर्याचा, व असहिष्णुतेचा आहे अशी दहशत आपणांला बसली."

हिंदुस्थानांत मुसलमान पहिल्यानें जेते म्हणून आले आणि त्यांनीं आपल्या पंथांत येथील लोक ओढण्याचा प्रयत्न केला. मूर्तिभंजनापासून तो शेंडीपट्टी बसवीपर्यंत अनेक अत्याचार व तेहि फार मोठ्या प्रमाणांवर त्यांच्या हातून घडले ही गोष्ट छपवून ठेवण्यांत अर्थ नाहीं! आपण जेते आहोंत ह्या धुंदीनें (आणि ती धुंदी उतरण्याचे अनेक प्रसंग येऊनही!) मुसलमानांनीं आपल्या धर्मवेडास हवेतसें मोकाट सोडलें! असहिष्णुतेचा कित्येकदां कळस झाला. आणि इतिहासांतली कित्येक पानें रक्तानें माखलीं गेलीं!

आतां या बरोबरच दुसरें एक श्रेय मुसलमानांस दिलें पाहिजे. एकदां हा देश आपला म्हणून मानल्यावर मुसलमानांनीं या देशाच्या वैभवाला जेणें

करून बहार येईल असे आटोकाट प्रयत्न केले. येथील संपत्ति बाहेर लुटून नेली नाहीं. ताजमहाल, कुतुब मिनार, गोल घुमट इ० शिल्पकलेतील आश्चर्ये हिंदुस्थानला अभिमानानें दाखवितां येतात याचें श्रेय खास मुसलमानांकडेच जात नाही का ?

आणखी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं हिंदु-मुसलमानांनीं एकत्र गुण्यागोविंदानें वागून एक नवी हिंदी संस्कृति निर्माण करण्याचे प्रयत्न अगदींच केले नाहीत असें नाहीं. या दोन जमातींत परस्पर विश्वास असल्याची नोंद भरपूर आहे. पंड्या राजाचा कुबलाईखान नामक इस्लामी राजपुरुषाकडे गेलेला प्रतिनिधि मुसलमान होता ! १८२६ सालचीही गोष्ट. त्यावेळचे हिंदु राजे मुसलमानांवर केवढा विश्वास टाकत हें या एका गोष्टीवरून दिसेल. पुढें कांहीं वर्षांनीं मलीक काफूरच्या आक्रमणाला ज्या वीर वल्लाळ नांवाच्या मनुष्यानें विरोध केला त्याच्या सैन्यांत २०००० मुसलमान होते. बाबर किंवा हुमायून या परदेशी मोगल नेत्यांना विरोध करणारे हिंदी मुसलमानच (लोदी व शेरशहा) नव्हते का ? अकबराच्या राज्यांत आणि बहामनी राज्यांत हिंदूंचें प्राबल्य होतें आणि हिंदु-मुसलमान यांच्या सहकार्यानेंच तीं राज्यें चालली होतीं ही गोष्ट प्रसिद्धच आहे. महाभारत, रामायण, आणि इतर प्रमुख संस्कृत ग्रंथ यांचीं भाषांतरें पर्शियन् भाषेंत झालीं तीं अकबराच्या देखरेखीखालीं. याच वेळीं युरोपात धर्माच्या नांवाखालीं वायकापुरुषांना विधिपूर्वक जाळीत असत असें सांगतात ! या दृष्टीनें अकबराचें चित्र या पार्श्वभूमीवर तर विशेष कौतुकास्पद वाटतें ! हिंदुपदपातशाही स्थापणाऱ्या शिवाजीचें तर धार्मिक बाबतींत पूर्ण सहिष्णुतेचें धोरण असे हें विख्यातच आहे. अकबर व शिवाजी यांनीं प्रकट केलेली सहिष्णुता हिंदु व मुस्लिम कलावंतांनीं मोठ्या प्रमाणांत दाखविली आणि शिल्प, संगीत, चित्ररेखन इ. कलात एक नवी हिंदु-मुस्लिमांची संयुक्त पद्धति निर्माण झाली.

तोडरमल सारख्या हिंदु क्षत्रियानें जमीन महसूलाची हिंदु-मुसलमानांना सारखीच लागू पडणारी पद्धति सुरू केली, तर बंगाली वाङ्मयाचा पायाच मुसलमानांनी घातला. सुफी अवलिया व वैष्णव संत यांच्यांत परमार्थ कल्पनांची देवघेव होऊन नवी संस्कृति निर्माण झाली. डॉ. राधाकृष्णन् हे तर असें म्हणतात कीं इस्लामच्या अनुभवाचा फायदा याहून आपण जास्त घ्यायला पाहिजे होता. शब्दच पहा त्यांचे–"इस्लामच्या अनुभवाचा घ्यावा तितका फायदा हिंदुस्थाननें घेतलेला नाहीं. चैतन्य, कबीर आणि नानक यांच्या सुधारणांपंथावर इस्लामची छाप पडली होती हें खरें आहे. इस्लामचा प्रसार झाल्यानंतर हिंदु धर्मातील एकेश्वरवादी मतांचा जोर वाढला. परंतु हिंदुत्वाला याहून अधिक शिकण्यासारखें पुष्कळ होतें. दुसऱ्या धर्म पंथांविषयींचें अज्ञान म्हणजे चुका व अन्याय यांचें मायपोटच. असंस्कृत मुसलमानांच्या कांहीं कृत्यांनीं, अंध बनून इस्लामच्या खऱ्या ध्येयाकडे हिंदूनीं पाहिलें नाहीं. इस्लामला हिंदुत्वाचा सहानुभूतिपूर्वक अभ्यास केल्यास पुष्कळ कळूं लागेल आणि इस्लामपासून हिंदुत्वालाहि पुष्कळच घेतां येईल. मुख्य गोष्ट म्हणजे, हिंदुधर्मानें आपली तडजोडीची वृत्ति उपासनेच्या रानटी पद्धति व देवविषयक अपूर्व कल्पना यांचा धिक्कार केला पाहिजे. आपल्या संस्था बहुजनाभिमुख करून पंथापंथांतील तटे, अगम्य रूढी व मनुष्याच्या आत्म्याला चिरडून टाकणाऱ्या संस्था यांचा नाश केला पाहिजे."

तथापि एक संमिश्र संस्कृति निर्माण झाली आणि, हिंदु–मुसलमानांनीं एकमेकापासून पुष्कळ शिकायला पाहिजे होतें ह्या सर्व गोष्टी खऱ्या, पण दुर्दैवानें प्रतिकूल प्रवाहांनाहि बळ मिळालें. मुसलमानाच्या आक्रमणाला तोंड देऊन हिंदूंनीं आपल्या जातींची बहुसंख्या कायम राखली. गेल्या पांच सहा हजार वर्षांत अनेक साम्राज्यें या देशांत हिंदूंनीं स्थापिलीं; पहाडाच्या अंतरंगांत शिरून लोकोत्तर कलाकृती कोरून ठेविल्या; नगरें वसविलीं; विद्या, कला, आणि वाङ्मय भरभराटीस आणिलें. व्यवहारांत व परमार्थांत कल्या-

णाच्या अनेक योजना करुन त्या यशस्वी केल्या; बाहेरुन आलेल्या आणि स्वदेशांत सुटलेल्या प्रचंड झंझावातांतून आपल्या संस्कृतीचें रक्षण केलें. अर्थात् हा देश आपला आहे, येथें आपलीच सत्ता स्थापन झाली पाहिजे असा कडव्या हिंदूंचा आग्रह आहे.

मुसलमान हे या देशांत अलीकडेच आले. आठशें वर्षे झाली असतील त्यांच्या आगमनाला. इतके दिवस त्यांना वाटे कीं तुर्कस्तान ते अफगाणिस्तान हा आपला इस्लामी प्रदेश स्वतंत्र आहे. तेव्हां आपण त्याचे उपरे हस्तक म्हणून या देशांत राहूं. इस्तंबूल–मक्का हीच आपलीं केंद्रें. हिंदुस्थान-बाहेर आपलें एवढें बळ आहे ! कोण आपली एवढी मिजास मोडणार ! पण हिंदी मुसलमानांची ही वृत्ति आज राहिलेली नाहीं. खिलाफत चळवळीचे तीन तेरा झाले *आणि आपले तुर्की जातभाई आपणांला किती मानतात* याचें केविलवाणें प्रत्यंतर आमच्या मुस्लिम बांधवांना आलें ! इजिप्त, अरबस्तान, इराण, अफगाणिस्तान याची कुवत ब्रिटिशांच्या सामर्थ्यापुढें किती आहे हें गेल्या महायुद्धापासून चालू युद्धाच्या काळापर्यंत कळून चुकलेंच आहे ! तेव्हा आता 'हाच आमचा देश–हीच आमची मातृभूमि तुमचा आणि आमचा मानववंशसुद्धां एकच–फक्त आम्ही एक प्रगतिपर धर्म स्वीकारला एवढेंच' असे हिंदी मुसलमान आतां बोलूं लागले आहेत. "हिंदुस्थानावर परचक्र येऊन दोस्तांचा पराभव झाला तर अमेरिकन्स अमेरिकेंत जातील, इंग्रज इंग्लंडचा आसरा घेतील, पण मी कुठें जाऊं ? मला माझ्या या देशातच रहावें लागेल. अर्थात मला माझ्या देशाच्या संरक्षणाची काळजी वाहिली पाहिजे." असें जिना म्हणतात ! मात्र हा देश आमचाच आहे म्हणून आमचा भाग आम्हांला तोडून द्या असे विचित्र तर्कशास्त्र जिना व त्यांचे जातभाई लढवीत आहेत !

"जातिनिष्ठा प्रामाणिक असेल तर ती भीतीच्या पोटीं जन्माला आलेली असते आणि जातिनिष्ठा खोटी असल्यास ती राजकारणांत प्रातीची विरो-

धक ( प्रगतीला मागें खेंचणारी ) असते. " असें पं. नेहरूनीं दहा वर्षांपूर्वी म्हटलें आहे, त्याचा अधिकाधिक प्रत्यय आपणांस येत आहे. आम्ही अल्पसंख्य आहों तेव्हां बहुसंख्य हिंदुजात सत्ता हातीं येताच आम्हांला गिळंकृत करील या भीतीनें मुसलमान घाबरले आणि त्यांनीं संघटणेचा जोर धरला ही फार तर प्रामाणिक जातिनिष्ठा म्हणतां येईल. पण राष्ट्रीय सभा व सुज्ञ हिंदी पुढारी आश्वासन व सवलती देत असतां ते मुसलमान परसत्तेच्या गोटात शिरून स्वातंत्र्याचे विद्रोही होऊं लागतात तेव्हां त्याची जातिनिष्ठा खोटी व दांभिक वाटते ! मुसलमानाच्या तोंडीस तोंड म्हणून कांहीं हिंदूहि याच मार्गाचा अवलंब करितात. पण एका विषानें दुसरें विष मरतेंच असें नाहीं ! दोन्हीं विषें मरून तिसरेंच विष निर्माण होतें हाहि अनुभव येत नाहीं का?

'जातीय त्रिकोणा'चा एक व सर्वात मोठा भुज ब्रिटिश सरकार. ब्रिटिशांचें राज्य या देशांत स्थापन झालें तेव्हां तें उलथून पाडण्याचा अखेरचा प्रयत्न हिंदु व मुस्लिम यांच्या संमिश्र सरजामदार वर्गानें केला. तेंच १८५७ चें बंड. तें शमल्यावर इंग्रजी शिक्षण व संस्कृति आत्मसात् करण्याचा हिंदूंनीं मार्ग स्वीकारला. ते यशस्वी झाले. त्यांच्यांत राजकीय जागृतिहि बरीच झाली. इंग्रजांच्या जोडीनें आपला बुद्धिप्रभाव दाखवून राज्ययंत्र चालविण्याच्या कामीं अधिकाधिक वाटा मागण्यासाठीं हिंदू पुढें सरसावले. हिंदी राष्ट्रीयत्वाची मुहूर्तमेढ त्यांनीं रोवली.

हिंदूंच्या या जागृतीचा व उत्कर्षाचा अंदाज एका मुस्लिम द्रष्टयाला आला. त्याचें नांव सर सय्यद अहंमद. मुस्लिम समाजात या गृहस्थाचें फार वजन होतें. मुसलमानांनीं नवें शिक्षण संपादून जगांतल्या प्रगतिपर विचाराच्या लाटेंत शिरावें असें सर सय्यद अहंमद यांनीं मुसलमान समाजास सांगायला सुरुवात केली. अलीगडचें इस्लामी विद्यापीठ यांच्याच परिश्रमाचें फळ होय.

मुसलमानांनीं इंग्रजी शिक्षण घ्यावें ही चळवळ सय्यद अहमद यांनीं हातीं घेतली एथवर ठीक झालें. पण जागृत मुसलमानांनीं नव्या हिंदी राष्ट्रीयत्वाच्या

झेंड्याखालीं सामील न होतां इंग्रज सरकारच्या कृपेनें आपलें वैभव वाढवावें असें सर सय्यदनीं प्रतिपादन केलें ही अत्यंत खेदाची गोष्ट होय. असें म्हणतात कीं सर सय्यद हे पहिल्यानें नव्या हिंदी राष्ट्रीयत्वाचे व राष्ट्रसभेचे चहाते होते. पण अलीगडचे गौरकाय प्रिन्सिपॉल मि. बेक ह्यांनीं मंथरेची भूमिका घेतली ! त्यांनीं सर सय्यद याना हिंदी राष्ट्रीयत्वापासून फोडण्याचा सतत प्रयत्न केला. त्यांच्या मागून त्यांच्या जागेवर जे इंग्रज आले त्यांनीहि हें मंथरा-व्रत यशस्वी रीतीनें पार पाडलें ! मुस्लिम जमातीला नव्या जगाचें, नव्या विचाराचें दर्शन होऊं लागलें त्याचवेळीं अराष्ट्रीय व फुटीर वृत्तीचें बीं त्यांच्यांत चांगलें खपून रुजविण्यांत आलें !

१९०६ सालीं खोजा जमातीचे प्रमुख ना. आगाखान एक शिष्टमंडळ घेऊन व्हॉईसरॉय साहेबांकडे गेले. 'खावंद, आमची जमात अल्पसंख्य आहे तेव्हां कृपा असों द्यावी.' अशी प्रार्थना या शिष्टमंडळानें केली. व्हॉईसरॉयसाहेबांनीं आश्वासन दिलें ! आणि याच वर्षी लगेच जी मुस्लीम लीग स्थापन झाली तिच्या उद्देशपत्रिकेंत अगदीं पहिलें कलम घालण्यांत आलें कीं, "ब्रिटिश सरकारबद्दल मुसलमानांत राजनिष्ठा उत्पन्न करणें आणि ब्रिटिश सरकारच्या हेतूबद्दल मुसलमानांस शंका असल्यास तिचा निरास करणें..." या राजनिष्ठेचें फळ मुसलमानांना लागोलाग मिळालेंच. कारण २-३ वर्षांतच स्वतंत्र मतदार संघ मुसलमानांना देण्याची व्यवस्था सरकारनें केली ! राष्ट्रीय वृत्ति मारून काढण्याचे कामीं मुसलमानांना सवलती देण्याचा हा श्रीगणेशा होता.

इतकेंहि करून राष्ट्रीय सभेच्या बाजूला मुसलमान जमात कांहींशी ओढली जातच होती. १९१६ सालीं लखनौ कॉंग्रेसमध्यें जो इतिहासप्रसिद्ध करार झाला त्यात हिंदु-मुस्लिमांचें राजकीय भवितव्य एकच आहे ह्या तत्त्वाचा जय झाला. मुसलमानांना जादा राखीव जागा देण्याचा समझोता झाला. पुढें खिलाफत प्रकरणीं दुखावलेले शेकडों मुसलमान पहिल्या असहकारितेच्या चळवळींत हिंदू बाधवाबरोबर सत्याग्रह संग्राम लढत असल्याचें रोमांचकारी

दृश्य जगाला दिसलें. आणि १९२७ सालीं सायमन कमिशनवर बहिष्कार घालण्याचा जो देशव्यापी कार्यक्रम झाला त्यांतहि जिनांसारखे प्रमुख लीग पुढारी सामील होते. पण राष्ट्रीय सभेची चळवळ जसजशी अधिक व्यापक होऊं लागली, साम्राज्यशाहींशीं कॉंग्रेसनें चालविलेला लढा जसजसा निकरावर येऊं लागला तसतसे सुखासीन व संधिसाधु मुसलमान पुढारी राष्ट्रीय चळवळीपासून दूर दूर राहूं लागले !

—आणि ते तसे राहावेत याचे पद्धतशीर प्रयत्नहि होत होतेच. सायमन कमिशनचे वेळीं त्या वेळेचे भारतमंत्री लॉर्ड बर्कनहेड यांनीं व्हॉइसरॉयना लिहिलें होतें कीं, "कमिशनशीं सहकार्य करणारे जे मुसलमान पुढारी आहेत त्यांचीं नांवें आम्हांला कळवा. भरपूर प्रसिद्धी देऊं त्यांना आम्हीं. असें झालें म्हणजे जिना शुष्क व एकाकी होऊन पडतील." पुढें मंडलाकार परिषदेचे वेळीं एक ऐक्य परिषद् इकडे भरली होती. यावेळीं मध्यवर्ती कायदेमंडळांत शें. ३२ जागा मुसलमानांना देण्याचें ठरलें. पं. मालवीय हेच या सभेचे व योजनेचे पुरस्कर्ते असल्यानें ही योजना हिंदुमहासभेला मान्य होणार यांत संशय नव्हताच. पण ऐक्याचा हा प्रयत्न असा सुखासुखी सफल झाल्यास इंग्रजांना कसें बरें वाटणार? दुसरेच दिवशीं भारतमंत्री सर सम्युएल होअर यानीं जाहीर केलें की, "बादशहांच्या सरकारनें शेकडा ३३$\frac{1}{3}$ जागा मुसलमानांना देण्याचें ठरविलें आहे." ऐक्य परिषदेचा सारा डोलारा कोसळून पडला!

मंडलाकार परिषदेंत जातिनिष्ठ पुढाऱ्यांचाच भरणा होता. बेगम शहानवाज यांनीं आपल्या जमातीतर्फे बोलतांना सांगितलें कीं, "आम्हा मुसलमान स्त्रियांना स्वतंत्र मतदारसंघ नको आहेत." ही गोष्ट आमच्या भगिनींना अभिमानास्पद वाटली पाहिजे. मंडलाकार परिषदेंत जेव्हां मुसलमान पुरुष प्रतिनिधी अराष्ट्रीय व जातिनिष्ठ वृत्तीनें प्यादी सरकवीत होते तेव्हां एका मुस्लिम महिलेनें फुटीर वृत्तीला कडकडीत विरोध केला! गांधीजींनीं स्मित-

पूर्वक सांगितलें, *"अर्धा मुसलमान समाज तरी माझ्या बाजूला आहे ही* गोष्ट लक्षांत ठेवा."

पण बेगमसाहेबाची राष्ट्रीय वृत्ति इतर मुसलमानांनीं दुर्दैवानें प्रकट केली नाहीं. मुस्लिम पुढाऱ्याच्या ताठरपणामुळें हिंदु-मुस्लिम ऐक्याचीं चिन्हें दिसेनात. अखेर मुख्य प्रधानांनीं आपल्या मतानें कायदेमंडळांतील जागेच्या वाटण्यासंबंधीं निवाडा दिला! हाच तो कु-प्रसिद्ध जातीय निवाडा (*Communal award*) होय!! *यात मुसलमानांची पोळी पिकली!* बंगाल्यांत युरोपियन लोक शेंकडा १ टक्क्याच्या १० व्या भागाइतकेहि असतील नसतील! पण कायदेमंडळांत त्यांना जागा मिळाल्या शेंकडा दहा *इतक्या! अस्पृश्यांना तर वेगळेच मतदारसंघ देण्यांत आले आणि अशा-* रीतीनें राष्ट्रीय वृत्तीच्या हिंदु जातीतून एक भाग अलग करण्याचा प्रयत्न झाला! (पुढें गांधीजींनीं प्राणांतिक उपोषणाला आरंभ करून हा निर्णय बदलून घेतला ही गोष्ट वेगळी!)

जात्यंध मुसलमानांनीं बाह्यतः कुरकुरत पण मनांतून संतुष्ट होऊन हा जातीय निवाडा मान्य केला. हिंदु महासभेनें या निवाड्याला कडाडून विरोध केला. खरें पाहतां कुठल्याहि राष्ट्रीय वृत्तीच्या पक्षाला हा निवाडा मान्य होण्यासारखा नव्हता. कॉंग्रेसनें जातीय निवाड्याच्या बाबतींत तटस्थ वृत्ति पत्करली. हा निवाडा मान्य करणें कॉंग्रेसच्या राष्ट्रीय वृत्तीला मानवणें मुळींच शक्य नव्हतें. पण जर याला विरोध करायचा म्हटलें तर आज आपला साम्राज्यवादी लढा सोडून जातिवादाच्या खालच्या पातळीवर आपला कार्यक्रम आणावा लागेल हें अरिष्ट कॉंग्रेसला दिसत होतें. एका जातिवादानें दुसरा जातिवाद मरत नाहीं. साम्राज्यशाहीची पकड ढिली झाली म्हणजे तडजोडीला अनुकूल असें वातावरण तयार होईल. ती पकड ढिली करायची म्हणजे १९३५ चा नवा कायदा उधळून लावणें व घटनासमितीच्या पायावर नव्या खऱ्याखुऱ्या लोकसत्ताक राज्यघटनेची प्रस्थापना करणें हाच प्रभावी मार्ग असें कॉंग्रेसनें

ठरविलें. सारा पटच उधळून टाकला म्हणजे जातीय निवाड्यासारखी ताप-दायक होऊन बसलेली सोंगटी अडगळींत जाऊन पडेल अशी कॉंग्रेसची खात्री होती. कॉंग्रेसचे उजव्या डाव्या गटांचे पुढारी याविषयीं स्पष्ट शब्दांत बोलत होते. पण एवढ्या क्रांतीला ज्यांचीं सनदशीर मनें तयार नव्हतीं आणि १९३५ च्या कायद्यांतच जास्तींत जास्त घवाड मिळवून ज्यांना शांततेचें राजकारण खेळावयाचें होतें त्यांनीं काळ वेळ न पहातां कॉंग्रेसला शिव्या देण्यास व आपली राष्ट्रीय मशाल पाजळण्यास सुरवात केली ! यांतले कांहीं शिव्याबहादर आज सरकारशीं सर्वस्वीं सहकार्य करून प्रतिष्ठित होऊन बसलेले तुम्हांला दिसतील. आजच्या त्यांच्या वर्तनावरून त्या वेळचें त्यांचें राष्ट्रीयत्व किती अस्सल होतें याचा कस तुम्हींच काढा !

पुढें कॉंग्रेस मंत्रीमंडळें आलीं. कॉंग्रेसनें सर्वपक्षीय मंत्रीमंडळें बनविलीं नाहींत हें खरें आहे. पण याच कारणामुळें मुसलमान जमात दुखविली जाऊन सवत्यासुभ्याची भाषा बोलूं लागली असें जे आमच्यातले राष्ट्रीय व आंत-र्राष्ट्रीय राजकारणाचे पंडित म्हणतात त्यांना नमस्कार असो ! या पंडितांच्या मताप्रमाणें नव्या राजवटींत आपणांला राज्यकारभारांत योग्य वाटा मिळणार नाहीं असें मुसलमानांना भय वाटूं लागलें आणि तें खरें होतें म्हणे ! नव्या राजवटींत शेंकडा ७४ इतकी मुसलमान जमात मुळीं मुसलमानप्रधान मंत्री-मंडळाच्या अमलाखालीं गेली. अकरा प्रांतांच्या ७१ मंत्र्यांत २६ मुसलमान, १० इतर अल्पसंख्यांक जातीचे, आणि फक्त ३५ हिंदू होते ! कॉंग्रेस-शासित प्रांतांतल्या ३५ मंत्र्यांत ६ मुसलमान आणि ५ इतर जमातींचे होते. पुढें सरहद्द व आसाम या प्रांतांत कॉंग्रेसनें संयुक्त मंत्रीमंडळें स्थापल्यावर तर आणखीहि जागा मुसलमानांना मिळाल्या. आपल्या अमलाखालील प्रांतांत हिंदूंचा रोष पत्करूनहि कॉंग्रेस-मंत्रीमंडळांनीं मुसलमानांना शक्य तितक्या सव-लती दिल्या. पण जातिनिष्ठ मुस्लिमांनीं मात्र कॉंग्रेसनें आपल्यावर जुलूम केल्याची एकच पद्धतशीर ओरड चालविली आणि कॉंग्रेसनें जेव्हां सत्ता-त्याग

केला, तेव्हां अल्लाचे आभार मानण्याकरितां मुसलमानांनीं "मुक्ति-दिन" ( Deliverance Day ) साजरा करावा असा फतवा जिनांनीं काढला! (ह्या 'मुक्ति-दिन' साजरा करण्यांत काहीं हिंदूंनीहि भाग घेतला!) 'कॉंग्रेसचें राज्य म्हणजे हिंदूंचें राज्य' अशी हाकाटी करून 'पाकिस्तान' च्या सवत्या-सुभ्याची मागणी जिना करीत आहेत. ह्या भुताचें ( पाकिस्तानचें ) स्वरूप व त्याच्या लीला यांची माहिती मी तुम्हांला पुढल्या वेळीं देणारच आहे. आजचा विषय पुरा करतांना आतांपर्यंत जें मीं तुम्हांला सांगितलें त्यावर काहीं स्पष्टी-करणादाखल सांगितलें पाहिजे.

आपल्या देशांत हा हिंदु-मुसलमानांचा जातीय प्रश्न विकट होऊन बसला आहे हें नाकारण्यांत अर्थ नाहीं. तथापि त्या प्रश्नाची तीव्रता त्यांतील परकीय सत्तेचा हात दूर होतांच पुष्कळशी कमी होईल हें लक्षांत ठसविलें म्हणजे आपण सारी शक्ति कोणत्या कामीं लाविली पाहिजे हें तुम्हांला कळेल. हें ज्यांना कळत नाहीं तीं माणसें जात्यंधतेच्या भयानक समंधानें झपाटलीं जातात. हिंदु-मुसलमान वादांत मुसलमानांना सर्वस्वीं शरण जा असें कोणीच राष्ट्रीय माणूस सांगणार नाहीं. शरणांगती वृत्ति आणि सामोपचाऱ्यांची वृत्ति यांत फरक आहे. बलिष्ठाचे पाय धरणें आणि आपल्या स्नेह्यासाठीं आपला स्वार्थ बाजूला ठेवणें ह्यां दोन गोष्टी सारख्याच म्हणाल का तुम्ही? आपल्या स्वार्थासाठीं सुद्धां मुसलमानांची समजूत जरूर घातली पाहिजे. एखाद्या देशांत प्रबळ अशी अल्पसंख्यांक जमात तेथल्या बहुसंख्य जमातीबरोबर सुखानें नांदत नसली तर परकीय शत्रू तिचा 'पंचमस्तंभी' म्हणजे फितुर गुप्त शत्रु असा उपयोग करून घेतात. जगाच्या इतिहासांत अशीं भरपूर उदाहरणें आहेत. उद्यां हिंदुस्थानाला स्वातंत्र्य मिळाल्यावर मुसलमानांसारखी संघटित, शूर व धर्मवेडी जमात असंतुष्ट राहिली तर कुठलीहि हिकमती परसत्ता त्यांचा स्वतःच्या हितासाठीं उपयोग करून घेऊं शकेल. हिंदी स्वातंत्र्याला ती एक कायमचा संभाव्य धोका होऊन बसेल. यासाठीं हिंदु-मुस्लिम ऐक्याची आवश्यकता दूरदर्शी राष्ट्रीय पुढाऱ्यांना वाटते.

अर्थात् हें मला मान्य आहे कीं; हिंदु-मुस्लिम ऐक्याचें स्वप्न सत्यसृष्टींत उतरण्यासाठीं हिंदूंनीं कुठल्याहि अराष्ट्रीय गोष्टीला मुळींच संमति देऊं नये. शिवाय आपल्या हिताचा त्याग करण्यालाहि कांहीं मर्यादा असतेच कीं नाहीं! अमुक एका मर्यादेपर्यंत आपण त्याग निश्चित करूं, तुमचें हित व संस्कृति यांना संरक्षण देऊं अशी स्पष्ट रूपरेषा आखून देऊन राष्ट्रीय आघाडीवर येण्यास सर्व हिंदूंनीं मुसलमानांना पाचारण करावें. मुसलमानांशीं तडजोड करतांना त्यांचे अहंमन्य पुढारी वगळण्याची मात्र यापुढें खबरदारी घेतली पाहिजे. अडाणी पण श्रद्धाळू मुस्लिम बहुजनसमाजांत कॉंग्रेसनें पं. नेहरूंच्या आदेशाप्रमाणें आजवर प्रचार केला असता तर जिना-औरंजेबखान यांना इतकें महत्व कधींच आलें नसतें. पण जातिनिष्ठेच्या जोरावर अरेराव होऊन बसलेल्या *उच्चवर्गीय मुसलमान पुढाऱ्यांच्या दाढीला* हात लावून त्यांची मनधरणी करण्यांत राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं उगीच शक्ति खर्च केली! असो. नव्यानें बोलणीं करतांना पूर्वीचा अनुभव हे लोकनेते खास विसरणार नाहींत. कुठलाहि बहुजनसमाज हा वास्तववादी, प्रगतिप्रिय आणि कृतज्ञ असतो. यापुढें कॉंग्रेसनें आपल्या चळवळीचा भर मुस्लिम बहुजनसमाजावर दिला पाहिजे. मुस्लिम समाजाला स्वातंत्र्याचा संदेश पटला आणि जातिनिष्ठेचा फोलपणा कळून आला म्हणजे आजचे लीगचे पुढारी पदभ्रष्ट होण्यास फारसा वेळ लागणार नाहीं.

हिंदुमहासभेला हिंदुत्व म्हणजे राष्ट्रीयत्व हें तत्त्व बरेंच बदलून घ्यावें लागेल. हिंदी ख्रिश्चन लोकांनीं आपणांस जादा हक्क नकोत व भारताचें अखंडत्व राहिलें पाहिजे अशा घोषणा वेळोवेळीं केल्या आहेत. पारशांनीं हीच भूमि आपली मातृभूमि ठरविली असून आज अनेक शतकें त्यांनीं तिच्या उत्कर्षासाठीं आपली उच्च प्रतिभा व कल्पकता खर्च केली आहे. शीख हे तर सर्वस्वीं याच देशांतले. या सर्व राष्ट्रीय वृत्तीच्या तेजस्वी जमातींना दूर लोटून आपण कोणतें हित साधणार ?

'फ्रान्स फ्रेंचांचा, जपान जपान्यांचा, जर्मनी जर्मनांचा तसा हिंदुस्थान हिंदूंचा' असें वाह्यतः तर्कशुद्ध वाटणारें एक ठाशीव विधान हिंदू जातिनिष्ठ करतात. प्रथम मोठें समर्पक वाटतें तें. पण त्यांतली विसंगति फार थोड्या विचारानें सहज कळून येण्यासारखी आहे. फ्रेंच, जर्मन, जपानी इ० शब्द हिंदु या शब्दाप्रमाणें जातिवाचक नाहींत. एखाद्या जपानी टोजोच्या घरांत एक मुलगा बौद्ध, दुसरा शिंतोधर्मी, तिसरा ख्रिश्चन असा असूं शकतो आणि तरीहि सर्वजण आपणांला अभिमानानें जपानी म्हणवून घेतात आणि जपानाकरितां रक्त सांडायला आनंदानें तयार असतात. हिंदू हा शब्द जोंवर आपण धर्मवाचक आणि जातिवाचक म्हणून वापरत आहोंत तोंवर 'जपान जपान्याचा तसा हिंदुस्थान हिंदूंचा' असें कसें म्हणतां येईल ?

हिंदुमहासभेंत आलेला आग्रहीपणा पुष्कळसा 'तूं अरे तर मी का रे' अशा प्रतिक्रियात्मक स्वरूपाचा आहे हे मी ओळखतों. तुम्हांलाहि पटलें असेल तें. पण हें डोकेफोडीचें राजकारण परिणामीं हितकर होत नाहीं. मुसलमान जातिनिष्ठ हे सरकारच्या कच्छपीं लागून हित साधूं लागले म्हणून हिंदु जातिनिष्ठांनीहि तोच मार्ग पत्करला तर राष्ट्रीय लक्ष्याचें काय व्हायचें ? या जातीला अमुक जागा मिळाल्या म्हणून दुसरी जात सरकारकडे अर्ज विनंत्या करूं लागली तर उच्च व मध्यम वर्गाचें थोडेफार कल्याण होईल. पण बहुजनसमाजाचें हित असल्या डावपेंचांनीं कसें साधणार ? तें साधायला स्वातंत्र्यच मिळविलें पाहिजे. स्वातंत्र्य मिळवून सर्व लोकांनीं निवडलेल्या प्रतिनिधींची घटनासमिति ( Constituent Assembly ) बोलाविणें हाच जातीय वादावर उत्तम तोडगा आहे असें जें पं. नेहरू म्हणतात त्याचें तात्पर्य हेंच होय. 'घटनासमिति' या विषयाचा विचार करतांना हा मुद्दा अधिक स्पष्ट करीनच.

काँग्रेसला नेस्तनाबूद करूं पाहणारे हिंदु जातिनिष्ठ अखेर हिंदूंचाच घात करणार आहेत. कारण काँग्रेस ही आजतरी प्राधान्येंकरून हिंदूंची संस्था आहे. हिंदूमहासभा व काँग्रेस यांची लढत लागली याचा अर्थ हिंदूंत यादवी माजली असाच दुर्दैवानें होणार ! मुस्लीम लीग ही अराष्ट्रीय शक्तीच्या आहारीं गेल्यानें काँग्रेसविरुद्ध उठलेली असावी हें साहजिकच आहे. हिंदुस्थानांतील

मुख्य जातिसंस्था अशा रीतीनें एकजुटीनें लढतात कोणाविरुद्ध ? परसत्ते-विरुद्ध का ? छे ! मुळींच नाहीं. परसत्तेशीं सहकार्य करण्याबाबत त्यांची चढाओढ लागलेली दिसते. एकजूट होऊन त्या लढत आहेत हिंदी राष्ट्रीय सभेविरुद्ध. आपापल्या संस्कृतीच्या जपणुकीच्या नादांत त्या नेमकें विसरतात काय ? तर आपल्या कंगाल उपाशी बहुजन समाजाची उन्नति.

हिंदुमहासभेला तसें पाहिलें तर राजकीय आघाडी सोडल्यासहि किती काम आहे ! हिंदुसमाजाचा अवाढव्य डोलारा अगदीं पोखरून निघाला आहे; पडदापद्धति, हुंडा, कन्याविक्रय, उपजातींची अगणितता, आर्थिक विषमता, गुंडगिरी इ० दुष्ट दोषांनीं हिंदु महिलांचें जीवन कष्टमय झालें आहे; दानाचा उपयोग आळशी बरागी पोसण्याकडे होतो तर वैराग्यसंपन्न कार्यकर्ते उत्तेजनाभावीं पिचत रहातात; हिंदुधर्माची विशालता, सौंदर्य, सहिष्णुता अगणित हिंदूंना कळलेली नाहीं; हिंदुधर्म म्हणजे दैववाद व अंधश्रद्धा हीच कल्पना जोरांत दिसते. ही दुरावस्था नाहींशी करण्यासाठीं हजारों सच्छील व सेवापरायण कार्यकर्ते निघून त्यानीं आपल्या विराट् समाजाच्या अंतरंगापर्यंत जाऊन कार्य केलें पाहिजे. **' बहुजनाच्या हितासाठीं, बहुजनाच्या सुखासाठीं जगभर संचार करा '** ( चरथ भिक्खवे चारिकं बहुजन हिताय बहुजन-सुखाय ) हा भगवान् गौतमबुद्धानें आपल्या शिष्यांना केलेला उपदेश हजारों हिंदुधर्म सेवकांनीं व सेविकांनीं आचरणांत आणणें अगत्याचें आहे.

इतर जमातींच्या संस्थांना मला हेंच सांगावयाचें आहे. राजकीय आघाडीवर सरकारजमा व अराष्ट्रीय राजकारणांत आपलें शक्तिसर्वस्व न वेचतां या संस्थांनीं आपलीं सामर्थ्यें आपापल्या जमातींच्या सर्वांगीण सुधारणेसाठीं खर्च करावींत. आपला देश अस्ताव्यस्त पसरलेला आणि धर्म, पंथ, प्रांत, इ० भेदांनीं शतशः विभंगलेला आहे. त्यांत पारतंत्र्याच्या दुर्धर रोगानें त्याला खिळखिळें केलें आहे. अशा वेळीं परकीय सत्तेला एकजुटीनें विरोध केला तरच आपलें शिर उंच होण्याचा योग येणार आहे. धर्मांत व्यक्तिस्वातंत्र्य असावें आणि धर्म हाच व्यक्ति व समाज यांचा खरा मोक्षदाता आहे हें खरें पण राजकीय आघाडीवर धर्माला, जात्यंधतेचें विकृत रूप देऊन आपण यरोडे माजवूं लागलों तर परलोकींचा मोक्ष राहोच पण इहलोकींची मुक्तिहि दुरावेल. म्हणून राजकीय दास्य नष्ट करण्यासाठीं सर्वांनीं राष्ट्रीय झेंड्याखालीं एकत्र यावें आणि वैयक्तिक व सामाजिक उन्नतीचीं कार्यें त्या त्या जातिसंस्थांनीं करावीं हाच सर्वांत श्रेयस्कर मार्ग होय. २–७–४३

## पाकिस्तान : : ६

'पाकिस्तान' हा शब्द तुम्ही अलीकडे नेहमीं ऐकतां. याचा अर्थ 'शुद्ध भूमि' किंवा 'पवित्र भूमि' असा आहे. पण हा सर्वसाधारण अर्थ झाला: हिंदुस्थानपुरता याचा अर्थ घ्यायचा म्हणजे सर्व भारतवर्षातील मुस्लिम प्रधान भाग वेगळा काढून जो एक स्वतंत्र देश होईल तो 'पाकिस्तान.' 'आम्ही सर्व हिंदुस्थानातच राहिलों तर लोकशाहीच्या रगाड्यांत बहुसंख्य हिंदु आमचा खुर्दा करून टाकतील! म्हणून आमची जमात, आमचा देश, आमचा धर्म, आणि आमची संस्कृति अबाधित रहावी याकरितां आम्हांला आमचें राष्ट्र निराळें काढून द्या' असें जिना व त्यांची प्रभावळ बोलत असते !

इस्लामच्या ज्ञानकोषांत असें म्हटलें आहे कीं 'पाकिस्तानचें इंग्रजींत भाषांतर करतां येणेंच शक्य नाहीं.' वास्तविक पाकिस्तान ही कल्पनाहि इतरांना समजावून देतां येणें शक्य नाहीं अशी स्थिती आहे! ज्या या घोषणेवर जिना आपल्या राजकारणाचें तावृत नाचवीत आहेत त्या घोषणेचें स्वरूप काय हें खुद्द जिनाहि सांगू शकत नाहींत. राजेंद्रप्रसादासारख्या पंडितानें जेव्हां जिनांना यावावत जाहीर सवाल केले तेव्हां वाचावाचीपलीकडे जिनांना कांहीं मजल गांठतां आली नाहीं. 'पाकिस्तान हें एक माझें श्रद्धेय (Article of Faith) आहे.' असें जिना वेळोवेळीं पुकारतात. पण 'पाकिस्तान'ची खरी कल्पना देण्याचें ते नेहमीं टाळतात. याचें कारण खरें असें आहे

कीं जिनांचा हा एक राजनैतिक डाव आहे. 'पाकिस्तान' ही घोषणा संदिग्ध व गूढ असली तरी तिच्या बळावर आपल्या अगणित अनुयायांना झुलवून जिना आपलें प्रस्थ कायम ठेवूं शकतात व नव्या घटनेंत जास्तींत जास्त अधिकार पदरांत पाडण्याची कारवाई त्यांना साधतां येते! पण जागृत भारतवर्ष त्यांचा हा डाव त्यांच्यावर उलटविल्याशिवाय खास राहाणार नाहीं!

हिंदुस्थानांत हिंदु आणि मुसलमान अशीं दोन राष्ट्रें आहेत. दोघांच्या संस्कृति भिन्न आहेत. आणि एक जात दुसरीवर आपली संस्कृति लादल्याशिवाय राहाणार नाहीं अशी ओरड निरनिराळ्या पद्धतीनें महासभा व लीग आज अनेक दिवस करीत आहेत. खेदाची गोष्ट अशी कीं अखंड भारताचे खंदे पुरस्कर्ते वीर सावरकर यांनींच प्रथम अहमदाबाद (नव्हे कर्णावती!) येथील महासभेच्या अध्यक्षीय भाषणांत प्रथम प्रकट निवेदन केलें कीं, "हिंदुस्थान एक संघ नाहीं. त्यांत हिंदु आणि मुसलमान अशीं दोन राष्ट्रें आहेत." (१९३७) पुढील वर्षी नागपूर येथें भरलेल्या महासभेनें ठराव केला कीं, "या देशांत खरी राष्ट्रीय अशी एकच संस्था आहे. आणि ती म्हणजे हिंदुमहासभा." याची प्रतिक्रिया सुरू होऊन जिना व त्यांचे अनुयायी यांनीहि आपला अगोदरच वर चढलेला फुटीरपणाचा सूर आणखी वर लाविला! याच सुमारास कॉंग्रेसच्या कार्यकारी समितीनें 'मुस्लिम लीग आणि हिंदुमहासभा या जातीय संस्था असल्यानें त्या संस्थांचा सभासद असणाऱ्या माणसास कॉंग्रेसचे पदाधिकारी होतां येणार नाहीं.' असा ठराव केला. तेव्हांपासून कॉंग्रेस, हिंदुमहासभा आणि मुस्लिम लीग असा 'तिरंगी' सामना सुरू आहे! तथापि लीग आणि महासभा यांच्या नेत्यांचे फतवे आणि वक्तव्यें पाहिलीं म्हणजे या जातीय संस्था एकमेकींविरुद्ध झुंज खेळतांना क्वचितच आढळतात. दोघींच्याहि विरोधाचें लक्ष्य एकच आणि तें म्हणजे राष्ट्रसभा! अशा रीतीनें द्विराष्ट्रकल्पनेला कळत न कळत उचलून धरणाऱ्या दोन जातीय संस्थांशीं अखंड भारताचा ध्वज उच्च फडकत ठेवणाऱ्या राष्ट्रसभेचा वाद आहे!

मीं प्रथम सांगितलेंच कीं मुस्लिम लीगच्या मुख्यांना या विषयाची स्पष्ट कल्पना देतां येत नाहीं. पण मुस्लिम लीगच्या कृपाछत्राखालीं असलेल्या कांहीं पंडितांनीं आपापली विद्वत्ता व कल्पकता खर्चून पाकिस्तानच्या कल्पनेला कांहीं स्पष्ट आकार देण्याचा प्रयत्न केला आहे. या पंडितांच्या योजनांचा प्रथम परमार्ष घेऊं.

या योजना मुख्यतः चार आहेत.

"पंजाबी" हें नांव धारण करणाऱ्या कोणी गृहस्थानीं 'पाकिस्तान'च्या योजनेंत हिंदुस्थानचीं पांच संघराज्यें (Federations) करावीं असें सुचविलें आहे. १ सिंधुस्तान, २ हिंदुभारत, ३ राजस्थान, ४ दक्षिणी संस्थानांचा गट, आणि बंगाल अशीं तीं पांच संघराज्यें होतील. प्रत्येकांत हिंदु आणि मुस्लिम लोकसंख्या विशेष प्रामुख्यानें येईल आणि कांहीं संघ निश्चित हिंदुप्रधान तर कांहीं निश्चित मुस्लिम-प्रधान असे होतील. या योजनेंत एकमेकांना विश्वास वाटावा म्हणून 'पंजाबी' म्हणतात, "उत्तरभागीं काश्मीरसारखें एक मुस्लिम संस्थान हिंदू अधिपत्याखालीं तर दक्षिणेकडे हैदराबादसारखें एक हिंदु संस्थान मुस्लिम राजाच्या हातीं असल्यानें परस्पर विश्वास राहील." ही सारी योजना एकमेकाच्या विश्वासासाठीं परस्परांचे लोक ओलीस ठेवण्याच्या विचारसरणींतून अवतरलेली आहे !

ही शेखमहंमदी योजना इथेंच सोडून दुसरी योजना घेऊं. हिला **अलीगड योजना** म्हणतात. सय्यद् जाफरल हसन आणि महंमद अफझुल हुसेन काद्री या अलीगडच्या दोघा प्रोफेसरांनीं ही काढली आहे. या प्रोफेसरद्वयाला दक्षिणेकडे हैद्राबादचं स्वतंत्र संस्थान तर राहालाच पाहिजे, पण त्यांत वऱ्हाड व कर्नाटक सामील करावेत असाहि या विद्वान् दुकलीचा आग्रह आहे! पण या 'अलीगड' पंडितांनीं विशेष डोकें चालवून आणखी एक शकल काढली आहे. ते म्हणतात हिंदुस्थानांतील ५०,००० लोकसंख्येच्या वरचीं जीं शहरें आहेत तीं स्वतंत्र शहरें (*Free cities*) म्हणून ठेवावींत. जर्मनीच्या उत्तरेस डॅन्झिग्

हें बंदर जसें आहे तशीं हीं शहरें असावींत! या पंडितांनीं हिंदूंना झेक आणि *मुसलमानांना सुडेटन् म्हटलें आहे. या सुडेटन् लोकांना बाहेरचा 'हिटलर'* मदत-नीस कोण आहे कोण जाणे! कारण मागासलेलीं आणि घाबरलेलीं मुस्लिम राष्ट्रें गौरकाय साम्राज्यांच्या कृपेनें कशींतरी तगून आहेत एवढेंच! त्यांतला कुठला 'फ्यूअरर्' या हिंदी सुडेटनना मदत करूं शकणार? पण जाऊं द्या. आपण स्वतंत्र शहरांबद्दल बोलत होतों नाहीं का? एका डॅन्झिग प्रकरणांत नाझींची टाकलेली ठिणगी कशी पेटली आणि युरोपचाच नव्हे तर सर्व जगाचा स्वाहा करण्याचें विक्राळ कृत्य तिनें कसें आरंभिलें, हें पाहिलें म्हणजे हिंदु-स्थानांत डॅन्झिग शहरें निर्माण झाल्यास तीं कशीं अनर्थ माजवितील हें कळे-लच! अशा विध्वंसी योजनेस कोण समंजस राष्ट्रवादी मान्यता देईल?

हैद्राबादचे डॉ. अबदुल लतीफ **यांची योजना** सांस्कृतिक क्षेत्रें (Cultural Zones) निर्माण करण्याची आहे. आणि हीं सांस्कृतिक क्षेत्रें व्यवस्थित *निर्माण व्हावीं म्हणून हिंदु व मुस्लिम यांच्या लोकसंख्येची* इकडून तिकडे आयात-निर्यात करावी अशी लतीफ यांची शिफारस आहे! सांस्कृतिक दृष्ट्या मुसलमान व हिंदु यांचीं क्षेत्रें तयार करतांना कलकत्ता व मद्रास हीं महत्वाचीं बंदरें मुस्लिम प्रदेशांत आणून ठेवण्यास लतीफ साहेबांनीं मागेंपुढें पाहिलें नाहीं! अलीकडे ही योजना मवाळ स्वरूपांत बदलण्यास लतीफ साहेब तयार असावेत असें दिसतें. कारण अलीकडे लतीफ यांना राष्ट्रीय सभेच्या प्रामाणिक-पणाबद्दल आदर वाटूं लागला आहे. आणि या परिवर्तनाची किंमतही त्यांना द्यावी लागली आहे! कारण जे मुस्लिम लीगचे नेते जिनासाहेब त्यांना एके-काळीं डोक्यावर घेत होते ते आतां लतीफ म्हणजे एक 'उपद्यापी बाळ' (Busy-body) अशी शिवी हासडूं लागले आहेत!

पंजाबचे मुख्य प्रधान सर शिकंदर हयातखान यांनींहि एक योजना काढली होती! शिकंदर साहेब एक विलक्षण पुरुष होते. जिनाशीं त्यांचें रहस्य नव्हतें हें प्रसिद्धच आहे. पंजाबच्या राजकारणांत धनिक हिंदु व शीख यांच्या

सहकार्यावांचून यशस्वी होणें शिकंदरना अशक्य होते ! तेव्हां 'पाकिस्तान' च्या फुटीर योजनेशीं ते जाहीर रितीनें विरोध दर्शवीत. आणि हा विरोध तात्त्विक व बळकट आहे असें लोकांना पटावें यासाठीं त्यांनीं एक योजना केली होती. *सर्व हिंदुस्थानांत संघ राज्यें व्हावींत पण त्यावरील मध्यवर्ती सत्ता* मात्र एकजिनसी असावी अशी शिकंदर साहेबाची योजना होती. पण या योजनेंत मध्यवर्ती राज्ययंत्र म्हणून त्यांनीं जें सुचविलें होतें तें मात्र असें खुबीदार होतें कीं संस्थानिक वगैरेच्या साह्यानें त्यांत मुसलमानांचें नेमकें प्रस्थ वाढावें आणि राष्ट्रीय भावना शक्य तेवढी चेपली जावी !

पाहिल्यात ना या योजना ? यांचा तुम्हांला मीं ओझरता परिचय करून दिला आहे. पण तेवढ्यावरून सुद्धां तुम्हांला कळून येईल कीं, भारतवर्षाचे तुकडे करून कलहाचीं बीजें ठिकठिकाणीं पेरलीं जावींत अशाच या योजना आहेत. या योजना सर्वस्वीं फलद्रूप होणाऱ्या नाहींत. कारण त्यांत आर्थिक, राजकीय वगैरे अडचणींचे डोंगर आहेत. पण त्या योजना अमलांत येणार नाहींत एवढ्यावर आपण शांत राहूं नये असें मी आग्रहानें बजावतों. या *योजनांमागील फुटीरपणाची मनोवृत्ति जोंवर कायम आहे तोंवर हिंदुस्थानला* खरें स्वास्थ लाभणार नाहीं. म्हणून ती मनोवृत्ति कशी नष्ट होईल या तज-विजींत आपण असलें पाहिजे.

मी तुम्हांला वेळोवेळीं सांगत आलोंच आहे कीं, कुठलीहि कल्पना एकदम ज्वालामुखीसारखी फुटून वर येत नाहीं. अनेक लहान लहान ओहळ मिळून जशी महानदी होते तशीच कल्पनेची वाढ होते. मोर्ले-मिंटो सुधारणेंत मुसल-मानांच्या करिता वेगळे मतदार संघ राखून ठेवण्याची मेहेरबानगी इंग्रजांनीं जेव्हां केली तेव्हांच वास्तविक 'पाकिस्तान' चें विष पेरलें गेलें. राज्यकार-भाराच्या सोयीसाठीं हिंदुस्थानावर आपला एकछत्री अंमल दृढ करीत असतां इंग्रज कळत नकळत अखंड भारताची कल्पनाच चांगली बाळसेदार करण्यास झटत होते. हिंदुस्थानच्या इतिहासांतली ही प्रगतिपर कामगिरी इंग्रजांच्या

हातून (स्वार्थासाठीं का होईना!) पण योग्य तन्हेनें पार पाडली जात होती. पण याच वेळीं आपलें राज्य स्थिर करण्याकरितां येथील वाढत्या राष्ट्रीयत्वाला विरोध करण्याचा डावही त्यांनीं टाकला होता. आणि तो म्हणजे मुसलमानां-सारखी प्रबळ अल्पसंख्यांक जमात आपल्याकडे कायमची ओढून घेणें. अशा रीतीनें आपल्या एकछत्री अमलाखालीं अखंड भारत आणतानांच त्यांत द्विराष्ट्रकल्पनेलाहि फोफावण्यास इंग्रजांनीं वाव दिला.

लखनौ करारांत मिळालेल्या सवलतींवर मुसलमान संतुष्ट होईनात. त्यांच्या मागण्या वाढतच चालल्या. १९२८ सालीं मुस्लिमलीगनें एकंदर मागण्यांची संख्या चौदांवर नेऊन ठेविली! "हिंदुस्थानांत संघराज्य असावें, प्रत्येक प्रांत स्वायत्त असावा" असें तर मुस्लिम लीगनें म्हटलेंच. पण 'हिंदुस्थानच्या राज्यघटनेंत कांहीं फेरफार करायचा झाला तर **सर्वच्या सर्व** स्वायत्त प्रांत जेव्हां त्या सुधारणेला संमति देतील तेव्हांच तो फेरफार अमलांत यावा.' याचा अर्थ सरळच आहे. हिंदुस्थानांत कुठलीहि प्रगतिपर सुधारणा करण्याला एका मुस्लिम प्रांतानें विरोध केला तरी ती सुधारणा रद्द व्हावी! म्हणजे एकट्या दोघां अडेलतट्टू मुसलमान प्रांतांच्या हातांत साऱ्या हिंदुस्थानचें राजकारण खेळविण्याची शक्ति राहावी!

आपला स्वतंत्र सुभा स्थापण्यापूर्वी गाऱ्हाणीं तयार करून ठेवण्याची जाति-निष्ठ मुस्लिम पुढारी आटोकाट तजवीज करीत होते. आपल्या नोकऱ्यांची हमी पाहिजे त्या प्रमाणांत सरकार घेत नाहीं अशी मुस्लिम पुढाऱ्यांनीं ओरड सुरू केली. पण ही ओरड प्रमाणाबाहेर वाढविणें त्यांना सोयीचें नव्हतें. कारण सरकारच्या कृपेवर तर त्यांची मदार होती! नंतर १९३५ च्या कायद्यानें जे तुटपुंजे अधिकार मिळाले त्यांत आपणांस योग्य तो वांटा न मिळाल्याची तक्रार त्यांनीं पुढें आणली. "पाश्चात्य लोकशाही हिंदुस्थानला निरुपयोगी आहे आणि ती इकडील राष्ट्रीय जीवनांत एकाद्या रोगासारखी होऊन बसेल."

असे उद्गार जिनांनी काढले! याचें कारण काय तर एका माणसाला एक मत मिळण्याचें ठरलें तर आमच्या तिप्पट जे हिंदु आहेत त्यांना म्हणे तिप्पट जागा मिळतील! आणि हेच जिनासाहेब वारंवार पुकारा करतात कीं, "अहो आमचा इस्लाम धर्म मुळीं लोकसत्तावादीच आहे. १३०० वर्षांपूर्वीच आम्हीं लोकसत्तेचे धडे घेतले आहे."

जिनांच्या तक्रारी दूर करण्यासाठीं कॉंग्रेसनें आपला स्वाभिमान बाजूला सोडून उदंड खटपट केली. १९३५ सालीं राजेंद्रबाबूंनीं एक तडजोडीची योजना सुचविली तेव्हां त्या योजनेस 'हिंदु' पुढाऱ्यांची संमति नाहीं म्हणून जिनांनीं ती फेटाळून लाविली! कॉंग्रेसचें हिंदुसमाजावर वजन आहे असें मानायला त्यावेळीं जिना तयार नव्हते! पण १९३८ सालीं तीच कॉंग्रेस संपूर्ण 'हिंदु-संस्था' असल्याचें जिना ओरडूं लागले. ६-७ प्रांतांत कॉंग्रेस मंत्रीमंडळ स्थापन झालेलीं पाहून जिनांचें पित्त खवळलें ! वास्तविक ब्रिटिश सरकार कॉंग्रेसचा राज्यकारभार डोळ्यांत तेल घालून पहात होतें. मोठमोठ्या उच्चपदाधिष्ठित ब्रिटिश अधिकाऱ्यांनीहि कॉंग्रेसच्या समतोल राज्यकारभाराचे गोडवे गायिले होते. आणि अल्पसंख्याकाना वेळीं अवेळीं कुरवाळायला सिद्ध असलेलें ब्रिटिश सरकार आपल्या लाडक्या जमातींवर अन्याय होऊं देईल हें शक्य नव्हतें! पं. नेहरूंनीं 'तुमच्यावरील अन्यायाची चौकशी मी जातीनें करतों. मजबरोबर चला. कुठें अन्याय झाला असेल तिथें आपण जाऊं.' असं जाहीर आव्हान दिलें आणि राजेंद्रप्रसादांनीं तर 'फेडरल हायकोर्टाकडे तुमच्या अन्यायाची दाद मागा. आम्ही तयार आहोंत.' असें जिनांना कळविलें! पण 'अगा जें झालेंचि नाहीं!' तें जिना कसें सिद्ध करणार? जिनांनीं कांहीं उर्मट उत्तर देऊन वेळ मारून नेली. कॉंग्रेसवरील आरोप त्यांना सिद्ध करतां आले नाहीतच. पण आपणांवर अन्याय झाल्याचें नाटक चांगलें रंगवून 'पाकिस्तान'ची भूमिका आपल्या अडाणी जातिबांधवांच्या मनांत उत्तम तऱ्हेनें तयार करून ठेवण्याची मात्र त्यांनीं शिकस्त केली. १९४० सालीं

लाहोर येथें 'पाकिस्तान'चा ठराव मुस्लिम लीगनें संमत केला. १०–११ वर्षापूर्वी याच सुविख्यात शहरीं कॉंग्रेसनें संपूर्ण स्वातंत्र्याचा ठराव केला होता. हा एक विचित्र योगायोग नाहीं का?

'पाकिस्तान'ची कल्पना सुप्रसिद्ध उर्दू कवि सर महंमद इक्बल यांच्या प्रतिभेंतून उदयाला आली असें जिना सांगतात. हजरत इक्बल साहेबांचें **'सारे जहाँसे अच्छा। हिंदोस्ताँ हमारा'** हें गीत आपण कोट्यवधि हिंदी लोक भक्तीनें गातों. इक्बल साहेबाच्या विश्वव्यापी प्रतिभेनें निर्मिलेलें 'पाकिस्तान' कसें होतें कोणास ठाऊक? पण जिनांच्या अराष्ट्रीय 'पाकिस्तान'चें स्वरूप मात्र संकुचित आणि प्रतिगामी आहे. आपण आणि आपली प्रभावळ यांचें प्रस्थ कायम टिकविण्यासाठीं हें लोकशाही-विरोधी खूळ त्यांनीं माजविलें आहे.

कुठलीहि टूम निघाली आणि ती कितीहि हास्यास्पद किंवा घातुक असली तरी तिला चार अनुयायी मिळतातच. 'पाकिस्तान'ला मुस्लिम जातिनिष्ठांनीं उचलून धरावें यांत नवलच नाहीं. पण अत्यंत प्रगतिवादी म्हणविणारे आमचे कम्युनिस्ट लोकहि 'पाकिस्तानला मान्यता देण्याविषयीं गळ घालतात' तेव्हां अचंबा वाटतो. त्यांचें म्हणणें असें कीं, "जिना आज पाकिस्तानवर अडून बसले आहेत ना? करा कबूल त्यांची मागणी. ती मागणी मिळाली कीं मुस्लिम लीग आपणांस मिळेल आणि मोठा स्वातंत्र्याचा लढा आपण लढवून यशस्वी करूं." यांत दोन तऱ्हेचे भावडेपण आहेत. नुसती पाकिस्तानची मागणी मान्य होण्यावरच जिना अडले आहेत, एऱ्हवीं स्वातंत्र्यसंग्रामांत पडायला ते उत्सुक आहेत ही गोष्टच मुळीं खरी नाहीं! आणि समजा, 'पाकिस्तान'ची मागणी मान्य केली तर जात्यंध पुढाऱ्यांच्या आघाडीचें एकदम विसर्जन होईल हें कोणीं सांगितलें! जिना राष्ट्रीय आखाड्यांत उतरले कीं ब्रिटिश सरकार नवे जातिनिष्ठ पुढारी उभे करील आणि दुर्दैवानें असे कर्तबगार 'पिसाळ' मिळणें हिंदुस्थानात काय मोठेंसें अशक्य आहे?

म्हणजे 'पाकिस्तान'च्या फुटीर मागणीला राष्ट्रीय ऐक्यासाठीं मान्यता द्यायची आणि जात्यंधता मात्र तशीच कायम राहायची ही दुहेरी आपत्ति कम्युनिस्टांना दिसत नाहीं का? ते नेहमीं आंतरराष्ट्रीय दृष्टीनें विचार करतात. त्यामुळें त्यांचे निर्णय राष्ट्राच्या डोक्यांवरून जातात. आणि लक्ष्याच्या दृष्टीनें त्यांची बुद्धि चालू असते. ( प्रत्यक्ष लढ्याची वेळ आली म्हणजे मात्र कधीं तो भांडवलवाल्यांचा आहे म्हणून तर कधीं तो लोकशाही–विरोधी आहे म्हणून ते तटस्थ राहतात ही गोष्ट वेगळी! ) अर्थात् त्यांचा पाकिस्तान बद्दलचा दृष्टिकोन तुम्हांआम्हांला पटण्यासारखा नाहीं.

पण असे कांहीं सिद्धांतजीवि (Theorists) लोक सोडले तर 'पाकिस्तान'ला विरोध करायला हिंदुस्थानातले बहुतेक प्रमुख पक्ष, पंथ, व जाति तयार आहेत हें सुदैव समजलें पाहिजे. खुद्द मुसलमानांतच 'पाकिस्तान'ला विरोध करणारा मोठा पंथ आहे. गेल्या ५० वर्षांत कॉंग्रेसनें आपल्या त्यागानें व सेवेनें जी पुण्याई संपादन केली तिच्यामुळें मुसलमानांतदेखील राष्ट्रीय म्हणविण्यांत भूपण मानणारा एक भाग निर्माण झाला आहे व वाढत आहे. खुद्द कॉंग्रेसच्या तिरंगी झेंड्याखालीं मातब्बर मुस्लिम पुढारी व हजारों मुसलमान आहेत. सरहद्द प्रांत हा तर खुद्द कॉंग्रेसचाच प्रांत आहे. ('पाकिस्तान'च्या संकल्पित सरहद्दींत ही मोठीच धोंड आहे ! ) स्वतंत्र मुस्लिम-परिषद् ही पूर्णपणें नसली तरी बरीच कॉंग्रेसच्या छायेखालीं आहे. तेव्हां या सर्वांची आघाडी भारतवर्षाच्या विभक्तीकरणाला विरोध करायला सज्ज आहेच. खोजा व मोमीन या जमातींच्या पुढाऱ्यांनीं 'पाकिस्तान'ला धुडकावून लाविलें आहेच. परदेशस्थ मुसलमान व्यापारी, खाकसार व 'अहरार' पक्ष, बंगाल्यांतील कृषक्–प्रजा–पक्ष यांच्यांत आणि मुस्लिम लीगमध्यें विस्तव जात नाहीं ! पंजाबांतले लीगवाले मुसलमान कडव्या शिखांच्या भयानें का होईना पण 'पाकिस्तान' बद्दल फारशा उत्साहानें जाहीर रीतीनें बोलत नाहींत.

हिंदुमहासभा 'पाकिस्तान'च्या विरुद्ध आहे हें सांगणें नकोच. आणि मुसलमानांना न्याय मिळावा किंवा अधिक सवलती मिळाव्या असें जरी कॉंग्रेस सांगत असली तरी कॉंग्रेसनें 'पाकिस्तान'ला मान्यता दिलेली नाहीं. ती देणेंहि शक्य नाहीं. "अखंड भारत हें माझें श्रद्धेय आहे." असें म. गांधींनीं स्पष्ट शब्दांत नुकतेंच जाहीर केलें. अलाहाबाद येथें मागील वर्षी भरलेल्या ऑ. इं. कॉं. कमिटीनें राजाजींचा पाकिस्तानवादी ठराव फेटाळला इतकेंच नव्हे तर अखंड भारतावरील श्रद्धा व्यक्त करणारा निःसंदिग्ध ठराव त्याच बैठकींत केला. मीं तुम्हांला वेळोवेळीं सांगितलेंच आहे कीं, मिरासदार मुस्लिम पुढाऱ्यांची आळवणी करण्याचा नाद सोडून जर कॉंग्रेसनें मुस्लिम बहुजनसमाजाला आपलासा करण्याचा कार्यक्रम प्रचंड प्रमाणावर केला असता तर कॉंग्रेसला आज जी थोडी मवाळ भूमिका लोंगपुढें घ्यावी लागत आहे तशी लागलीच नसती. आणि मग 'पाकिस्तान'चा बागुलबोवा एवढा प्रबळहि झाला नसता.

शीख 'पाकिस्तान'च्या योजनेचे द्वेष्टे आहेत. हिंदी ख्रिस्ती लोकांनीं अखंड भारताचीच कल्पना उचलून धरिली आहे. पारशी पूर्वीपासूनच राष्ट्रीय वृत्तीचे अर्थातच विभक्तीकरणाचे विरोधक आहेत. आणि सप्रूसारख्या कांहीं वजनदार पुढाऱ्यानी पक्षातीत परिषद् (Non-party Conference) म्हणून जी संस्था काढली आहे तीहि पाकिस्तान-विरोधीच आहे.

डॉ. आंबेडकर या विद्वान् 'हरिजन' नेत्यानें 'पाकिस्तान' या विषयाचा सांगोपांग अभ्यास करून ( Thoughts on Pakistan ) हें उत्कृष्ट पुस्तक प्रसिद्ध केलें आहे. त्यांत त्यांनीं 'पाकिस्तान' मान्य करण्यांत हिंदूंचाच फायदा आहे असें सप्रमाण सिद्ध केलें आहे. "'हिंदु'स्थानांत 'पाकिस्ताना'पेक्षां पिकें पुष्कळ राहतील. लोखंड, दगडी कोळसा, सोनें इ० मूल्यवान् धातू 'हिंदु'-स्तानांतच प्राचुर्यानें आहेत. हिंदु-प्रधान भारताचा महसूल १२० कोटी तर मुस्लिम-प्रधान भारताचें उत्पन्न ३६ कोटी! तेव्हां विभक्तीकरण हिंदूंच्याच

फायद्याचें होईल तें त्यांनी मान्य करावें. नाहींतर आम्हांला शेंकडा पन्नास टक्के अधिकार एकंदर भारताच्या राजकारभारांत द्या असें जिना म्हणतील. एक चतुर्थांश मुस्लिम लोकसंख्येला निम्मा वांटा देण्यापेक्षां एक कंगाल भाग तोडून दिलेला काय वाईट ?" आंबेडकरांची ही सूचना विशेष तऱ्हेनें सांगणारें 'पाकिस्तान कीं पन्नास टक्के ?' हें माझे विद्वान् मित्र श्री. प्रभाकर पाध्ये यांचें पुस्तक तुम्ही वाचा अशी माझी शिफारस आहे.

पण 'पाकिस्तान' मान्य करण्यांत हिंदूंचा फायदा कितीहि असला तरी हिंदु ही योजना कधीं मान्य करणार नाहींत. कारण समजा अखिल भारताचे दोन भाग केले आणि आंबेडकरांच्या म्हणण्याप्रमाणें संपन्न भाग हिंदूंच्या वांट्याला आला तरी कंगाल 'पाकिस्तानां'तले मुसलमान आपल्या वैभवशाली शेजाऱ्याला सुखानें नांदू देतील अशी का आंबेडकरांची कल्पना आहे ? म्हणजे अखिल भारताच्या हृदयांतलें दुहीचें शल्य कांहीं हटणार नाहींच.

—आणि 'पाकिस्तान' निर्माण केल्यानें अल्पसंख्यांकांचा प्रश्न सुटतहि नाहींच. कारण पुनः हिंदुस्थानांत अल्पसंख्य मुसलमान राहणार तर 'पाकिस्तानां'त अल्पसंख्य हिंदु राहणार. त्यांचा प्रश्न कसा सोडवावयाचा ? लतीफसाहेबांनीं लोकसंख्येची अदलाबदल करण्याची शेखमहंमदी शक्कल काढली आहे ! जणूं काय लोक म्हणजे निर्जीव शंखशिंपले किंवा मुर्की खिळारेंच आहेत ! आणि आपलीं पिढ्यानुपिढ्यांचीं घरेंदारें, व्यवसाय, ऋणानुबंध सोडून लोक कां सुखासुखी देशांतर करतील ? हिंदु तर खासच करणार नाहींत. कारण सरहद्द, बंगाल, पंजाब, इ० जे प्रांत 'पाकिस्तानां'त समाविष्ट करण्याचा मुसलमानाचा इरादा आहे त्यांत हिंदु अल्पसंख्य असले तरी धनवंत आहेत. सरहद्द प्रांतांतील प्राप्तीवरील कराच्या उत्पन्नांत हिंदूंकडून ८० टक्के उत्पन्न येतें. बंगालमध्यें ८० टक्के जमीनमहसूल हिंदूंकडून येतो; आणि बँका, विमा इ० आर्थिक व्यवहार तर ८० ते ९० टक्के हिंदूंच्याच हातांत आहेत. एवढ्यावर तुळशीपत्र ठेवायला कोण तयार होईल ?

खरें पाहतां आपल्या जात्यंध व अरेराव पुढाऱ्यांचा आत्मघातकी उपदेश न ऐकतां मुसलमान समाज राष्ट्रीय दृष्टीनें पाहूं लागला तर त्याला हें कळून येईल कीं अखंड भारतात आपल्या बहुसंख्य संपन्न, व सहिष्णु हिंदु बांधवांशीं मिळून राहण्यांतच आपलें कल्याण आहे. आज बंगाल मुस्लिम सिंधचा खर्च चालवायला ३–४ कोटी रुपये हिंदुस्थानच्या तिजोरींतून मिळतात. उद्यां 'पाकिस्तानां'त सिंध गेला तर 'हिंदु'स्थान हे पैसे कां म्हणून देईल ? '*पाकिस्तानां'तल्या अल्पसंख्य हिंदूंपेक्षां हिंदुस्थानातले अल्पसंख्य मुसलमान* खूपच कमी भरतील. त्यांची स्थितीही हिंदूंच्या मानानें हलाखीची राहील. 'पाकिस्तानां'तल्या संपन्न हिंदूंकडून पैसे उकळण्याचा पद्धतशीर प्रयत्न झाला तर 'हिंदु'स्तानांतल्या मुसलमानाना संरक्षण मिळेलच असें कोणीं सांगावें म्हणजे पुनः भीति, द्वेष, आक्रमण यांचें राज्य अबाधित राहावें ?

"भौगोलिक दृष्ट्या हिंदुस्थानची रचना अशीच आहे कीं तें एक अखंड राष्ट्र असावें." असे उद्गार नुकतेच हिंदुस्थानचे व्हॉईसरॉय लॉर्ड लिनलिथगो यांनीं काढले. त्यांनीं कदाचित् मुस्लिम लीगच्या 'पाकिस्तानी' मुजोरीला पायबंद घालण्याकरितां ही अखंड भारताची घोषणा केली असेल ! पण कांहीं असलें तरी लिनलियगो यांचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. एका बाजूस *प्रचंड पर्वत आणि तीन बाजूंस महासागर अशा* नैसर्गिक सरहद्दींनीं हा विराट् देश निसर्गानेंच एक अखंड व स्वतंत्र राष्ट्र बनविलेला आहे. या अखंड राष्ट्राचें संवर्धन व संरक्षण अखंडत्व कायम राखूनच होईल.

म्हणूनच 'पाकिस्तान'ची योजना सर्वस्वीं टाकाऊ समजली पाहिजे. 'पाकिस्तान' पुष्कळ मुसलमानाना नको आहे. हिंदु, शीख, पारशी, ख्रिश्चन यांनीं त्याला झिटकारलें आहे. 'पाकिस्तान'नें अल्पसंख्यांकांचा प्रश्न सुटत नाहीं, आणि आर्थिक व्यवहार, संरक्षण इ० प्रश्न तर फारच गुंतागुंतीचे होऊन बसतात. या व अशा सर्व कारणांनीं 'पाकिस्तान'ची कल्पना जितकी अव्यवहार्य तितकीच अहितकारक आहे. 'पाकिस्तान' च्या स्पष्ट

स्वरूपाचा आराखडा न देता केवळ आपले प्रस्थ आपल्या जमातींत टिकविण्याकरितां मुस्लिम जातिनिष्ठ पुढाऱ्यांनीं हें भूत उठविलें आहे. हें भूत राष्ट्रवादाच्या महामन्त्रानेंच नाहींसें होणारें आहे. इकडे प्रांतिक राज्यकारभारांत वांटा मिळावा म्हणून सिंध, बंगाल, सरहद्द येथील इरसाल लीगपुढाऱ्यांशीं लगट करायची आणि पुनः जाहीर रितीनें 'आम्हीच तेवढें पाकिस्तानविरोधी' म्हणून ललित आरंभावयाचें अशा विचित्र 'हिंदुत्वनिष्ठ' राजकारणानें पाकिस्तान मरणार नाहीं! 'पाकिस्तान' चें प्रथम बीजारोपण करणाऱ्या साम्राज्यशाहीशीं सहकार्य करून 'पाकिस्तान' मारूं पहाणें म्हणजे बाजरी पेरून गहूं उगवतील अशी अपेक्षा करण्यासारखें आहे!

सोय आणि तारतम्य या गोष्टी जरी सोडून दिल्या तरी 'अखंड भारत' ही एक अखंड श्रद्धेची व इतिहासानें शतकानुशतकें संवर्धिलेली पवित्र कल्पना आहे. पूज्य विनोबा भावे यांनीं फार समर्पक रीतीनें 'अखंड भारत' या कल्पनेचें प्राचीनत्व पटवून दिलें आहे. ते म्हणतात, "आपल्या प्राचीन काव्यवाङ्मयांत अखंड भारताला धरूनच उपमाउत्प्रेक्षा असत इतकी ही कल्पना आपल्या जीवनात व प्रतिमेंत खोल गेलेली आहे. **'समुद्र इव गांभिर्ये धैर्ये च हिमवानिव'** (*समुद्रासारखा गंभीर आणि हिमालयासारखा धैर्यशील*) हें महापुरुषाचें वर्णन वाचलें कीं भारताचा विराट् आराखडा डोळ्यापुढें उभा राहातो. **'दुर्लभं भारते जन्म'** असें सुभाषित प्रसिद्ध आहे. 'दुर्लभं गुर्जरदेशे जन्म' अथवा 'दुर्लभं महाराष्ट्रे जन्म' असें काहीं कोणी म्हटलेलें नाहीं." शंकराचार्यांनीं आपले चार मठ चार दिशांना स्थापून हिंदुस्थानच्या सांस्कृतिक एकीची प्रतिष्ठापना केली असें 'जगाचा इतिहास' या आपल्या ग्रंथांत पं. नेहरूंनीं म्हटलें आहे. संस्कृतसारखी सांस्कृतिक राष्ट्रभाषा तयार करून प्राचीनांनीं अखंड भारत कल्पनेला भरपूर बळ देऊन ठेविलें. अशोक-अकबरादि सम्राटांनीं राजकीय दृष्ट्या हें एक राष्ट्र करण्याचा आटोकाट व बराच यशस्वी यत्न केला आणि नवीन युगांत इंग्रजांनीं

ते महत्कार्य साधलें. गेल्या शंभर वर्षांत दादाभाई, रानडे, टिळक, आझाद राममोहन, रामकृष्ण, रवीन्द्र, दयानंद, इक्बल्, रामतीर्थ, लजपतराय, नेहरू, मालवीय, महात्माजी, राधाकृष्णन्, रामन्, राजेन्द्रप्रसाद, इ० थोर पुरुषांनीं आपल्या दिव्य चरित्रानें अखंड भारताचा दीप अतिशय प्रज्वलित केला आहे. मुसलमानांना ही आपली जन्मभूमि वाटत असेल (वाटत आहे असें ते म्हणतात!) तर युगयुगांतरीं चालत आलेली ही श्रेष्ठ परंपरा त्यांनीं आनंदानें, अभिमानानें पत्करली पाहिजे. या पत्करण्यांत त्याचें हित आहे. भारतवर्षाच्या एकतेंत भारताचा उद्धार तर आहेच, पण हिंदु-मुस्लिमांच्या हार्दिक महत्कार्यानें जगाचाहि उद्धार होणार आहे. जगाला नेता शोभणारा राष्ट्रपुरुष स्वामी विवेकानंद म्हणत त्याप्रमाणें 'मुसलमान देह आणि हिंदु अंतःकरण' मिळून निर्माण झाला पाहिजे.

१४-२-४३

---

# घटना-समिति : : ७

हिंदुस्थानांत फुटीर वृत्ति माजविणाऱ्यांचे उद्योग आपण पाहिले. म्हणजे रोगाचीं लक्षणें व स्वरूप आपणांला कळलें. आतां औषधयोजना पाहायाची. तीच आज मी सांगणार आहे. हिंदी राष्ट्रवादाचा विकास पाहतांना कांहीं कांहीं चांगल्या परंपरांची मी तुम्हांला पुनः पुनः आठवण देत असतों. या परंपरांना धक्का लागेल असें कुठलेंही दुष्ट तत्त्व फोंफावूं द्यायचें नाहीं एवढें जरी आपण केलें तरी आपल्या राष्ट्रीय स्वातंत्र्याला आपण मोठी मदत केली असें होईल. शेतातलें मुख्य पीक नीट तरारावें याकरितां त्या पिकाचा अन्नांश शोषून घेणारें तण कापून टाकण्याची दक्षता शेतकरी बाळगतो. तण काढण्याचें काम शेतकरी स्त्रियाच बहुधा करतात. या विराट् देशांत राष्ट्रवादाची सुगी भरपूर यावी असें तुम्हांला वाटत असेल तर संकुचितपणा, जात्यंधता, वतनदारी असले तण काढून टाकण्याचा संकल्प करून निरसलपणें तो तडीस न्या. तुमचा हा संकल्प यशस्वी होण्यास ज्या परिणामकारक व प्रगतिपर संस्थांची माहिती असणें अवश्य आहे. त्यात **'घटना-समिति'** ही प्रमुख होय. कायदे कौन्सिलांच्या आणि दिवाणखान्यांतील मंडलाकार परिषदेच्या देखाव्यात ज्यांचीं मनें रिझलीं आहेत त्यांना **'घटना-समिति'** ही कल्पना विक्राळ वाटते. पण **'घटना-समिती'**नें खरोखरीची लोकशाही स्थापण्याचें कंकण बांधलेलें असतें हें विसरूं नका. लोकशाहीची कल्पना कायदे-

कौन्सिलांच्या श्रीमंती इमारतींतून काढून गरिबाच्या झोपडीपर्यंत नेण्याचें कार्य अनेक देशांत घटना-समितीनें केलें आहे. तिचा इतिहास उज्ज्वल आहे.

घटनासमिति म्हणजे 'कॉन्स्टिटयुअेट असेंब्ली' हा शब्द गेल्या कांहीं वर्षांत आपल्या देशांत लोकप्रिय झाला आहे. तथापि एकाद्या कल्पनेच्या लोकप्रियतेवरून तिचें स्वरूप लोकांना स्पष्ट झालें असतेंच असा अंदाज बांधणें चुकीचें होईल. घटना-समितीबद्दल आपणांस पुरेपुर माहिती बहुधा असत नाहीं. तिचें स्वरूप तर आपणाला पूर्ण कळलेंच पाहिजे, पण तिच्या मागील क्रांतिकारक तत्त्वाचा साक्षात्कार होणेंहि अगत्याचें आहे. असें झालें म्हणजे मगच तिची आवश्यकता अंतःकरणपूर्वक पटेल आणि तिच्या विरोधकाच्या विचारांत कोणतीं प्रतिगामी द्रव्यें भरलीं आहेत हें कळेल.

देशांतल्या सर्व लोकांनीं एकत्र येऊन आपल्या हिताची राज्यपद्धति स्थापन करायची हें 'घटनासमिति' या कल्पनेचें मंत्र आहे. देशातल्या वयात आलेल्या सर्व लोकांना मताचा अधिकार देऊन त्यांच्या मतांनीं जी एक लोकप्रतिनिधींची सभा बोलवितात तिलाच **घटना-समिति** म्हणतात. लोकशाहीची वाढ जसजशी होऊं लागली तसतसा लोकांना राज्यकारभारात मत असावें ह्या तत्त्वाला जोर येऊं लागला. पण सर्व प्रचंड लोकसंख्या एकत्र होऊन कांहीं काम उरकणें कसें शक्य होईल? म्हणून सर्वांनीं आपापल्या विश्वासांतले प्रतिनिधी निवडून द्यायचे आणि त्या प्रतिनिधींनीं लोकांना हितकर अशी राज्यघटना रचावयाची असा घटनासमितीचा कार्यक्रम असतो. म्हणजे जुनी गंजलेली राज्यघटना जेव्हां आमूलाग्र बदलायची असते तेव्हां घटना-समितीचा अवतार होतो.

इतिहासाचा क्रमच मुळीं असा आहे कीं एक विशिष्ट पद्धति कांहीं काळ प्रभावी ठरते. नंतर ती जीर्ण होऊं लागते. आणि मग प्रगतिविरोधक अशा

क्रिया तिच्या हातून होऊं लागतात. अर्थात् ही जीर्ण शीर्ण घटना मोडल्याशिवाय जनतेच्या प्रगतींतली अडचण दूर होणारी नसते. याच वेळीं नव्या घटनेची आवश्यकता निर्माण होते. म्हणून 'नवी घटना निर्माण करायची म्हणजे राष्ट्रांत नवचैतन्य आणायचें' असें एका फ्रेंच राजकारणपंडितानें म्हटलें आहे. अर्थात् हें नवचैतन्य आणण्यापूर्वी प्रस्थापित व्यवस्थेचा पाया उखडून टाकावा लागतो म्हणजेच क्रांति करावी लागते. "आपलें भवितव्य ठरविण्याच्या कामीं बहुजनसमाजानें सत्तेनें जुन्या पुढाऱ्यापासून हिसकावून घेतलेलें नेतृत्व" अशी ट्रॉस्की या क्रांतिकारकानें क्रांतीची व्याख्या केली आहे. घटना-समिति स्वातंत्र्य व सुखी जीवन यावर बहुजनसमाजाचा असलेला हक्क जाहीर करते आणि नवी राज्यघटना बनविण्याचें तंत्र लोकांच्या हातीं देते. घटनासमिति म्हणजे जुन्या राज्यपद्धतीला दिलेले परिणामकारक आव्हान असें म्हणतां येईल.

युरोपखंडात लोकशाहीच्या विकासक्रमांत घटना-समितीचाहि विकास झाला. 'राजा हा ईश्वरी अंश आहे' या कल्पनेविरुद्ध बंड करून उठलेल्या इंग्लंडच्या ऑलिव्हर क्रॉमवेलनें १६५३ सालीं एक घटना-समिति बोलाविली आणि नवा कायदा व घटना निर्माण केली. मध्ययुगांतला हाच घटना-समितीचा पहिला पराक्रम दिसतो. पुढें अमेरिकेनें 'मताधिकार नसेल तर कर देणार नाहीं' या तत्त्वावर इंग्लंडशीं झगडा मांडला आणि स्वातंत्र्ययुद्ध पुकारलें. १७८७ सालीं अमेरिकेनें एक घटना-समिति बोलाविली. आज अमेरिकन लोकशाहीची जी घटना दिसते तिचा पाया या समितीनें घातला.

जगांतल्या इतिहासांत फ्रेंच राज्यक्रांति ही लोकशाहीच्या दृष्टीनें घडलेली लोकोत्तर गोष्ट होती. राजा व त्याचे सरदार यांच्या अनियंत्रित व दैवी गणल्या गेलेल्या शक्तीला नेस्तनाबूद करण्याचा तो लोकांचा फार प्रचंड प्रयत्न होता. क्रांतीचे वारे वाहूं लागण्याच्या सुमारास कायदेमंडळातला एक तडफदार नेता मिराब्यू राजाच्या हस्तकाला म्हणाला, "आम्ही लोकांच्या

इच्छेनें या ठिकाणीं येऊन बसलों आहोंत असें आपल्या महाराजांना सांगा. संगिनींच्या टोंकांनीं विद्ध झाल्यावांचून आम्ही येथून हलणार नाहीं." फ्रेंच राज्यक्रांतीची ही नांदीच ठरली. पुढें राज्यक्रांति यशस्वी झाल्यानंतर १७७९ सालीं फ्रेंच पुढाऱ्यांनीं घटना-समिति बोलाविली व सत्तेचें निधान जनतेंत असतें अशी घोषणा केली. १८४९ सालींहि फ्रेंचांनीं पुनश्च एकदां 'घटना-समिति' बोलाविली आणि दुसरें लोकराज्य स्थापिलें.

१९१७ सालीं रशियांत झारशाही उलथून पडली तेव्हां सोव्हिएट पुढाऱ्यांनीं 'घटना-समिति' बोलाविली. ही अत्यंत विशाल स्वरूपाची होती. सोव्हिएट राज्यघटना अधिकांत अधिक लोकमतानुवर्ती करण्याचा तो प्रयत्न होता. १९१९ मध्यें जर्मनींतही 'घटनासमिति' भरूनच लोकराज्य स्थापण्यांत आलें. कॅनडा, आस्ट्रेलिया, आयर्लंड, झेकोस्लाव्हिया इ० देशांतहि घटना-समितीचें तंत्र स्वीकारून नव्या राज्यघटनेची प्राणप्रतिष्ठा करण्याचे प्रयत्न झाले.

आपल्या देशांत 'घटना-समितीची' क्रांतिकारक कल्पना प्रथम आणण्याचें श्रेय भाई मानवेंद्रनाथ रॉय यांना दिलें पाहिजे. १९२७ सालीं हिंदी राज्यघटना ठरविण्यासाठीं ब्रिटिश सरकारनें सायमन कमिशन नेमलें. हें कमिशन "सर्वगोरमंडळ" (All White Commission) म्हणून कुप्रसिद्ध झालें. यांत एकहि हिंदी माणूस घेतला नाहीं आणि हिंदी लोकाना आपली राज्य घटना ठरविण्याची अक्कल नाहीं असेंच सरकारनें जणूं सूचित केलें. हिंदुस्थानात प्रचंड खळबळ माजली आणि नरम-गरम सर्व पक्ष या कमिशनला विरोध करण्यास सरसावले. देशांत अपूर्व असा एकीचा देखावा दिसला. या जागृतीचा फायदा घेऊन घटना-समितीच्या कल्पनेवर एकी करावी असें रॉय यांनीं सुचविलें. रॉय त्यावेळीं हिंदुस्थानांत नव्हते; रॉय याची सूचना अर्थातच कोणीं पत्करली नाहीं. तरी आपण जेव्हां हिंदुस्थानच्या राष्ट्रीय इतिहासाचा विचार करतों

तेव्हां ह्या कल्पनेचें हिंदुस्थानच्या राजकीय क्षेत्रांत पहिलें दर्शन या दृष्टीनें रॉयच्या सूचनेचा उल्लेख केलाच पाहिजे. सायमन कमिशनच्या विरोधकांत श्रीमंत व उच्चवर्गीय पक्षहि घरेच होते. तेव्हां घटना-समितीसारखी मूलग्राही गोष्ट त्यांनीं कधींच मान्य केली नसती.

भाई एम्. एन्. रॉय यांच्या कल्पनेला पं. नेहरूंनीं अंगीकृत केलें आणि मग मात्र 'घटना-समिती' ला मान्यता मिळण्याची शक्यता एकदमच दिसूं लागली. १९३३ सालीं हिंदु आणि मुस्लिम जातिनिष्ठावर जेव्हां पं. जवाहरलालनीं कडक टीकेची फेर झाडली तेव्हां 'पाकिस्तान'चे एक आधारस्तंभ मर. सर महंमद इक्बल यानीं पंडितजींना तावातावानें सवाल केला कीं, 'जातीय प्रश्न समाधानकारक रीतीनें सोडविण्याचा तुमचा मार्ग तरी मग कोणता?' तेव्हां पं. नेहरूंनीं 'घटना-समिति' हें प्रत्युत्तर दिलें.

पंडितजींनीं घटना-समितिचें स्वरूप विशद करतांना म्हटलें आहे—

"राजकीय व राष्ट्रीय दृष्टीनें हिंदी लोक हे हिंदी भवितव्याचे धनी आहेत. ही गोष्ट सर्व संमत असेल (ती तशी व्हावयालाच पाहिजे) तर हिंदुस्थानची राज्यघटना हिंदी लोकानींच ठरवायला पाहिजे आणि व्यापक मतदानानें निवडलेली घटनासमितीच हें कार्य करूं शकेल. ज्याचा स्वातंत्र्यावर विश्वास आहे त्यांना याशिवाय दुसरा मार्गच नाहीं.…परकीयानीं लादलेल्या दिखाऊ व निर्जीव कायदेमंडळांशीं या घटना-समितीचें करालेंच साम्य नाहीं. कुठलाहि बाहेरील अडथळा न होतां लोकांनीं या घटनासमितीला मान्यता दिली पाहिजे…ही समिति जातीय प्रश्न सोडवील. अल्पसंख्याकाच्या मनात कसलाहि किंतु राहूं नये म्हणून मी असें सुचवितों कीं, अल्पसंख्यांकानीं आपले प्रतिनिधी स्वतंत्र मतदारसंघातून निवडावे. पुढें निवडणुकी कशा व्हाव्यात हें घटना-समितीच ठरवील…परकीय सत्तेनें व आपल्या देशांतील वतनदार वर्गानीं दडपून ठेवलेल्या शक्ति घटना-समितीमुळें मोकळ्या होतील. बहुजन-समाजाकडे देशाचें नेतृत्व जाईल. बहुजनसमाज क्वचित् चुकत असला तरी

त्याला स्वातंत्र्य मिळाल्यावर तो वास्तववादी होतो, त्याच्या डोक्यांत भ्रम नसतात. मजूर व शेतकरी यांचें वर्चस्व होऊन त्यानीं निर्णय घेतले आणि ते अपूर्व असले तरी त्यामुळें खऱ्या स्वातंत्र्याचा खूप मोठा पल्ला गांठतां येईल. ···खऱ्या जनमतापुढें जातीय प्रश्न टिकणार नाहीं अशी खात्री आहे. जातीय प्रश्न हे विषारी रोपटें मोठ्या काळजीनें वाढविलेलें आहे. तथाकथित सर्व-पक्षीय परिषदांत आणि दिवाणखान्यांतल्या चर्चा-मंडळांत त्याची वाढ झाली आहे. अशा वातावरणांत त्यावर काहीं इलाज सांपडणार नाहीं. पण स्वच्छ हवा आणि प्रकाश यांत आणतांच तें मरून जाईल."

पं. नेहरूंच्या वक्तव्यातील या उताऱ्यावरून घटनासमितीच्या सामर्थ्याची कल्पना येईल. कुठलीहि कल्पना पत्करली की तिचा तुफान प्रचार करण्याची पंडितजींची रीत सुप्रसिद्ध आहे. त्यांच्या इतका धडाडीचा व विख्यात प्रचारक एखाद्या कल्पनेला मिळाला कीं तिचा जगभर गाजावाजा होण्यास काय उशीर? काँग्रेसच्या अंतरंगांत पं. नेहरूंनीं ही कल्पना भिनविली. आणि महाराष्ट्रांत फैजपूरला जेव्हां त्याच्या अध्यक्षतेखालीं पहिली जानपद काँग्रेस (१९३६) भरली तेव्हां काँग्रेसमध्यें ठराव होऊन घटनासमितीला मान्यता मिळाली. या ठरावांत प्रथम १९३५ च्या कायद्याचा निषेध करण्यांत आला होता आणि असें स्पष्टपणें सांगण्यांत आलें होतें कीं,

"हिंदुस्थानात खरीखुरी लोकसत्ता प्रस्थापित व्हावी, जनतेकडे राज्य जाऊन राजसंस्था ही जनतेच्या परिणामकारक वर्चस्वाखालीं यावी असा काँग्रेसचा दावा आहे. अशी राजसंस्था वयांत आलेल्या सर्व हिंदी लोकांना मतदानाचा हक्क देऊन त्या हक्काच्या जोरावर निवडलेल्या घटना-समितीनेच स्थापन करतां येईल···"

खुद्द महात्मा गांधी पहिल्याप्रथम या कल्पनेबद्दल साशंक होते. पण नेहरूंच्या शिकवणुकीनें त्यांचें मतपरिवर्तन झालें. तें इतकें कीं या कल्पनेचे तेहि

पुढें युद्ध सुरूं झालें! हिंदुस्थानच्या लोकांची संमति न घेता हिंदुस्थानला सरकारनें युध्यमान राष्ट्रांत गोविलें! आणि म्हणून काँग्रेस मंत्रिमंडळांनीं स्वाभिमानपूर्वक राजिनामे दिले. १४ सप्टेंबर १९३९ रोजीं काँग्रेस वर्किंग कमिटीनें जो दूरदर्शी व पुरोगामी ठराव केला त्यांत स्पष्ट म्हटलें कीं—

"जर ग्रेटब्रिटन लोकशाहीचें सरक्षण आणि संवर्धन याकरितांच झटत असेल तर आपल्या स्वायत्त वसाहतींतल्या साम्राज्यवादाचा त्यानें शेवट करावा व हिंदुस्थानांत पूर्ण लोकसत्ता स्थापन करावी. बाहेरून अडथळा न आणतां आपली राज्यसंस्था 'घटना-समिती'च्या साह्यानें बनविण्याचा स्वयंनिर्णयाचा हक्क हिंदुस्थानला मिळाला पाहिजे."

पुढें १९४२ सालीं क्रिप्स् साहेब एक योजना घेऊन हिंदुस्थानच्या लोकांना खूप करण्याकरितां आले तेव्हां त्या योजनेत घटना-समितीला प्राधान्य देण्यांत आलें होतें! अर्थात् काँग्रेसनी आळवणी करण्यासाठींच हा ठराव होता हें उघड आहे. पण त्या योजनेच्या मागील स्वार्थी हेतु उघडकीस आणून काँग्रेसनें ही योजना फेटाळली! केवळ घटना-समितीच्या मधाच्या घोटाला भुलून कित्येक जहाल देखील ही योजना पत्करावी असें म्हणत होते. नंतर भारत-मंत्र्यांनीं पार्लमेंटमध्यें बोलतांना सरळच सांगितलें कीं, "घटना-समिति जरी आम्ही हिंदुस्थानला देऊं केली असली तरी अखेरचा अधिकार ब्रिटिश पार्लमेंटचाच राहणार." यावरून घटना-समिति म्हणून जें दान आम्हांला देऊं केलें होतें तें कितो पोकळ होतें हें दिसून येईल.

हिंदी स्वातंत्र्य खऱ्या खऱ्या अर्थानें जनतेचें असें व्हावयाचें असेल तर आपणांला घटना-समिति ही कल्पना पत्करलीच पाहिजे. "घटना-समिति नको असेल तर आहे हीच परसत्ता मुकाट्यानें जोखडासारखी वाहावी लागेल; किंवा लष्करशाही किंवा हुकूमशाही यांचें दास्य मान्य करावें लागेल, किंवा

एका बाजूला सोव्हिएट राज्यपद्धतीची राज्यघटना आणि दुसरीकडे फाटाफूट आणि गोंधळ असल्या आपत्तीला तोंड द्यावें लागेल." असा इषारा आपले थोर राष्ट्रपुरुष आज देत आहेत. 'ज्या लोकांच्या मतानें घटना-समिति निवडावयाची ते लोक अशिक्षित असणार. त्यांना राज्यघटना कशी बनवितां येणार?' असा कळवळ्यानें आक्षेप घेऊन कांहीं नेते म्हणतात कीं, 'त्यापेक्षां चार शहाण्या लोकांनीं एकत्र यावें आणि जनहिताला पोषक अशी राज्यघटना बनवावी.' किती गोंडस वाटतो हा उपदेश! नाहीं? पण यांत सामान्य जनाच्या विषयींची तुच्छता ओतप्रोत भरलेली थोड्याशा विचारानेंहि समजून येईल. हे सुखवस्तु आक्षेपक एक गोष्ट विसरतात कीं, राज्यघटना बनविणारे अज्ञ लोक स्वतः कांहीं घटना-समिति नेमणार नाहींत. बहुजन समाजात अशिक्षित लोक स्वतः काहीं घटनेचीं कलमें रचणार नाहींत तर ते तज्ञ प्रतिनिधी निवडून देतील आणि ते प्रतिनिधी घटना रचतील. आपल्या स्वतःच्या विश्वासाच्या तज्ञ प्रतिनिधींनीं रचलेली घटना बहुजनसमाज संतोषानें मान्य करील. बहुजनसमाजाचें पाठबळ ज्या घटनेला आहे ती अधिक टिकाऊ व सामर्थ्यवान् ठरावी यात नवल तें कोणतें?

'आपल्या पक्षाचें वर्चस्व स्थापण्याचा हा काँग्रेसचा डाव आहे. कारण घटना-समितीच्या एकदर व्यवहारांत काँग्रेस धूमधाम करून आपलें बहुमत करण्याचा प्रयत्न करील, असें जिनासाहेब म्हणतात. आपलें बहुजनसमाजात वजन नाहीं याची ही अप्रत्यक्ष कबुलीच नव्हे काय? काँग्रेस ही प्रबळ संस्था असली तरी देश तिच्याहिपेक्षां विस्तारानें अनेकपट मोठा आहे. मुस्लिम लीगचे देश सेवक नम्र होऊन व जनहिततत्पर राहून लोकात मिसळले तर जनाब जिनांचें वर्चस्व घटना-समितींत का नाहीं होणार ?

पण खरी गोष्ट वेगळीच आहे. घटना-समितींत अमुक एका पक्षाचें प्राबल्य होईल किंवा तीमधून उत्तम राज्यघटना जन्मास येणार नाहीं हीं हिंदुस्थानां-

तील निरनिराळ्या पक्षांना वाटणारीं भयें वरवरचीं आहेत. घटना-समिति समाजाच्या तळापासून सर्व राजकीय सागराला ढवळून काढील. समाजाचा आर्थिक पाया बदलून जाईल. वतनदारीचा विनाश ओढवेल. म्हणून जादा हक्क किंवा वतनदारी हें ज्यांचें राजकारण आहे तीं मंडळी घटना-समितीला विरोध करतात. सर्व गरीब कफल्लक समाज जेव्हा राज्यघटना तयार करायला पुढें सरसावेल तेव्हां आपल्या पोटापाण्याची तरतूद तो आधीं पहाणार. असें झालें कीं, जे गबर होऊन बसले आहेत, ज्यानीं हवेतसे हक्क वापरण्याची मिरास भोगलेली आहे, त्यांचें वैभव ओरबडण्यावाचून गत्यंतरच नाहीं! या दत्ताला भिऊन घटना-समितीची कल्पना तात्त्विक भूमिकेवरूनच नापसंत करण्याचा बहाणा अनेक मिरासदार वर्ग करतात. पण हा बहाणा आता चालणार नाही. घटना-समितीनें चांगलेंच मूळ धरलें आहे. तिच्या विस्तारासाठीं आणि त्या विस्तारानें होणाऱ्या आमूलाग्र स्थित्यंतरासाठीं राष्ट्रानें सिद्ध होऊन बसलेंच पाहिजे.

१९ २-४३

---

# अहिंसा ! : : ८

जो विषय मी आता घेणार आहे तो अत्यंत भव्य आहे आणि तितकाच आकर्षकहि आहे. ' गेट वे ऑफ इंडिया ' च्या कमानी नजीक मुंबईला आपण मौज करण्याच्या इराद्याने एकाद्या होडींत जातों. थोडें भय, खूप आश्चर्य आणि गूढ आनंद यानीं आपलें हृदय भरून जातें. एवढ्या गोल पाण्यात उतरावयाचें म्हणून भय वाटतें; समुद्राचा विस्तार पाहून आश्चर्य वाटतें; आणि एवढ्या विराट शक्तीशीं आपला अल्पसा का होईना पण ऋणानुबंध आला म्हणून एक प्रकारचा गूढ आनंद वाटतो. नेमका हाच अनुभव अहिंसा या विषयाची तोंडओळख तुम्हाला करून देताना, त्या विषयांत शिरण्याचे वेळीं मला होत आहे. या विषयाची खोली गहन आहे म्हणून आपण त्यांत बुडून गुदमरून जाऊं की काय हा विचार मनाला कंपित करतो, या विषयाच्या अनंत विस्तारानें मन चकित होतें, आणि त्या विषयाच्या अमर्याद शक्तीचा स्पर्शहि हृदयाला पुलकित करतो.

अलीकडे अहिंसा ( Non-violence ) हा शब्द आपल्या परिचयाचा झाला. गांधीजींनीं आपल्या भारतवर्षांत अहिंसेला एक नवी प्रतिष्ठा मिळवून दिली हें खरें. पण अहिंसा हें तत्त्व नवें नाहीं. त्या तत्त्वाला राजकारणाच्या क्षेत्रात आणून गांधीजींनीं जगाच्या इतिहासांत एक नवें दिव्य पर्व सुरू केलें यात वादच नाहीं. पण अहिंसा तत्त्वाचा जयजयकार प्राचीन काळापासून होत

आला आहे हें विसरतां कामा नये. हिंदूंच्या तत्त्वज्ञानानें वंद्य म्हणून ठरविलेल्या मानवतेच्या आदर्शांत अहिंसेला पहिलें स्थान आहे. निम्में जग ज्या धर्माच्या छायेखालीं आलें तो बौद्ध धर्म तर 'अक्रोधानें क्रोधाचा नाश करा' असा घोष आज अडीच हजार वर्षे करीत आला आहे! ख्रिस्ती धर्माचा प्रेषित् येशू ही तर अहिंसेची केवळ मूर्तिच होय! आपल्या सर्वांगाला खिळे ठोकणाऱ्या मारेकऱ्यांसाठीं, आपणाला होत असलेल्या भयंकर वेदना विसरून मरणोन्मुख स्थितींत येशू प्रार्थना करीत होता, 'देवा! त्यांना क्षमा कर. आपण काय करतों हें त्यांना कळत नाहीं!' सर्व धर्मांतली संतमंडळी या *तत्त्वाची पताका घेऊन चालली आहेत. हिंदु, बौद्ध, किंवा ख्रिस्ती या धर्मांच्या* व संतांच्या अनुयायांनीं आपल्या धर्मांतलें दिव्य रहस्य कितीसें आचरणांत आणिलें असें तुम्ही विचाराल. पण एका उच्च तत्त्वाच्या मान्यतेच्या दृष्टीनें आपणांला या गोष्टीकडे पाह्यचें आहे; परिणामवादाच्या दृष्टीनें नव्हे.

तथापि गांधीजींच्या मतें अहिंसा हें केवळ महात्म्यानाच आचरण्यास शक्य असें व्रत आहे असें वाटत नाहीं. सर्वसामान्य माणसेंदेखील ह्या व्रताचें पालन करूं शकतील; नव्हे नकळत अहिंसा व्रताचें आचरण आज हजारों वर्षे मानवता करीत आली आहे. हवा किंवा प्रकाश या द्रव्यांवर आपण जगतों. पण तीं इतकीं विपुल, सर्वव्यापी आणि सूक्ष्म असतात कीं, त्याचा क्षणोक्षणीं फायदा घेत असूनहि आपणांला त्यांच्या अस्तित्वाची दखल नसते. असेंच अहिंसेचें आहे. लक्षावधि व्यसनी मुलांना आईबापांनीं आपल्या त्यागानें ताळ्यावर आणिलें आहे; बहकलेले असंख्य पती आपल्या गृहिणींच्या मूक तपस्येनें सन्मार्गाला लागले आहेत; आपल्या रक्तानें व अश्रूंनीं आपल्या वेताल भावंडांचीं पातकें धुऊन टाकणारे अनंत भाऊ आजवर झाले आहेत. अहिंसेचा सूक्ष्म व गूढ व्यापार इतक्या व्यापक प्रमाणावर होत होता म्हणून तर मानवता आजवर जगली, उन्नत झाली.

आतां इतिहासाचा पुरावा या विवेचनाच्या विरुद्ध जातो असें सांगणारे अहिंसेचे विरोधक नेहमींच भेटतात. केवळ इतिहासांतल्या हेव्यादाव्यांवर सदैव झिंगणारे परंपरावादीच नव्हेत, तर मानवांच्या अंतरंगांत स्पर्धेऐवजीं सहकार्याची भावना स्थापूं पाहणारे साम्यवादी हेसुद्धां इतिहासाकडे बोट दाखवून हिंसावादाचें [ निदान हिंसात्मक साधनाचें ] समर्थन करतात. 'मनुष्याचा एकंदर इतिहास हाच झगड्याचा इतिहास आहे, राव-रंक, जमीनदार-कुळें सबल-दुर्बळ राष्ट्रें यांच्यांतल्या लढायांची मालिका म्हणजे मानवी इतिहास. मानवाच्या प्रगतींत अहिंसेला स्थानच आहे कुठें?' असा यांच्या प्रतिपादनाचा मतितार्थ असतो. इतिहासासारखा लठ्ठ आणि भरीव पुरावा अंगावर फेकल्यानें आतां अहिंसावादी डोकें वर काढणार नाहींत अशी खात्री यांना वाटत असते. पण गांधीजींसारखे लोकोत्तर पुरुष आपल्या श्रद्धेला बुद्धीचीहि जोड देत असतात. इतिहासाच्या हिंसात्मक पुराव्याला गांधीजींनीं बिनतोड उत्तर दिलें आहे. कोणतें तें ऐका!

'नम्रतेची अंतिम सीमा म्हणजे अहिंसा' असें गांधीजी सांगतात. अहिंसा ही स्वभावतः प्रसिद्धिपराङ्मुख आहे. तिला जाहिरातीची हाव नसते. आपलें कार्य इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहिलें जावें अशी हौसच नसते मुळीं तिला! ही प्रसिद्धिपराङ्मुखता हिंसेत नाहीं. तिला अहंकार आहे. आपल्या पराक्रमाची नोंद व्हावी अशी दाट इच्छा असते तिची. आतां असें पहा. मोठ्या कुटुंबांत धुसफूस, भांडणें होतात, कुठें दोन पक्षांचा झगडा असतो. पण कोणत्या तरी पक्षाच्या समंजसपणामुळें, प्रेमशील वृत्तीमुळें किंवा त्यागामुळें हीं भांडणें व झगडे निकरावर न येतां पुष्कळदा तडजोड होते. पण समाजाला याचें ज्ञान असतें का? मुळींच नाहीं. असे हजारो तंटे प्रसिद्धीला येण्यापूर्वीच मिटले जातात. पण लाखांत एक भांडण विकोपास गेलें, त्यात हिंसा प्रबळ झाली कीं कोर्टदरबारपर्यंत पाळी येते, आणि वृत्तपत्रें भडक शब्दांत व जाड टप्पांत त्या हिंसात्मक प्रकरणाचीं वर्णनें देऊं लागतात. चुलत्यानें 'पुतण्या-

वर कुऱ्हाड चालविली ! 'कुळानें सावकाराचा खून केला' यांसारखें मथळे मधून मधून येतात ! हिंसेची अफाट जाहिरात होते. 'वद्‌फैली मुलाला बापानें ताळ्यावर आणलें,' 'नवऱ्यानें बायकोची समजूत घातली' असे मथळे येतात का कधीं ऐकायला तुम्हांला ? नाहीं ना ? मग याचा अर्थच असा नाहीं का, कीं जगांत प्रत्यहीं प्रचंड प्रमाणावर काम करीत असलेल्या अहिंसेची नोंद होत नाहीं आणि अल्प प्रमाणावर झालेल्या हिंसेचे मात्र डंके वाजतात ?

गांधीजी इतिहासाचा दाखला अहिंसेच्या विरुद्ध मानायला तयार नाहींत तें याच कारणामुळें. इतिहास म्हणजे माणसाच्या हिंसात्मक कृत्यांची, विकृतींची बखर आहे. माणसांत उदय पावत चाललेली देववृत्ति विसरून जेव्हां तो पशुवृत्ति धारण करतो, लोकांचे हक्क हिरावून शेर होऊं पाहतो तेव्हां इतिहास त्याला गौरवाचें स्थान देतो. अशा या एकतर्फी शक्तीला [ इतिहासाला ] निःपक्षपातीपणाचें प्रशंसापत्र कोण देईल ? इतिहासांत अहिंसेला स्थान नाहीं याचें कारण विपुल प्रमाणावर कार्य करणाऱ्या या शक्तीचे असंख्य पराक्रम नोंदवून ठेवणें इतिहासाच्या आवांक्याबाहेरचें आहे.

हा युक्तिवाद नसून हें सत्य आहे. युक्तिवाद करायचा झाला तर वेगळा करतां येईल. म्हणजे असें कीं, जगाच्या इतिहासाचें शेवटचें पान अजून लिहून झालें नाहीं ! जगांत पूर्वी नव्हतें असें चांगलें आज पुष्कळच नवें दिसूं लागलें आहे. नव्या जगांतला रेडिओचा शोध हा पूर्वी कल्पनेनें तरी जाणतां आला असता का ? लोकशाहीची आजची आपली कल्पना 'ना विष्णुः पृथिवीपतिः' या तत्त्वाचा प्रभाव जगांत असतां जन्मालासुद्धा आली नव्हती. पूर्वी न झालेल्या अशा अनेक अद्‌भुत घटना, शोध, कल्पना शक्य कोटींत उतरलेल्या दिसत असतां अहिंसेला संधि द्यायला कोणती हरकत आहे ? आजचें तिचें स्वरूप इतिहासांत दिसत नाहीं हें काही तिला प्रतिबंध करण्याचें सबळ कारण होऊं शकत नाहीं. आज हजारों वर्षे हिंसेनें इतिहासाचें वतन भोगलें. आतां तें सर्व किंवा त्याचा अर्धा वांटा अहिंसेकडे जाऊं द्या. काय हरकत आहे ?

इतिहासाप्रमाणेंच 'मानवी प्रवृत्ति' हा एक बागुलबोवा अहिंसेचे विरोधक नेहमीं उभा करतात. "हिंसेची आवड माणसांत किंवा जीवसृष्टींत निसर्गानेंच मुळीं ठेविली आहे. हिंसेंतच मुळीं प्रगति आहे. जो दुर्बळाला मारून तगेल तो जगण्याला अधिक लायक. अहो, जीवो जीवस्य जीवनम् !" हें तत्त्वज्ञान सांगायला फार विचार करावा लागत नाहीं. मामुली व्यवहारी दृष्टीनें पाहिलें तर हें महज समजतें. पण सबंध जीवसृष्टीचा हवाला देताना हा विचार करायला पाहिजे कीं, पशुपक्षीकीटकादि जीवसृष्टीपासून माणूस भिन्न आहे. बुद्धि म्हणून एक अमर्याद शक्ति परमेश्वरानें त्याला दिली आहे. त्या शक्तीनें त्यानें निसर्गावर विजय मिळविण्याचा प्रचंड खटाटोप चालविला आहे. आपल्या निर्माणकर्त्याच्या दर्जापर्यंत पोहोंचण्याचा त्याचा निश्चय आहे. आणि म्हणून आपल्यांतलें व पशूंतलें अंतर तो शक्य तितकें वाढवीत आहे. कामक्रोधादि विकारांवर माणूस प्रभुत्व मिळवितो. त्यांतल्या काहीं विकारांवर सुंदर संस्कार करून तो त्यांना उदात्त बनवितो, आणि शास्त्रें व कला यांच्या साह्यानें ही सृष्टि व आपलें जीवन जास्त जास्त सुंदर करण्याचा प्रयत्न करतो. ही आश्चर्यकारक प्रगति अनुभवाला येत असतां 'बळी तो कान पिळी' हा न्याय, केवळ जीवसृष्टींत आहे म्हणून, माणसानीं तो तसाच चालू ठेवणें योग्य आहे का ? ही परागति–पुन्हां पशुत्वाऱ्याकडे जाणें नव्हे का ? असें पहा. पशुपक्षांत नरमादींचे संबंध अनिर्बंध असतात. पण आपण माणसें सीतेच्या विरहकाळीं अश्रू ढाळणारा एकपत्नी राम आणि आपल्या काळ्यासावळ्या लैलासाठीं प्राण टाकणारा मज्नून हेच उच्च आदर्श मानतो ना ? माणसांत हिंसात्मक प्रवृत्ति असली तरी तो त्याचा हीन भाग आहे. त्यापासून मुक्त होऊन त्यानें अहिंसेच्या उच्च आदर्शाकडे जाण्यास झटलें पाहिजे.

अहिंसेचें तत्त्वज्ञान केवळ महात्म्याकरिता नाहीं हें मी सांगितलेंच. विशेषतः स्त्रियांना तर या तत्त्वज्ञानाचें आचरण मुळीच अवघड वाटूं नये. सेवा आणि आत्मदान या प्रवृत्तींचीं बीजें प्रथमपासूनच त्यांच्या अंगीं

असतात. पुत्रजन्माच्या आनंदासाठीं प्रसववेदना सोसणें हें दिव्य त्या नेहमींच करतात. मुलासाठीं किंवा आप्तासाठीं सुखाचा होम करणें यांत त्यांना खंत न वाटतां कृतार्थता वाटते. आणि याच दृष्टीनें प्रख्यात हिंदी कादंबरीकार मुन्शी प्रेमचंद यांनीं म्हटलें असावें कीं, 'ज्या पुरुषांत स्त्रियांचे गुण असतात तो महात्मा होतो.' प्रेमचंदाचे हे मार्मिक उद्गार मी जगांतील कलावंतांनाही लावूं शकेन. अहिंसा हा सामान्य माणसांना आचरतां येण्यासारखा श्रेष्ठ धर्म आहे. पण स्त्रिया, महात्मे, आणि कलावंत यांचा तर तो स्वभावधर्मच आहे!

दुर्जनावरहि प्रेम करणें आणि आपण हाल सोसून दुसऱ्यांत हृदयपालट घडवून आणणें हें अहिंसेचें तत्त्वज्ञान आहे. रक्तपात टाळायचा असेल तर, दुसऱ्याचें रक्त न सांडतां आपलें सांडा असें अहिंसा सांगते. माणसांतल्या चांगल्या वाईट बाजूंची अहिंसेला पुरी कल्पना आहे. आपल्या हीन विकारांच्या आधीन केव्हा होऊं याचा नेम नाहीं म्हणून साधूंनीहि आपणांला शिस्त लावली पाहिजे असें अहिंसा सांगते; उलट साधूंच्या त्यागशीलतेनें अट्टल दरोडेखोरांतहि सद्भावनेचा उदय होणें शक्य आहे असा तिला विश्वास असतो.

पण हें सर्व थोड्याफार प्रमाणांतहि साध्य होण्यास निर्भयता व मर्दपणा लागतो. आणि अहिंसेचे खरेखोटे विरोधक नेहमीं हाच मुद्दा विसरतात किंवा विकृत करतात. अहिंसा हें दुर्बलांचें शस्त्र आहे येथपासून अहिंसा माणसाला दुर्बळ बनवते येथपर्यंत, त्यांच्या विवेचनाची हद्द असते. पण अगदीं थोड्या विचारानें सुद्धां पटण्यासारखें आहे कीं, चिडून दुसऱ्याला मारण्यापेक्षां शांतपणें स्वतः मरण्यास मोठें धैर्य लागतें. प्रल्हाद, साक्रेटीस, येशू, मीराबाई या पुराण विभूति किंवा कानपूरच्या दंग्यांत शांतताप्रस्थापनेसाठीं स्वतःची आहुति देणारे गणेश शंकर विद्यार्थी यांचें सात्त्विक धैर्य नेपोलियन, चेंगीझ यांच्या क्रूर धैर्यापेक्षां कमी तर नव्हतेंच; पण पहिल्या अहिंसावादी हुतात्म्यांच्या धैर्यातलें सौंदर्य दुसऱ्या क्रूर जगज्जेत्यांच्या शूरपणाला कधींच येणें शक्य नाहीं. गांधीजींचीं

पुढील खुणेचीं वाक्यें लक्षांत ठेवलींत तर या महत्त्वाच्या मुद्द्यावर कुठलींच संशयपटलें सांठणार नाहींत. गांधीजी म्हणतात—

' *नामर्दपणापेक्षां हिंसा केव्हांहि बरी. हिंसावादी माणसाला केव्हांतरी अहिंसावादी होण्याची आशा आहे. पण नामर्दाला मात्र अहिंसावादी मुळींच होतां येणार नाहीं.*' '*अहिंसा हा भेकडांचा मार्ग नव्हे. मृत्यूला धैर्यानें तोंड देणाऱ्या* शूरांचा हा मार्ग आहे. तलवार हातीं घेऊन लढत मरणारा तर शूर खराच; पण न भितां किंवा लहानसें बोटहि न उचलता जो मरण पत्करतो तो खात्रीनें अधिक शूर आहे. माराच्या भीतीनें आपल्याजवळच्या तांदळाच्या गोण्या देणारा भेकड होय. तो अहिंसेचा खरा उपासक कधींच होणार नाहीं आपल्या स्त्रियांची बेअब्रू व अपमान जो माराच्या भीतीनें मुकाट सहन करतो तो मर्द नव्हे.' माझें असें नम्र मत आहे कीं, जगांत कांहीं सत्य व शाश्वत मिळवायचें असेल तर पहिल्यानें निर्भय झालेंच पाहिजे. '

नुसता शांतिपाठ गाइल्यानें युद्धाचा अंत होत नाहीं हें खरें; किंवा मुंगीलाहि धक्का न लावता सोवळें व व्यक्तिशः शांतिधर्मी राहिल्यानें समाजाची प्रगति होत नाहीं हेहि निर्विवाद होय. म्हणूनच गिरिकंदरीं कंदमुळें खाऊन तपश्चर्या करणारे योगी समाजाच्या उद्धाराला जसे असमर्थ तसेंच युद्धें थांबली पाहिजेत असें तोंडानें म्हणणारे शांतिवादी हेहि तितपतच जगत्कल्याणाला उपयोगीं पडणारे ! युरोपांत असे सज्जन पुष्कळ आहेत. पण त्यांचा शांतिवाद *आज भाकड ठरला आहे. या अपेशी सज्जनांच्या तुलनेनें गांधीप्रणीत* अहिंसावाद हा कसा झुंझार व परिणामकारक आहे हें पं. जवाहरलाल *नेहरूंनीं सुंदर विशद केलें आहे. तुम्हांला ठाऊकच आहे कीं, पंडितजी* हे बुद्धिवादी, समाजवादी आणि पाश्चात्य संस्कृतीचे मोठे चहाते आहेत. पण अशाहि माणसानें हिंदुस्थानात उत्पन्न झालेल्या या चित्ताकर्षक तत्त्वज्ञानाची बाजू किती तडफदार पद्धतीनें मांडली आहे ! पं. नेहरू म्हणतात—

'युरोपच्या धर्तीवर विचार करणारे कांहीं मार्क्सवादी अहिंसेची टेटाळणी करतात. युरोपीयन शांतिपाठकांचा मी चहाता नाहीं. अनेक आणीबाणीच्या वेळीं हे लोक केवळ निष्क्रियच ठरले नाहींत तर नकळत प्रतिगामीपणाच्या व लष्करशाहीच्या आहारीं गेल्यानें सिद्ध झालें आहे. त्यांच्या शांतिवादाचा दुष्ट प्रवृत्तींना उपयोग झाला आहे. कारण अशा प्रवृत्तींना विरोध करायचा म्हटला कीं त्यांचें शांतिवादाचें व्रत भंग पावलेंच! राजकीय शरणागतीनें बहुधा अपरिहार्यतेनें नैतिक शरणागतींत पर्यवसान होतें.

'दुष्ट प्रवृत्तींना राजकीय अथवा नैतिकदृष्ट्या शरण जाणें हा मुळीं कॉंग्रेसच्या अहिंसेचा पायाच नव्हे. इतर राजनीतीप्रमाणें परिस्थितीस अनुसरून संमेट साधावेत, असें अहिंसावाद्यांचेंहि धोरण आहे. पण कुठल्याहि पद्धती *पेक्षां हीत तडजोडीची वृत्ति कमी. ही अहिंसा चैतन्यशाली आहे, निष्क्रिय* नाहीं. अहिंसा म्हणजे नुसती विरोधशून्यता नव्हे, तर दुष्कृत्याला विरोध. मात्र त्या विरोधाचें स्वरूप शांततामय असावयाचें. केवळ व्यवहारांतच अहिंसेनें *दृश्य फायदे दिले असे नव्हे, तर राष्ट्राचें शील बळकट करणें आणि शांतता*-मय व शिस्तीच्या कार्याचें शिक्षण लोकांना देणें हेंहि महत्कार्य साधलें.'

आता तुमच्या लक्षात आलें असेलच कीं, अहिंसा हें शूरांचें शस्त्र आहे. *कळत न कळत प्रचंड प्रमाणावर त्याचा वापर मानवतेनें आजवर केलेला* आहे. अहिंसेच्या जीवनातलें नवें पर्व आतां सुरू झालें आहे. यांत व्यक्ति-जीवनांतून समाजजीवनांत तिचा प्रवेश होत आहे. आपल्या आप्तांचा किंवा मित्रांचाच नव्हे तर समाजाचा हृदयपालट करण्याची मनोवृत्ति आपल्यांत निर्माण झाली पाहिजे. अस्पृश्योद्धार, जातीय ऐक्य, स्वातंत्र्य-संग्राम या सर्व सुधारक व क्रांतिकारक चळवळींत अहिंसेचें तत्त्व लावावयाचें आहे. आणि यासाठींच सामुदायिक संघटनेच्या पायावर उभारलेलें एक अहिंसेचें शास्त्र बनूं पहात आहे. दक्षिण आफ्रिका, चंपारण्य, खेडा, बारडोली, येथील सत्याग्रह आणि गेल्या २०-२२ वर्षांत दोनदां झालेल्या देशव्यापी चळवळी यांनीं या

शास्त्रात केवढी तरी सुधारणा केली आहे. हें शास्त्र अद्यापि बाल्यावस्थेंत आहे. पण त्याची अमर्याद व हृदयंगम वाढ होणें शक्य आहे

अहिंसेचा विजय शाश्वत स्वरूपाचा असतो. अहिंसाबलानें पराभूत झालेला प्रतिपक्षी श्रमी होत नाहीं, तर त्याला आपलें मस्तक उन्नत झाल्यासारखें वाटतें. हें केवळ गूढगुंजन नाहीं. पुष्कळ ठिकाणीं घडणें शक्य आहे, घडत असेल अशी एक साधी कथा घ्या. दोन भावात इस्टेटीवरून तंटे लागले आहेत. आपण त्याना अजय आणि अरविंद म्हणूं. अजय सर्वच इस्टेट गिळंकृत करूं पहात आहे. आता अरविंदानें कोर्टाच्या किंवा गावगुंडाच्या साह्यानें अजयला वठणीवर आणलें तर अजयच्या मनातला द्वेष नाहींसा होईल का? मुळींच नाहीं. तो धुसफुसत राहील आणि वेळ आली कीं, अरविंदाचा सूड कसा घ्यायचा ह्याच्या खटपटींत असेल. त्याचें जीवन सूडाच्या विचारानें दूषित होईल, तर अरविंदाला सूडाच्या भीतीनें झोप येणार नाहीं. पण अरविंदानें अजयची समजूत घातली आणि तो मागत असलेला सर्व वाटा उदारबुद्धीनें त्याच्या स्वाधीन केला, तर अजय ओशाळेल आणि त्याच्या मनात पालट होऊन तो अरविंदाचा भक्त बनेल. सूडाचा किंवा भीतीचा मागमूसहि राहाणार नाहीं. परस्परविश्वासानें राज्य सुरू होईल.

वसिष्ठ ऋषींचा खून करण्यासाठीं मोठा दगड घेऊन अहंकारी विश्वामित्र चांदण्या रात्रीं वसिष्ठाच्या झोपडीशीं गुप्त रीतीनें दबा धरून बसले होते. पण पत्नीशीं संभाषण करताना वसिष्ठ जेव्हा म्हणाले कीं, 'या चांदण्याची शोभा विश्वामित्राच्या तपश्चर्येसारखीच आहे.' तेव्हा दगड टाकून विश्वामित्र पुढें झाले आणि त्यानीं वसिष्ठाचे पाय धरून त्याची क्षमा मागितली. अशीच एक महंमद पैगंबराची गोष्ट आहे. महमद आणि त्याचा शत्रु डरथूर याचें द्वंद्वयुद्ध झालें. प्रथम डरथुरनें महंमदाला चीत केलें आणि म्हटलें, ' बोल तुझा साह्यकर्ता कोण आहे ? ' महंमद निर्भयपणें म्हणाला 'परमेश्वर.' डरथुर जरा

गडबडला. तेव्हां उसळी घेऊन महंमद उभा राहिला आणि त्यानें डरथुरला खालीं पाडलें. 'आतां तुझा साह्यकर्ता कोण?' असें महंमदानें डरथुरला विचारलें. डरथुर रडूं लागला. 'कोणी नाहीं!' असें हताशपणें त्यानें उत्तर दिलें. तेव्हा आपली तलवार फेंकून देऊन महंमदानें डरथुरला मिठी मारली आणि तो म्हणाला, 'कोणी नाहीं असें कां? मी आहे कीं तुझा मित्र.' डरथुर महंमदाचा आमरण एकनिष्ठ सेवक होऊन राहिला.

अहिंसाबलाचा विजय कसा टिकाऊ असतो आणि दोघांहि पक्षांची मनःस्थिति त्या विजयामुळें कशी वरच्या पातळीला येते हे दाखविण्यास या दोन कथा पुऱ्या आहेत. औदार्य, विश्वास, प्रेम, या सद्गुणांची जोड अहिंसाव्रताला पाहिजे. वसिष्ठांसारखे शामदमाचे आदर्श आणि महंमदासारखे ईश्वरभक्त व शूर पुरुष हेच अहिंसाव्रताचे खरे व श्रेष्ठ उपासक होऊं शकतात.

यावरून काय दिसून येतें? अहिंसाव्रताचा विजय होण्यासाठीं त्या व्रताच्या उपासकानें उच्च आत्मिक सामर्थ्य संपादन केलें पाहिजे. त्याचा देवावर विश्वास पाहिजे आणि माणसाच्या चांगुलपणावरहि त्याची श्रद्धा असली पाहिजे. त्यानें स्वतःचें आचरण जितकें संशयातीत असेल आणि त्याची परहितबुद्धि जितकी जाज्वल्य असेल तितकें त्याच्या अहिंसेला यश मिळेल. अभय हा त्याचा पहिला गुण पाहिजे. बोलण्यात, खाण्यात त्याचें जिभेवर प्रभुत्व पाहिजे. त्यानें गरजेपेक्षा अधिक संचय करतां कामां नये, कारण संचयानें स्वार्थ बळावतो, आणि स्वार्थाइतकें अहिंसेला काय मारक असू शकेल? इंद्रियांनीं बेताल होणें ही गोष्ट अहिंसेला क्षणभरही संमत नाहीं. कारण इंद्रियांच्या अनिर्बंध वागण्यानें बुद्धि अंध होते, सत्य धुरकटलेलें दिसूं लागतें, आणि प्रेमशक्ति काम करीनाशी होते. यावरून तुमच्या लक्षांत येईल कीं, अहिंसेचें जास्तींत जास्त पीक पदरांत पाडून घेण्याकरितां आपल्या सर्व जीवनाचीच मशागत केली पाहिजे. ह्या विषयाची झालेली तोंडओळख विशेष घट्ट व्हावी यासाठीं 'प्रसाददीक्षा' व 'गांधीजींचीं पत्रें' हीं पुस्तकें वाचण्याची मी

तुम्हांला आग्रहानें शिफारस करतों. जीवनांत सेवेचें सौंदर्य निर्माण करण्याचें शास्त्र या पुस्तकातून अधिक रमणीय शब्दांत सांगितलेलें जगाच्या अफाट वाङमयभांडारांत बहुधा आढळणार नाहीं.

हिंदी राजकारणात अहिंसेचे कार्य कोणतें व केवढें आहे याचा इतिहास ताजाच आहे. गेलें महायुद्ध सपलें त्यावेळीं हिंदी किमान वर्ग व बहुजनसमाज किती भित्र होता! खाकी पोशाखांतला माणूस दिसताच तो कसा थरथर कापत असे हें पाहिलें आणि आता २२ वर्षांनी त्यांच्यात झालेली संघटना प्रत्ययाला आली म्हणजे अहिंसेचें ऐतिहासिक कार्य तुमच्या लक्षांत येईल. प्रखर सूर्यकिरणाचा स्पर्शहि ज्याच्या मुखकमलावर कधीं झाला नसेल अशा सुकुमार कुलकन्यका रखरखीत उन्हांत शांतपणें लाठीमार सोसण्याची तयारी करून छातीठोकपणें उभ्या रहातात, हें आश्चर्यकारक दृश्य आज कशामुळे दिसतें? ज्यांच्या ओठावरचा जारहि वाळला नाहीं अशीं बालकें हास्यमुखानें पोलिसाच्या गाडींत चढतात हा कोणाचा प्रभाव? हे चमत्कार अहिंसेनें घडवून आणले हे ज्यांना मान्य नाहीं त्याना अलिकडला इतिहास कळत नाहीं असे म्हणावयाचें! दुसरें काय? रुपये, आणे, पै मध्यें अहिंसेच्या यशाचें मापन करतां येणें शक्य नाहीं. कलकत्ता येथें नुकत्याच झालेल्या 'कमला' व्याख्यानमालेंत डॉ. राधाकृष्णन् म्हणाले कीं, 'भविष्य काळी जग जेव्हा मागें वळून पाहील तेव्हां या आजच्या भयंकर अंधारलेल्या जगात या एकाच माणसाला (गांधीजींना) प्रकाशकिरण दिसले होते असें जगाला कळून येईल.' आपणाला आपल्या देशस्थितींतले फरक अजमावण्याचें ज्ञान असेल तर राधाकृष्णन्च्या या विधानात कोणचीहि अतिशयोक्ति नाही असें कळून येईल.

आपलें अहिंसाशास्त्र प्रयोगावस्थेंत आहे असे खुद्द गांधीजीच सांगतात. गेल्या बावीस वर्षांत हिंदुस्थाननें अहिंसातत्वाचें आचरण केलें ते पुष्कळसें धोरण या दृष्टीनेंच केलें, तत्वज्ञान या दृष्टीनें नव्हे. म्हणूनच आज अपेक्षे-

इतकी देशाची प्रगति झालेली दिसत नाहीं. हें सर्व जमेस धरूनहि अहिंसात्मक तत्त्वज्ञानाची माहिनी कमी होत नाहीं. उपासकांच्या मर्यादा किंवा उणीवा कांहींहि असल्या तरी त्यामुळें ज्याची उपासना करायची [ करणें सर्वस्वीं कल्याणप्रद आहे ] तें कमी दर्जाचें कसें ठरणार ?

अहिंसेची ओळख करून देताना शक्य तितक्या चौरसपणें मी तिच्या उच्च दर्जाची कल्पना करून दिली. ह्या ओळखीचें गाढ स्नेहांत रूपांतर करणें सर्वस्वी तुमच्या हातीं आहे. माझें तुम्हांला आग्रहानें सांगणें आहे कीं, केवळ एक राजकीय धोरण अशा संकुचित दृष्टीनें अहिंसेकडे पाहूं नका. आपल्या हिंदी लोकांच्या हातीं शस्त्र नाहीं म्हणून अगतिक होऊन पत्करलेला मार्ग असें अहिंसेच्या व्रताचें केविलवाणें स्वरूप मुळींच नाहीं. तिचें असें स्वरूप *मानणाराच्या मनांत शस्त्राचारी मार्गाबद्दल चोरटी लाचारी असते.* हिंसामार्गापेक्षां सर्वथैव श्रेष्ठ शांतिसुखाचें साधन हे अहिंसेचें वैभव आहे या वैभवाचा उत्कर्ष आजवर अनेक संतमहंतांच्या जीवनांत आपण पाहिलेला आहे, आणि या वैभवाचा उपभोग नकळत असंख्य माणसांनी आजवर घेतला आहे. बुद्ध–येशू–गांधी याना जें दिसलें तें साध्या प्रेमिकाना, तुम्हांआम्हांलाहि दिसणें शक्य आहे. त्यांना कदाचित् जास्त दूरचें आणि जास्त सूक्ष्म दिसेल एवढेंच. पण त्यांच्या व आपल्या आश्चर्यमय आनंदांत फरक पडणार नाहीं. मोठ्या दुर्बिणी डोळ्यांना लावून बसलेल्या खगोलशास्त्रज्ञांना आकाशांतले जवळचे तारे मोठे दिसतात आणि दूरचे तारे प्रथमच दिसतात, हें खरें आहे, पण तरीदेखील आपल्या साध्या डोळ्यांना दिसणारें तारकामंडित आकाश काय कमी भव्य आणि अद्‌भुतरम्य वाटतें ?

---

# ( १ ) फेडरेशन : : १

आता नवीन विषय 'फेडरेशन' म्हणजे संघराज्य हा आहे. संघराज्य म्हणजे अनेक उपराष्ट्रांना किंवा स्वतंत्र घटकांचा एक समुदाय. फेडरेशन ही कल्पना प्रत्यक्ष सृष्टींत उतरायची म्हणजे कांहीं एक परिस्थिति किंवा इतिहासाचा क्रम यावा लागतो. शास्त्रीय दृष्टीनें लिहिणारे इतिहासकार आपणांला सांगतात की, अमुक कल्पना किंवा व्यवस्था निर्माण होण्यास विशिष्ट सामाजिक प्रगतीच व्हावी लागते. 'लोकशाही' या विषयावर सांगतांना मीं तुम्हांला स्पष्ट केलें नव्हतें का की देशांत यंत्रकला व तिच्या मागून येणारी जागृति ही जशी वाढत जाते तसा लोकसत्तेच्या कल्पनेचा विकास होत जातो ? म्हणजे अमुक कल्पना ही अमुक समाजस्थितींतच आढळायची. हें माझें विधान जास्त स्पष्ट करण्यासाठीं एक दाखला देतों. पृथ्वीचा व तीवरील प्राण्यांचा इतिहास अभ्यासणारे लोक विशिष्ट प्रकारच्या जमिनींत आणि पृथ्वीच्या एका विशिष्ट अवस्थेंत अमुक प्राणी वाढत असें सिद्ध करून देतात. ती जमीन बदलली, तिच्यावर नवीन थर पडले किंवा पृथ्वीनी ती एक अवस्था संपली कीं ते प्राणी नष्ट होतात. जमिनीचें उत्खनन केल्यास ठराविक रंगाच्या मातींत ठराविक प्राण्यांचे अवशेष आढळतात असा अनुभव आहे. कल्पनासृष्टीची तऱ्हा याहून वेगळी नाहीं. मानवी समाजाच्या थराला कांहीं एक रंगरूप प्राप्त झालें म्हणजेच तेथें अमुक कल्पना किंवा ध्येय उदित व्हायचें असें जणूं ठरून गेल्यासारखें दिसतें.

आतां या सिद्धांताला धरून आपला विषय घेतला, तर त्या विषयाच्या नांवावरूनहि आपणाला सहज कल्पना येईल कीं 'संघराज्य' म्हणजे अनेक राज्यांचा संघ हा होण्यास अगोदर अनेक राज्यें अस्तित्वात असलीं पाहिजेत. अमेरिकेंतील संयुक्त संस्थानें किंवा रशियाचीं अनेक लोकराज्यें ही आदर्श संघराज्याचीं उदाहरणें होत. या उदाहरणांवरून एका मोठ्या भूमिभागांतील स्वयंशासित असे काहीं घटक एका राष्ट्रीय भावनेनें जवळ येतात तेव्हां फेडरेशनची प्रतिष्ठापना होते असें दिसून येईल. फेडरेशनमधील प्रत्येक उपराष्ट्राला आपल्या सर्वांगीण विकासासाठीं स्वतंत्र अस्तित्व अवश्य असते; संरक्षण किंवा राष्ट्रीयता यांसाठीं आपल्या भोवतालच्या राष्ट्रसंघांत सामील होणें त्याला अगत्याचें वाटतें. ' माझें वैशिष्ट्य कांहीं तरी खास आहे तें टिकलें पाहिजे त्याबरोबरच मला माझ्या भोवतालच्या बंधुराष्ट्रांत सामील होऊन माझें राष्ट्रीयत्व टिकविलें पाहिजे. ' असा दुहेरी विचार संघराष्ट्रांतले घटक उपराष्ट्र करीत असतें. प्रो. डायसी म्हणून जे जगविख्यात राजशास्त्रज्ञ आहेत त्यांनी संघराज्याच्या अस्तित्वाच्या अटी थोडक्यात सांगितल्या आहेत. प्रो. डायसी म्हणतात--

> " फेडरेशन निर्माण होण्यास दोन अटी अवश्य आहेत. सानिध्य, इतिहास वंश, इ० अनेक बंधनांनीं सारख्या असलेल्या उपराष्ट्रांना असा समूह पाहिजे. दुसरें, जी उपराष्ट्रें संघात एकत्र येण्यास उत्सुक असतील त्यांच्यात एकत्वाच्या भावनेचा उदय झाला असला पाहिजे."

डायसीसाहेबांनी दिलेल्या या वर्णनांचे रहस्य लक्षांत घेतले म्हणजे फेडरेशन कल्पना केव्हां व कुठे मूळ धरू शकेल याचा अंदाज येतो फेडरेशनच्या कल्पनेला स्पष्ट स्वरूप आज आलें असलें तरी फार प्राचीन काळापासून अधुक स्वरूपांत ती अस्तित्वात होती. राज्याचीं फेडरेशन्स त्यावेळीं नव्हतीं, तरी भटक्या टोळ्या संघ करून राहत. आपापल्या स्वतंत्र चुली मांडाव्या पण देवघेवीच्या व्यवहारासाठीं किंवा संरक्षणासाठीं सर्वजण एक आहोंत या

भावनेनें चालावें असा क्रम असे. लहान मानवसमुदायांचीं फिरतीं फेडरेशन्सच असत ही ! या लहान फिरत्या फेडरेशन्सचा बनाव ज्या कारणांकरिता होई तीन कारणे आज रशिया, अमेरिकेसारख्या मोठाल्या फेडरेशन्सच्या स्थापनेस प्रेरक झाली आहेत. आत्मरक्षण व आर्थिक व्यवस्था ह्या मुख्य उद्देशानीं प्राचीन रानटी टोळ्या आपले संघ बनवीत आणि हेच उद्देश धरुन, अमेरिकेतील संयुक्त संस्थानें किंवा जर्मनींतील संस्थानें एकत्र आलीं. फरक एवढाच कीं आज या मोठ्या स्थिर फेडरेशन्सनीं एक राष्ट्रीयत्त्वाची बैठक तयार होते, त्यावेळचीं ती लहान फिरतीं संघराज्यें एक स्थूल संस्कृति किंवा उपासनापद्धति निर्माण करीत

जगाच्या इतिहासात स्विझर्लंडचे १२९१ सालीं स्थापन झालेलें फेडरेशन हें जितकें जुनें तितकेंच चिमुकलें आहे. पण आपल्या डोळ्यापुढें फेडरेशनचा जो आदर्श आहे त्यात मात्र चिमुकलेपणाला थारा नाहीं. प्रदेश मोठा आहे, त्यांत अनेक संस्कृति, भाषा, धर्म, हवामानें आहेत म्हणून तर सोईसाठीं त्यांचे भाग पाडून त्यांचीं उपराष्ट्रें बनवावयाचीं आतां फेडरेशन्स दोनहि तऱ्हेनें स्थापन होऊं शकतात एकमेकाना शेजारीं असलेलीं लहान लहान राष्ट्रें सोईसाठीं स्वेच्छेनें एकत्र येतात आणि आपला संघ बनवितात. दुसरा प्रकार म्हणजे एकाद्या मोठ्या देशांतल्या मध्यवर्ती सत्तेनें त्या देशाचे विभाग पाडून त्यांना स्वायत्तता देणें राज्यकारभाराच्या हितासाठीं योग्य वाटतें म्हणून ती मध्यवर्ती सत्ताच असे खंड पाडते आणि मग त्यांचा संघ निर्माण करते. पहिल्या प्रकारचे उदाहरण अमेरिकेचें आहे. युरोपांतून गोरे लोक अमेरिका-खंडांत गेले आणि तेथें ठिकठिकाणीं वसाहती स्थापून राहिले. अशा तेरा वसाहती झाल्या. तेव्हा साहाजिकच त्याना वाटूं लागलें आपापलें स्वतंत्र अस्तित्त्व न ढळूं देतां जर आपण एक संघ बनविला तर आपलें सामर्थ्य वाढेल. आणि मग त्यांनीं आपलें फेडरेशन बनविलें. या फेडरेशनमध्यें मध्यवर्ती सत्तेपेक्षा घटक उपराष्ट्रानाच जास्त सत्ता आहे. म्हणून याला 'कॉन्फिडर-

आर्थिक गरज हेंहि फार महत्त्वाचें कारण आहे. जवळजवळ असणाऱ्या लहान लहान राष्ट्रांचें सामर्थ्य कितीसें असणार ? त्यांच्यांत कच्चा माल किती सांपडणार ? नदीपल्याडच्या प्रांतांतून येणाऱ्या हरएक उपयुक्त पदार्थावर जबर जकात लागली तर व्यापार धंदा कितीसा उबदाऱ्याला येणार ? या उपराष्ट्रांत खाणी आहेत तर वाहतुकीचीं साधनें नाहींत; दुसऱ्या उपराष्ट्रांत पक्का माल थोडा होतो खरा पण तो पाठविण्यास बंदरेंच नाहींत असा प्रकार झाला की सर्वांचीच कुचंबणा होते. आतां हींच उपराष्ट्रें एकत्र आलीं, एक राष्ट्र म्हणून नांदूं लागलीं कीं एकमेकांच्या साधनांचा फायदा एकमेकांना मिळूं लागतो आणि उपराष्ट्रांचा तो संघ जगाच्या बाजारांत इतरांना चांगलीच टक्कर देऊं शकतो. सर्व जगाचें सावकार आणि लोकशाहीचें सूत्रधार होऊन बसलेलें अमेरिका हें राष्ट्र या फेडरेशनच्या यशस्वितेचें झगझगीत उदाहरण आहे.

पण केवळ व्यावहारिक फायद्यासाठीं किंवा आत्मरक्षणाच्या गोष्टीसाठीं जर उपराष्ट्रें एकत्र आलीं असलीं तर त्यांचा संघ टिकाऊ राहील आणि त्यांचा भुगा होण्यास वेळ लागणार नाहीं. प्रो. डायसीनीं सर्व घटकांना एकत्र ठेवण्यास कांहीं बळकट भावबंधन असावें हें जें आग्रहानें सांगितलें तें याचकरितां. अमेरिका किंवा जर्मनी यांच्यातले घटक आज इतके एकजीव झाले आहेत कीं त्यानीं आपापली स्वतंत्र राष्ट्रीयता व संस्कृति निर्माण केली आहे. याचें रहस्य हेंच कीं व्यवहारापेक्षा उच्च अशा कोणत्या तरी हेतूनें आपल्या आकांक्षा मर्यादित करून संघराज्याच्या वैभवासाठीं झटून प्रयत्न केला. यशस्वी होऊं इच्छिणाऱ्या कुठल्याहि नव्या संघराज्यानें हा आदर्श डोळ्यांआड करता कामा नये.

संघराज्याच्या राज्ययंत्राला खीळ बसण्याची भीति मध्यवर्ती सत्ता व घटक राष्ट्रांची सत्ता यांत संघर्ष आल्यास निर्माण होते. घटक राष्ट्रें आपापल्या परी स्वतंत्र असतात. तीं आपापले कायदे करीत असतात. मध्यवर्ती संघराज्याची

सत्ता हीहि सर्वांचे नियमन करीत असते. म्हणजे काय होतें ? संघराज्यांतला माणूस ह्या दोन सत्तांच्या अधिकाराखालीं वावरत असतो. एक तो ज्या उपराष्ट्राचा नागरिक आहे त्या सरकारची सत्ता आणि दुसरी सर्व संघराज्याची सत्ता. न्यूयॉर्क संस्थानांत मि. सिंक्लेअर नांवाचे एक गृहस्थ आहेत. या सिंक्लेअर साहेबांना न्यूयॉर्क संस्थानचें अनुशासन तर पाळावें लागतेंच, पण सर्व अमेरिकन संयुक्त संस्थानांची जी काँग्रेस म्हणजे लोकसभा आहे तिचाहि अधिकार या सिंक्लेअर नामक गृहस्थावर चालतो. याकरिता उपराष्ट्र आणि मध्यवर्ती संस्था यांच्या कायदेकानूंत जितकी अधिक सुसंगति असेल तितकें नागरिकांचें जीवन कमी अडचणींचें होतें. सामान्यपणें मध्यवर्ती सत्ता आपणांकडे चलन, परराष्ट्रीय व्यापार असे ठोक व्यवहारच ठेवते. बाकी सर्व अधिकार उपराष्ट्रांना दिलेले असतात. मध्यवर्ती सत्ता आणि उपराष्ट्र यांच्यात कांहीं हक्काविषयीं तंटा लागलाच तर वरीष्ठ न्यायकोर्टापुढें तो येतो. आणि या न्यायकोर्टाचा निकाल दोघां पक्षांना प्रमाण मानावा लागतो. आतां बहुतेक अधिकार घटकांकडेच सोपवावेत याच तत्त्वाला राजनीतिशास्त्रज्ञ उचलून धरीत असतात.

आणखी एक गोष्ट लक्षांत ठेवणें जरूर आहे कीं संघराज्यांतील उपराष्ट्रांत मानवी हक्क व कायदे यासंबंधींची कांहीं समान व्यवस्था असावी. नाहींतर एका उपराष्ट्रांत एका प्रकारचे हक्क आणि दुसऱ्या राष्ट्रांत दुसऱ्या प्रकारचे हक्क असले तर सोयीप्रमाणें नागरिक स्थलांतर करतील. आणि राज्यकारभारांत व समाजजीवनांत घोटाळे माजतील. अमेरिकेचें जें फेडरेशन आपण अगदीं नमुनेदार म्हणून मानतों त्यात देखील विचित्र घोटाळे होतात. म्हणजे एका अमेरिकन संस्थानांत घटस्फोट मिळविण्याचे बाबतींत फार कडक निर्बंध आहेत तर दुसऱ्या संस्थानांत फार सुलभपणें घटस्फोट मिळूं शकतो. आतां प्रथम सांगितलेल्या संस्थानांत मि. हार्टनट व मिसेस हार्टनट म्हणून एक मांडकुदळ जोडपें रहात असलें आणि घटस्फोट मिळविण्याचें दोघांनीं नक्की

ठरविलें असलें तरी त्यांना स्वतःच्या उपराष्ट्राचे कायदे आड येतात. मग हें जोडपें त्या दुसऱ्या संस्थानांत जातें आणि सहजासहजीं घटस्फोट घेऊन आपापल्या मार्गाला लागतें ! असें होत राहिलें तर नागरिकांची विचित्र भ्रमन्ती सुरू होईल. म्हणून शक्य तों सारखे कायदे करण्यास उपराष्ट्रांनी झटलें पाहिजे.

फेडरेशन ही राज्यव्यवस्था कशी असते आणि जगात तिचा कां व कसा विकास झाला हे आपण पाहिलें पण आपणांपुढें आज प्रश्न आहे तो हिंदुस्थानच्या फेडरेशनचा. १९३५ सालीं जो कायदा पास झाला त्यात हिंदुस्थानची राज्यव्यवस्था फेडरेशनच्या धर्तीवर विकसित व्हावी अशी योजना होती. परंतु पुढें प्रांतातील स्वायत्ततेचा बोजवारा झाला आणि युद्धाच्या धांदलींत स्थिर स्वरूपाच्या कुठल्याहि योजना हातीं घेणें अशक्य झालें ! तेव्हां 'फेडरेशन'ची योजना तात्पुरती रद्द केल्याची घोषणा व्हॉईसरॉयनी केली ! म्हणजे आज 'फेडरेशन' योजनेचें कागदोपत्रीं तरीं अस्तित्त्व राहिलेलें नाही.

मग अर्थातच तुम्ही विचाराल कीं या नष्ट झालेल्या योजनेची इतकी विस्तृत चर्चा करून काय फायदा ?

त्यानें एक आणि स्थूल उत्तर असें आहे कीं, ही फेडरेशनची योजना आज तात्पुरती जरी तहकूब झालेली असली तरी ती शांततेच्या काळीं पुनः पुनरुज्जीवित केली जाईल यात वाद नाहीं. फेडरल घटनेची पूर्व तयारी म्हणून फेडरल हायकोर्ट किंवा रिझर्व्ह बँक यांसारख्या ज्या संस्था सरकारनें उत्पन्न केल्या आहेत त्या आता दृढमूल झाल्या असून वाढीला लागल्या आहेत. त्याच्या पायावर पुढील इमारत रचिली जाईल यात शंका नाही. म्हणून आज हिंदी जनतेनें फेडरेशन या विषयाची चांगली तयारी करून ठेविली पाहिजे. म्हणजे जें उद्यां या योजनेचें बांधकाम सुरु होईल त्यांत हिणकस मालमसाला वापरला जाणार नाहीं किंवा त्याच्या बांधणींत मापासंबंधी गफलती होणार नाहींत हें दक्षतेनें पाहण्याचें ज्ञान जनतेला होईल.

दुसरें, फेडरेशन ही योजना हिंदुस्थानला वाईट आहे असें मुळींच नाहीं. मंडलाकार परिषदेच्या आरंभीं लंडनला जाणाऱ्या पुष्कळ हिंदी प्रतिनिधींना फेडरेशनच्या स्वरूपाची चांगलीशी कल्पनाच नव्हती. लंडनमध्यें येणाऱ्या या 'काळ्या' पाहुण्यांना ' फेडरेशन म्हणजे काय?' हें शिकविण्यासाठीं एकादा इंग्रजी पंडित नेमावा अशीहि सूचना एका अरेराव इंग्रज मुत्सद्यानें कांहींशी उपहासपूर्वक केली होती ! ह्या सूचनेच्या मागील क्षुद्र बुद्धि संतापजनक होती खरें. पण त्यामुळें आपल्या प्रतिनिधींचें त्याविषयींचें अज्ञान खोटें ठरत नाहीं. मात्र हें सर्वसामान्य प्रतिनिधींविषयीं झालें. याच प्रतिनिधींत सर तेजबहादुर सप्रूसारखे राज्यशास्त्रविशारद होते आणि 'फेडरेशन योजना काय किंवा राज्यघटना काय सर्वच विषयांत सप्रूंचे प्राविण्य जगातल्या नामांकित राज्य-शास्त्रज्ञांच्या तोडीचें आहे' असे उद्गार मुरब्बी इंग्रजी मुत्सद्यांना काढावे लागले ! असो. मंडलाकार परिषदेंत हिंदुस्थानांतल्या सर्व पक्षांना फेडरेशनच्या धर्तीची राज्यव्यवस्था मान्य आहे असें दिसून आलें. १९३५ च्या कायद्याचे तुकडे करावयास निघालेल्या राष्ट्रीय सभेनेंसुद्धां १९३८ मध्यें हरिपुरा येथें भरलेल्या अधिवेशनात फेडरेशन कल्पनेचें स्वागतच केलें.

"कॉंग्रेसचा फेडरेशन योजनेला विरोध नाहीं. पण हें फेडरेशन जवळ जवळ समान अधिकार उपभोगणाऱ्या आणि नागरिक हक्क व लोकसत्तात्मक प्रतिनिधित्व ज्यात आहे अशा घटकांचे बनलेलें असावें..."

असें कॉंग्रेसनें आपल्या ठरावात म्हटले. मात्र ब्रिटिश सरकारनें १९३५ च्या कायद्यानें देऊं केलेल्या फेडरेशनला विरोध केला.

कॉंग्रेस आणि इतर सर्व राजकीय पक्ष यांना संमत असलेलें हें राज्यघटनेचे ध्येयस्वरूप 'फेडरेशन' खात्रीनेंच हिंदुस्थानला हितप्रद होईल. कारण हिंदु-स्थान हा देश फार विस्तीर्ण आहे. रशिया वगळल्यास उरलेल्या युरोप-खंडाएवढा हा अवाढव्य देश आहे. मध्यवर्ती सत्ता कितीहि प्रबळ व कार्यक्षम टेविली तरी दूर दूर टोंकाला असलेल्या प्रांतांची उन्नति होण्यासाठीं त्या त्या

प्रांतांना जास्तींत जास्त अधिकार सुपूर्त केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. या देशांत अनेक भाषा आहेत आणि निरनिराळ्या विभागांत निरनिराळ्या संस्कृति आहेत. एकत्र कुटुंबाच्या रगाड्यांत पुष्कळ लहानसान किंवा विनचढाईखोर व्यक्तींचे गुण जसे खुरटून जायचा धोका असतो, तसें एखाद्या मोठ्या राष्ट्रांत सारे अधिकार मध्यवर्ति केंद्रांत एकवटले तर या भिन्न भिन्न संस्कृतींवर सावट पडून त्या क्षीण किंवा निस्तेज होतील. म्हणून भिन्न भाषा व प्रांतिक संस्कृति यांच्या अनुसार देशाचे नवे गट पाडून त्यांना शक्य तेवढें स्वातंत्र्य देणें हेंच सर्व देशाच्या एकंदर विकासाला पोषक होईल. म्हणून तत्वतः फेडरेशन अस्तित्वांत यायला कांहींच हरकत घेण्याचें कारण नाहीं.

प्रांताना जर संपूर्ण स्वायत्तता दिली आणि हिंदी फेडरेशनमधून फुटन निघण्याचा हक्क ओघानेंच त्याना मिळाला तर अखंड भारताचें स्वप्न भग्न होईल अशी भीति कित्येकांना वाटते. कॉंग्रेसनें प्रांताकडे सर्वाधिकार व स्वयंनिर्णय देण्याचा ठराव केलेला आहे आणि क्रिप्स् योजनेंतहि हेंच तत्त्व पत्करलें होतें. या तत्त्वानें हानि होण्याची भीति वाटते ती व्यर्थ आहे. असें पहा ! होऊं घातलेल्या हिंदी फेडरेशनमधून सिंध हा एक प्रांत फुटून जाऊं लागला तर सिंधचें भवितव्य काय होईल ? अन्न, पैसा, यंत्रें, कारागीर, सर्वच बाबतींत परतंत्र असलेल्या त्या प्रांताचें जीवन स्वतंत्र झाल्यावर कितीसे दिवस सुखानें जाईल ? सिंध मागासलेला दरिद्री प्रांत आहे म्हणून तेवढ्याच पुरतें हें विवेचन आहे असें समजूं नका. हिंदुस्थानांतले संपन्न प्रांत देखील कुणी बंदरासाठीं तर कुणी लोखंडासाठीं, कुणी कापूस, ताग यासाठीं तर कुणी बाजारपेठांसाठीं परावलंबीच आहेत. रेल्वे, परचक्रापासून संरक्षण इ० बाबतींत 'एकमेकां साह्य करूं' असें वागल्याशिवाय गत्यंतरच नाहीं. म्हणजे निसर्गानेंच हिंदुस्थानची रचना अशी केलेली आहे कीं राष्ट्र म्हणून तें एकसंघ असावें, आणि त्यांतील घटकांना फुटीरपणाचा हक्क मिळाला तरी तो वापरण्यांत त्यांचा फायदा नसावा. अशा स्थितींत स्वयंनिर्णयाचा हक्क प्रांताना दिला तरी त्यापासून मोठेंसें नुकसान होणार नाहीं.

एक रागांत अनेक स्वर असतात. ते एकमेकांपासून भिन्न असतात. तरी पण त्यांचा एकत्र विलास आल्हाददायक व सुरेल वाटतोच ना ? फेडरेशनमधील निरनिराळ्या भिन्नरंगी घटकांच्या सहजीवनानें असें संवादी व सुंदर वातावरण निर्माण झालें पाहिजे. गुरुमुखी आणि तामिल, मराठी आणि बंगाली अशा नाना भाषा बोलणारे, नाना धर्मपंथांचे, नाना पेहेरावांचे हिंदी लोक एकत्र येऊन त्यांनीं एक रमणीय अभिनव भारतीय संस्कृति निर्माण केली पाहिजे. हा कांहीं केवळ कल्पनाविलास नव्हे. आज नकळत, चांचपडत आपण तशी एक संस्कृति निर्माण करीत आहोंत. नव्या जाणीवेनें डोळसपणानें व शुद्ध ज्ञानाच्या भूमिकेवरुन हाच प्रयत्न मोठ्या प्रमाणावर यशस्वी करुन दाखवावयाचा आहे. अमेरिका, रशिया यासारख्या फेडरेशनमध्ये विविधतेंतून संगति, वैचित्र्यांतून एकता निर्माण करण्याचा प्रयोग यशस्वी झालेला आपण पहात आहोंत. पण आपण जरा अंग मोडून झटलो तर आपली फेडरल घटना का यशस्वी होणार नाहीं ? जरुर होईल.

आज मृतप्राय झालेल्या फेडरेशनचा विचार करण्याचें प्रयोजन काय हें आलें ना लक्षांत तुमच्या ? ती योजना आज मृतप्राय झाली असली तरी ती पुनः डोकें वर काढणार यात शंका नाहीं, आणि त्या योजनेचा तिच्या मूळ स्वरुपात अंगीकार करण्यात काही तोटा नाहीं. पण या कारणाहूनहि अधिक प्रबळ अशा हेतूसाठीं मला तुम्हाला या विषयावर सांगावेंसें वाटतें. अमेरिका किंवा रशिया या स्वतंत्र देशातील फेडरेशन्सच्या धर्तीवर फेडरल राज्यव्यवस्था सरकारनें आपणांस देऊं केली. मंडलाकार परिषदेच्या वेळचे भारतमंत्री सर सॅम्युएल होअर म्हणाले कीं, "ही योजना हिंदुस्थानातील सर्व पक्षांना संमत आहे." सर सॅम्युएलचें म्हणणें खरें होतें. पण कोणत्या अर्थानें ? फेडरल पद्धतीच्या राज्यघटनेचीं तत्त्वें लावून हिंदुस्थानची नवी राज्यघटना असावी याबाबत सर्वांचें एकमत होतें. ब्रिटिश सरकारनें शेकडों कुंपणें घालून आणि गुंतागुंती करून जी फेडरेशन योजना ठरविली तिच्याकडे शहाणे व राष्ट्रीय वृत्तीचे लोक ढुंकूनहि पाहण्यास तयार नव्हते !

मंडलाकार परिषदेंत सरकारनें फेडरेशनची योजना मांडली आणि युद्ध सुरू झाल्यामुळें ती तात्पुरती तहकूब केली. पण एवढ्या ७–८ वर्षांच्या कालावधींत म्हणजे ही फेडरेशन योजना शिजत असतां हिंदी राजकारणांत ज्या खळबळी झाल्या त्या फार अर्थपूर्ण होत्या, फेडरेशनला कुणी संमति दिली, कुणीं कोणत्या अटींवर फेडरेशनमध्यें यायचें ठरविलें, फेडरेशनला कोणत्या पक्षानें कां विरोध केला, फेडरेशनच्या कायद्यांत सरकारनें कोणतीं कलमें घातलीं, आपापले हितसंबंध रक्षण करण्यासाठीं कुणीं कोणती सावधगिरी घेतली या सर्वांचा वृत्तांत बोध घेण्यासारखा आहे. रशियन राज्यक्रांतीचा नेता महानुभाव लेनिन म्हणे कीं, "कुठलीहि मोठी चळवळ अपेक्षेपेक्षा ठरली तरी ती फुकट जात नाहीं. कारण त्या चळवळीच्यामुळें देशांत क्रांतिकारक शक्ति कोणत्या आहेत हें स्पष्ट होतें." लेनिनच्या या म्हणण्याचा प्रत्यय फेडरेशन योजनेच्या वाटाघाटींत आपल्या देशातलें राजकीय जीवन जें ढवळून निघालें त्यावरून येईल. हिंदी राष्ट्रीयतेच्या पाठीराख्या शक्ति अधिक तेजानें तळपूं लागल्या आणि अस्पष्ट अथवा गुप्त असलेल्या प्रतिगामी शक्तींचें खरें हिडीस स्वरूप कळून आलें म्हणूनच फेडरेशनच्या वाटाघाटींचा इतिहास त्या दृष्टीनें अभ्यासणें हें राजकीय ज्ञानास अत्यंत पोषक होणार आहे. सरकारनें तहकूब करून टाकलेल्या फेडरेशनचा विचार (जो शांततेच्याच काळीं करणें योग्य होईल) आजच्या धामधुमीच्या काळीं करण्याचा मीं का आग्रह धरतों याचें रहस्य आलें का आतां तुमच्या ध्यानांत ?

---

## (२) फेडरेशन : : १०

मागील खेपेस फेडरेशनचें खरें स्वरूप काय याची मी चर्चा केली, आणि त्या चर्चेच्या शेवटीं तुम्हांला सांगितलें कीं ब्रिटिश सरकारनें हिंदुस्थानला जें फेडरेशन देऊं केलें तें अत्यंत सदोष होतें, त्याचा सर्वांनीं निषेध केला, आणि त्या फेडरेशनच्या वाटाघाटींत हिंदुस्थानांतील पक्षांपैकीं क्रांतिकारक कोणते व प्रतिगामी कोणते हें कळून आलें. आज ह्याच गोष्टीचा आपणांला विस्तृत उहापोह करावयाचा आहे.

आपल्या या हिंदुस्थानांत दोन भाग आहेत. एक ब्रिटिश सत्तेचा आणि दुसरा संस्थानी सत्तेचा. १८५७ चें बंड झालें त्याला. डलहौसी साहेबांनीं संस्थानें खालसा करण्याचा सपाटा चालविला हे एक मुख्य कारण होतें. इंग्रज सरकारला आपली ही चूक कळून आली, आणि खालसा करण्याचें धोरण इंग्रज सरकारनें सोडून दिलें व संस्थानिकांना आपले विश्वासू मित्र बनवून सोडण्याचा डाव रचिला. तो अपेक्षेबाहेर यशस्वी झालेला आपण पहात आहोंत! हिंदुस्थानांत इंग्रज व हिंदी लोक यांच्यांत सत्तेच्या बाबत जो लढा सुरू आहे त्यांत मध्यरात्रींसुद्धां आपल्या पाठीशीं राहणारे इमानी दोस्त अशा विश्वासानें सरकार त्यांच्याकडे पहात आहे. संस्थानिकहि अशा तोऱ्यानें हिंदी लोकांशीं वागतात कीं, "आमचे तहनामे, करारमदार जे कांहीं झाले आहेत ते ब्रिटिश सरकारशीं, तुम्ही प्रजा आणि आम्ही धनी. आम्ही मान वाकवूं पण ती सार्वभौम सरकारपुढें. आमच्या पूर्वजांचे आणि विलायत सरकारचे झालेले तहनामे

बदलण्याचा हिंदी लोकसत्तेला काय अधिकार ? " संस्थानिकांच्या या वागणुकी-मुळें हिंदुस्थानांत लोकशाही प्रस्थापूं पाहणारें राष्ट्रीयत्व हें त्यांच्या स्वतःच्या अधिकारावर अतिक्रमण करणारें संकट वाटतें आणि त्याला कळत नकळत त्यांचा विरोध असतो. म्हणूनच नेहरू-रिपोर्टात संस्थानांवर प्रकरण लिहितांना सर तेजबहादुर सप्रूंनीं "इंडियन् अल्स्टर" म्हणून संस्थानिक वर्गाची संभावना केली. ( आयर्लंडमध्यें स्वातंत्र्याला विरोध करणारा 'अल्स्टर' नांवाचा एक परगणा आहे. या कुप्रसिद्ध परगण्याचें उपमान स्वातंत्र्यविरोधी गटाला नेहमीं वापरतात ) हिंदुस्थानात लोकसत्तेच्या विकासाचा प्रश्न आला कीं हा संस्थानांचा गट काहीतरी रोकटी उपस्थित करतोच ! अर्थात् आपल्या संस्थानांत लोकशाही देऊन राष्ट्रीय स्वातंत्र्याला हस्तें परहस्तें सहाय्य होणारे स्वातंत्र्यवादी संस्थानिकहि काहीं आहेत, पण ते अपवादरूपच म्हणायचे.

हिंदुस्थानांत ब्रिटिश सरकार व संस्थानें अशा दोन अधिराज्यांमुळें मोठी विचित्र परिस्थिति झाली आहे. ब्रिटिश सरकारच्या राज्यांत लोकशाहीच्या कल्पना चांगल्या रुजल्या आहेत. म्युनिसिपालिटीपासून कायदेमंडळापर्यंत थोडा-फार मतदानाचा हक्क नागरिकांना मिळाला असल्यानें लोकजागृति खूप झालेली आहे. यंत्राचा विकास व नव्या धर्तीवर उत्पादन थोडें फार सुरू झाल्यानें विज्ञानाधिष्ठित संस्कृतीची कल्पना ब्रिटिश अमलाखालील हिंदी जनतेला थोडीतरी आली आहे. संस्थानी जग अजून मध्ययुगात वावरत आहे. 'राजा हा ईश्वरी अंश आहे' या कल्पनेची पकड संस्थानी प्रजेवर जबर बसलेली आहे. संस्थानिकाचें खाजगी उत्पन्न एकंदर उत्पन्नाच्या मानानें फार असल्यानें संस्थानांत उद्योगधंदे वाढण्यास वाव नाहीं. कुणाची लोकसंख्या शेंकड्यांनीं मोजतां येण्यासारखी तर कुणा संस्थानिकाचें उत्पन्न कांहीं हजारांच्या आंत अशीं कितीतरी संस्थानें आहेत ! अशा स्थितींत आपल्या चैनी व खानदानी परंपरा चालवून प्रजेच्या सर्वांगीण विकासासाठीं संस्थानिक कितीसा पैसा घालूं शकणार ? ब्रिटिश हिंदुस्थानांत लोकशाहीची जागृति आणि संस्थानी हिंदु-

स्थानांत मध्ययुगमचा काळोख अशा स्थितींत या दोन प्रचंड घटकांचा बेमालूम मिलाफ कसा होणार? आणि फेडरेशनमध्यें त्यांची सांगड घालण्याचा प्रयत्न सरकारनें केला म्हणूनच ती योजना गुंतागुंतीची आणि राष्ट्रहिताला विघातक झाली आहे.

हिंदुस्थानांतील प्रमुख राजकीय पक्षांचा या संस्थानी घटीकडे पाहण्याचा दृष्टिकोण कसा वेगवेगळा आहे हे पाहणें फार बोधप्रद होईल. आपल्या पराक्रमी पूर्वजांचे व पौराणिक आणि ऐतिहासिक राष्ट्रपुरुषांचे वंशज या दृष्टीनें संस्थानिक हीं स्फूर्तिस्थानें होत अशी श्रद्धा महासभा बाळगते. ज्यांच्या घराण्याचीं मुळें राम-कृष्ण किंवा चंद्र-सूर्य यांच्यापर्यंत आपण नेहमीं भिडवितों त्यांचें वैभव आपणास नवीन उत्साह देणार नाहीं काय? **"पूर्व दिव्य ज्यांचे त्यांना रम्य भाविकाल"** हा आशावाद का फोल ठरेल! हिंदु संस्थानिक घराण्यांकडे पाहण्याची जी आदराची भावना महासभेनें बाटीला लाविली आहे तिचें अनुकरण इस्लामी संस्थानांच्या बाबतींत मुस्लिम लीगहि करीत आहे. आपापल्या पूर्वजांच्या स्फूर्तिस्थानांचें पूजन करण्याची महासभेची व मुस्लिम लीगची भक्तिशीलता प्रामाणिक असेल. बुद्धिवादाला ती पटेलच अशी अपेक्षा करण्याचेंहि कारण नाहीं. पण दिसतें तें मात्र असें कीं या दोन संस्था आपापल्या सिंहासनाधीश दैवतांना जितक्या अभिमानानें जपतात त्या मानानें त्या दैवतांच्या अमलाखालील रयतेचा त्या विचार करीत नाहींत?

या पक्षांच्या अगदीं उलट मताचा नेहरूंचा पक्ष म्हणतां येईल. नेहरूंच्या मागें काँग्रेसमधला जहालपक्ष तर आहेच पण काँग्रेसबाहेरीलहि क्रांतिवादी असे लक्षावधि लोक आणि खुद्द संस्थानांतली लोकसत्तावादी रयत नेहरूंना प्रत्यक्षाप्रत्यक्ष साथ देणारी आहे. नेहरूंच्या मतें जग आतां इतकें पुढें गेलेलें आहे कीं जुन्या जगानली मोडकळीला आलेली ही सरंजामशाहीची समाजव्यवस्था आतां नष्ट केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. अमुक माणसांत दैवी अंश आहे, अमुक माणसाला सुखोपभोग घेण्याचा हक्क आहे या कल्पनेची छाप

माणसाच्या मतावर असली म्हणजे विषमतेचा बीमोड होण्याचे नांवच नको! आणि विषमता नष्ट झाली नाहीं तर व्यक्तीची अथवा समाजाची प्रगति कशी होणार? अशी नेहरूंची समाजवादी विचारसरणी आहे. संस्थानिकांना अर्धचंद्र दिल्याशिवाय संस्थानी प्रजेंतला घाबरटपणा, मागासलेपणा, दारिद्र्य, अंधश्रद्धा इ० गोष्टी नाहींशा होणार नाहींत असें नेहरूंना वाटतें.

या दोन टोकांच्या विचारसरणीहून म. गांधीचा पंथ वेगळा आहे. जबरदस्तीनें एकाद्याला स्थानभ्रष्ट करून त्याच्या हातांत करवंटी देणें हें गांधीजींना हिंसेचें कृत्य वाटतें. आज संस्थानिकांचीं सिंहासनें काढून घेतलीं तरी त्यांच्या मनांतली प्रभुत्वाची लालसा कांहीं नष्ट होत नाहीं. शिवाय जी प्रजा अद्यापि मागासलेली आहे तिला आपण एकदम मुक्त केली किंवा तिला बंड करण्यास बाहेरून मदत पाठविली तरी तिची प्रगति जोपर्यंत एका पातळीपर्यंत झाली नाहीं तोंपर्यंत असल्या उसन्या सामर्थ्याचा काहीं उपयोग तिला होत नाहीं. मिळालेले हक्कहि तिला परिणामकारक रीतीनें वापरतां येत नाहींत. म्हणूनच गांधीजी संस्थानी प्रजेनें चालविलेल्या लढ्याला अनुकूल असले आणि संस्थानी प्रजेच्या हक्कासाठीं त्यांनीं प्राण पणाला लावण्याची सिद्धताहि दाखविली असली तरी कॉंग्रेसनें आपण स्वतः संस्थानी प्रजेच्या लढ्यांत जाऊन भाग घेण्यास ते सहसा अनुज्ञा देत नाहींत. संस्थानिकांनीं आपण जनतेचे विश्वस्त आहोंत ही भावना सतत उराशीं बाळगून उपभोगाना फाटा द्यावा, आणि साधेपणानें वागून प्रजेची सर्वांगीण उन्नति साधावी असा गांधीजींचा संस्थानिकांना उपदेश असतो. संस्थानिकांनीं आपल्या दिव्य परंपरा ध्यानीं घ्याव्या, ज्या राम, जनक, अशोक, शिवाजी यांचे आपण वारस आहोंत त्या पुण्यश्लोक राजर्षींच्या परंपरेला साजेसें आपलें जीवन घालवावें हें जेव्हां गांधीजी सांगतात तेव्हां महासभेच्या पुढाऱ्यांप्रमाणेंच संस्थानी सिंहासनें हीं स्फूर्तिस्थानें गांधीजींना वाटत असावींत असें वाटतें. पण गांधीजींच्या विचारपद्धतींत प्रजाहिताला पहिलें स्थान आहे. प्रजेनें संघटित होऊन सारे हक्क मिळविले

आणि राजानें स्वेच्छेनें राज्यत्याग केला तर गांधीजींना तें पाहिजेच आहे. गांधीजी एका बाजूनें अधिपतींना त्यागवृत्तीचा आदेश देतात तर प्रजेला लोकशाहीसाठीं संघटित होण्याची आवश्यकता प्रतिपादन करतात.

याप्रमाणें संस्थानी प्रश्नाकडे पाहाण्याचे हे तीन दृष्टिकोण मीं तुम्हांला सांगितले. यांतला कोणता अधिक समंजसपणाचा आहे हें तुम्हांला सहज कळूं शकेल. यांतला अमुक एकच दृष्टिकोण बरोबर आहे हें सांगण्याचें मी टाळित करतों. वरील तीन दृष्टिकोणांपैकीं कॉंग्रेस संस्थेच्या संस्थानविषयक धोरणावर गांधीजींच्या विचाराचाच प्रभाव अजून आहे. अखिल-भारतीय-संस्थानी-प्रजा परिषद ही जी संस्थानी प्रजेचें हित पाहणारी संस्था आहे तिच्या चळवळींत कॉंग्रेसच्याच विचाराचें प्रतिबिंब पडलेलें दिसतें. मागें डॉ. पट्टाभिसीतारामय्या हे तिचे अध्यक्ष होते. नतर पं. नेहरू आले. ब्रिटिश हिंदुस्थानांत जी लोकशाही येऊं घातली आहे त्यासारखी आपल्या हद्दींतहि निर्माण व्हावी ह्या उद्देशानें ही संस्था काम करते.

मंडलाकार परिषदेच्या आरंभीं संस्थानिकांनीं स्वयंस्फूर्तीनें हिंदी फेडरेशन-मध्यें आपण येऊं असें जाहीर केलें ! ब्रिटिश मुत्सद्यांनीं जणूं एकादें मोठें ओझें आपल्या छातीवरून उतरलें असा बहाणा केला आणि म्हटलें, 'बरें झालें बुवा संस्थानिक विनासायास फेडरेशनमध्यें यायला कबूल झाले ! काळजी मिटली.' वास्तविक ही घटना घडवून आणण्यांत सरकारचें अंग नव्हतें असें नाहीं. संस्थानिकांनीं फेडरेशनविषयींचें जें प्रेम एकदमच प्रगट केलें त्यालाहि कांहीं आंतल्या धुसफुशी कारण झाल्या. ब्रिटिश सरकारच्या सासुरवासाचा जाच वर्षानुवर्षे सोसून थकलेल्या संस्थानिकांना मानेवरील जोखड जरा हलकें करतां येईल तर हवें होतें. नवीन होऊं घातलेल्या हिंदी लोकशाहीशीं जर आपण थोडी सलगी केली तर आपणांला जरा इकडे तिकडे सरकायला जागा मिळेल असें हिंदी संस्थानिकांना वाटूं लागलें आणि त्यांनीं फेडरेशनला एकदम मान्यता दिली.

पुष्कळदां काय होतें? एकादी नवी चांगली गोष्ट हितप्रद म्हणून माणूस प्रथम पत्करतो, आणि नंतर ती पत्करण्यांत केवढी प्रचंड जबाबदारी आपण आपणांवर लादून घेतली हें त्याला हळूहळू कळूं लागतें. ही जबाबदारी पार पाडण्याची आपण तयारी करून ठेविलेली नाहीं हें त्याला समजतें आणि मग तो पस्तावतो. हीच अवस्था संस्थानिकांची झाली. फेडरेशन योजना जसजशी घडविली जाऊं लागली तसतशी संस्थानिकांना भीति वाटूं लागली. सार्वभौम सरकारशीं आपले तहनामे झाले, आपलें स्वतंत्र राज्य आजवर आपण उपभोगलें, आणि आतां फेडरेशनमध्यें आपणावर हिंदी लोकसत्तेचें आक्रमण होणार याचीं चिन्हें दिसूं लागलीं. हिंदुस्थानच्या फेडरेशनमध्यें सामील होण्यास मान्यता द्यायची म्हणजे आपणांवर मध्यवर्ती कायदेमंडळाची सत्ता लादून घ्यायची व आपल्या कांहीं हक्कांवर पाणी सोडावयाचें हें संस्थानिकांना कळून चुकलें; आणि फेडरेशन-घटनेंत आपल्यापुरती लोकशाहीची सत्ता अधिकांत अधिक संकुचित करून घेण्याचा भगिरथ प्रयत्न त्यांनीं केला।

आपल्या मांडलिकांच्या मदतीसाठीं इंग्रज सरकार सज्ज होतेंच. कारण होऊं घातलेल्या फेडरेशनमध्यें हिंदी राष्ट्रीयतेच्या विरुद्ध असा स्वतःच्या बाजूनें हुकमी कौल देणारा एक प्रबळ गट सरकारला तयार करून ठेवायचा होता. त्यामुळें सरकारनें संस्थानिक हे हिंदी लोकशाहीशीं पुरेसे समरस होणार नाहींत याची सावधगिरी घटनेचीं कलमें ठरवितांना घेतली. मध्यवर्ति असेंब्लीत संस्थानिकांना भरपूर जागा देऊं केल्या. वरिष्ठ कायदेमंडळांत संस्थानिकांना १०४ जागांपैकीं ५२ जागा मिळाल्या. ७ कोटींपेक्षां अधिक असलेल्या संस्थानी लोकसंख्येच्या निम्मी लोकसंख्या फेडरेशनमध्यें सामील होण्यास कबूल असेल तरच फेडरेशन अस्तित्त्वांत यायचें! म्हणजे हिंदी फेडरेशन अस्तित्त्वांत आणावयाचें कीं नाहीं याची उत्तरी संस्थानिकांच्या हातीं! वरिष्ठ लोकसभेंत त्यांना २५० पैकीं १२५ जागा! आणि प्रतिनिधी संस्थानी प्रजेनें निवडलेले नव्हे तर संस्थानिकांनीं आपल्या मर्जीप्रमाणें पाठविलेले! म्हणजे

हा १२५ सरंजामी प्रतिनिधींचा गट इतर अराष्ट्रीय व जातीय गटांशी संगनमत करून हिंदी राष्ट्रीय पक्षाचा पाणउतारा करीत राहणार अशी राष्ट्रीय वृत्तीच्या हिंदी लोकांना साधार भीति वाटते।

याशिवाय ब्रिटिशशासित ११ प्रांतांना जो व्हाईसरॉय (राज्यप्रतिनिधी) असायचा त्यापेक्षां वेगळा अधिकारी आपणावर असावा असा संस्थानिकांनीं आग्रह धरिला. कारण व्हाईसरॉय हा अधिकारी कायदेमंडळाला जबाबदार आहे तेव्हां त्याचे निर्णय हे कायदेमंडळाच्या विचारानें आपल्यावर येऊन पडतील आणि मग लोकाभिमुख झाल्याशिवाय गत्यंतर उरणार नाहीं. कायदेमंडळामध्यें आजच्या ब्रिटिशशासित प्रांतांत होऊं घातलेल्या सुधारणांवर मतें देण्याचा संस्थानी प्रतिनिधींना अधिकार मिळणार ! मात्र संस्थानांत जे कायदे करायचे त्यांवर संस्कार करण्याचें स्वातंत्र्य मात्र लोकप्रतिनिधींना नाहीं ! हा न्याय झाला काय ?

सार्वभौम सरकारशीं आपल्या पूर्वजांनीं करारमदार केल्याचा मोठा बाऊ संस्थानिक नेहमीं करतात. 'आमच्या त्या प्राचीन तहनाम्याचें पावित्र्यरक्षण करण्याची जबाबदारी आमच्यावर आहे' असें नेहमीं सांगण्याचा त्यांचा रोख असतो. त्याला नेहरू व इतर लोकनेते यांनीं वेळोवेळीं चोख उत्तर दिलेलें आहे. "तुमच्या पूर्वजांनीं सार्वभौम सरकारशीं करारमदार करताना आमचा सल्ला घेतला होता का ? आमच्या सल्ल्यावांचून जे करार आमच्यावर लादण्यात आले आणि आमच्या विकासाला ज्यांचा अडथळा होतो हें स्पष्ट दिसतें आहे ते करारमदार आम्हीं कां पाळावे ?" पण संस्थानिकांप्रमाणें सरकारहि या करारमदाराच्या पावित्र्याचें स्तोम माजविण्यास हातभार लावतें. कारण हिंदी लोकशाहीविरुद्ध उभ्या केलेल्या वतनदारांच्या या गटावर सरकारच्या सत्तेची स्थायिकता बरीच अवलंबून आहे !

ब्रिटिश सरकारनें देऊं केलेल्या फेडरेशनमध्यें सरकारची पकड कायम ठेवण्याची व्यवस्था कशी केली आहे हें पाहिलेंत ना ? या घातक व्यवस्थे-

सकट फेडरेशन-योजना कोणता राष्ट्रीय माणूस पत्करील? संस्थानिकांनी आपल्या राज्यात संपूर्ण लोकशाही (ब्रिटिश पार्लमेंटाच्या धर्तीवर) स्थापून फेडरेशनमध्यें येऊं घातलेल्या लोकशाहीच्या हातीं आपले सर्वाधिकार सोंपविण्याची उदारता दाखविली असती तर त्याच्या राष्ट्रीय वृत्तीच्या देशबांधवांनीं गौरवपूर्वक त्याच्याशीं तडजोड केली असती. असो. आपण अजूनहि आशा करूं या कीं नव्या युगाचें तेज संस्थानिकाच्या कुंद राजवाड्यांत अंतर्महालापर्यंत केव्हातरी जाऊन पोचेल, आणि सर्वस्वीं उपऱ्या परकीय सत्तेपेक्षां आपल्या देशबांधवांनीं अलोट त्याग करून प्राप्त करून घेतलेल्या स्वदेशी लोकसत्तेचे उपासक होणें हेंच न्यायाचें आहे असें त्यांना पटेल!

जातीय प्रश्नाप्रमाणेंच संस्थानिकांचा प्रश्न हा हिंदी राजकारणांत फार जाचक होऊन बसला आहे. म्हणून फेडरेशनमधील या विशिष्ट भागाचा इतका उहापोह केला. पण एवढा एकच भाग फेडरेशन योजनेंत तापदायक आहे असें नाहीं. निवडणुकीमध्यें जातवारीचें तत्व ठेविलें आहे. जातीय प्रश्नाचे वेळीं अल्पसंख्यांकांना गोंजारण्याचें व राष्ट्रवादापासून फोडण्याचें काम ब्रिटिशांनीं आजवर किती चतुराईनें केलें हें पाहिलेंच. आतां या अल्पसंख्यांकाना स्वतंत्र प्रतिनिधित्व देऊन त्यांचे गट बनविण्यांत आले आहेत. स्वतंत्र अधिकार आपणाला मिळाले त्यामुळें कृतज्ञ असलेले हे गट संस्थानिकांचें अनुकरण करून ब्रिटिश सरकारची टाळी का वाजविणार नाहींत? जरूर वाजवितील.

पण एवढ्यानेंहि भागलें नाहीं. लोकशाहीविरोधी फळी अधिकच भक्कम करण्याकरिता आणखीहि युक्त्या सरकारनें लढविल्या आहेत. इंग्रजांचा हिंदुस्थानशीं संबंध आल्यापासून या ठिकाणीं वेळोवेळीं इंग्रज व्यापाऱ्यांनीं आपलें भांडवल घातलें आहे. बरेच लोक तर इथें स्थायिक हि झाले आहेत. चहाचे मळे, तागाच्या गिरण्या, रेल्वे, विमाकंपन्या इ. अनेक उद्योगधंद्यांत युरोपियन लोकांनीं कोट्यावधि रुपयाचें भांडवल गुंतविलें आहे. अर्थात् तें सुरक्षित रहावें

आणि हिंदी लोकशाहीच्या राजवटींत या गौरवर्णी वंश्याचा वृत्तिच्छेद होऊं नये याची आपल्या सरकारला दक्षता वाळगणें जरूरच आहे. ती दक्षता वाळगण्यासाठीं त्यांना स्वतंत्र प्रतिनिधित्व देण्यांत आलें आहे. अल्पसंख्यांकांत जरी कदाचित् फाटाफूट झाली तरी हे आपल्या हाडामांसाचे लोक आपणांला विन्मुख जाणार नाहींत अशी साहजिकच सरकारला खात्री वाटते.

बादशहांचा प्रतिनिधी म्हणून जो माणूस येथें राहायचा त्याचे अधिकार तर काय अमर्याद आहेत! संस्थानिकांप्रमाणें रेल्वेचें राज्य अगदीं विभक्त करून टाकलेलें आहे. त्यात व्हाइसरॉयसाहेबच कांहीं बोलले तर बोलूं शकणार! हिंदी लोकांना कांहीं अधिकार नाहीं! हिंदुस्थानचें संरक्षण हा खास व्हाईसरॉयचा विषय आहे. संरक्षणाच्या बाबतींत हिंदी लोकांना पूर्ण अधिकार मिळावेत निदान भरीव हक्क तरी लाभावेत यासाठीं आजवर अनेक नामांकित देशभक्तांनीं भगिरथ प्रयत्न केले. पण संरक्षणाचे बाबतींत हिंदी लोकांना विश्वासांत घ्यायला सरकार अद्यापीहि तयार नाहीं! फेडरेशनमध्यें ह्या विषयावर कायदेमंडळाला कांहींच सत्ता न ठेवून सरकारनें हिंदी लोकांच्या पौरुषाचा व निष्ठेचा एकप्रकारें अपमानच केला आहे! वास्तविक अनेक लहानमोठ्या युद्धांत सरहद्दीच्या संरक्षणांत, आणि अंतर्गत शांततेच्या कामीं हिंदी सैन्यानें आश्चर्यकारक शौर्य गाजवून ब्रिटिश साम्राज्याची सेवा केली आहे! हाच त्या सेवेचा मोबदला! गेल्या वर्षी (१९४२) क्रिप्स् साहेब जेव्हां एक स्वातंत्र्याची नवी योजना घेऊन हिंदी पुढाऱ्यांशीं तडजोड करायला आले होते, तेव्हां सरकारची ही अविश्वासाची वृत्ति (जगभर हिंदी सैन्यानें चालविलेला अतुल पराक्रम व साम्राज्याला केलेले अमोल साह्य पुढें असूनही) बदललेली नाहीं याचा संतापजनक प्रत्यय आला! संरक्षणाचे खात्यांत राष्ट्रीय नेत्यांना थोडेफारही अधिकार देण्याचें सरकारनें नाकारलें म्हणून तर आझाद-नेहरूंसारख्यांनीं समंजसपणें पत्करलेली सह-कार्याची भूमिका त्यांना सोडावी लागली!

कायदेमंडळातून येणाऱ्या प्रतिनिधींनी प्रांताच्या प्रमाणानें भरल्या जाणार! याचा सर्व परिणाम एवढाच कीं हिंदुस्थानांतली जनता स्वतःचे प्रतिनिधी तेथें फार थोड्या प्रमाणात पाठवूं शकेल. आणि जे खरेखुरे लोकप्रतिनिधी जातील त्यांना तेथील्या विकट परिस्थितीमुळें कांहीं जनहिताचें काम करतां येणार नाही. एकादी मोठी सामान्य रयतेच्या कल्याणाची सुधारणा सुचवावी तर भांडवल-वाल्यांचे प्रतिनिधी त्याला विरोध करणार; उद्यां या सुधारणेचा कायदा झाला तर तो आपल्याहि डोक्यावर बसेल या भीतीनें संस्थानी प्रतिनिधी भांडवलवाल्यांचा पाठपुरावा करणार; मुसलमान जातिनिष्ठांचें सूत नवाब-अमीर या गवर वर्गाशींच असल्यानें ते या विरोधी बनावांत सामील होणार. अशा रीतीनें सुधारण्याचें एखादें गलबत जरी लोकांपर्यंत यायला निघालें तरी वाटेंत या अनंत खडकावर आपटून, तडकून, भग्न व खिळखिळें होऊन मुक्कामाला पोचायचें!!

आतां मला खात्री आहे कीं कॉंग्रेसनें फेडरेशनला कसून कां विरोध केला याचें रहस्य तुम्हाला कळून येईल. ( आमचे जिनासाहेब सुद्धां फेड-रेशन-विरोधक म्हणवतात आपणांला! पण फेडरेशनमध्यें मध्यवर्ती कायदे-मंडळांत हिंदूंचें बहुमत होईल आणि मग आपणांला अनिर्बंध सोटेशाही गाजवायला मिळणार नाहीं या दृष्टीनें त्यांचें पहाणें आहे! आणि 'पाकि-स्तान'ची योजना आखून केवळ मुसलमानांचें संयुक्त राज्य स्थापण्याचा डाव त्यांनीं जो टाकला आहे तो याचकरितां! ) १९३५ च्या कायद्याप्रमाणें प्रांतिक कायदेमंडळांच्या निवडणुकी झाल्या आणि कॉंग्रेसनें त्यांत भाग घेतला. कोट्यावधि मतदारसंघांना आवाहन करण्याकरितां कॉंग्रेसनें जो जाहीरनामा काढला व कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं जो प्रभावी प्रचार देशाच्या कान्याकोप-ऱ्यापर्यंत केला त्यांत फेडरेशनविरोधावर मुख्यतः भर दिला होता. १९३५ चा एकंदर कायदाच जनहितविरोधी, अपुरा आहे आणि आपणांवर पर-कीय सरकारनें लादला आहे असा कॉंग्रेसच्या म्हणण्याचा मुख्य रोख होता.

या कायद्यांखालीं छिद्रें नुसतीं रफू करून भागण्यासारखें नाहीं. तो कायदा रद्द करून लोकांनीं निवडलेल्या घटनासमितीच्या साधनानें खरीखुरी प्रातिनिधिक सत्ता हिंदी लोकांच्या हातीं यावी असें कॉंग्रेसनें आपलें स्पष्ट ध्येय मांडलें.

अमेरिका, जर्मनी, रशिया, कॅनडा इ० देशांतील फेडरेशन्सबद्दल मीं तुम्हांला माहिती सांगितली. या राज्यपद्धतीचें काम या सर्व देशांत मोठ्या यशस्वी रीतीनें चाललें असून या देशाचा भौतिक व आत्मिक उत्कर्ष फेडरेशनें चांगला केला. आज हीं राष्ट्रें जगात आघाडीवर आहेत. हें ऐश्वर्य हिंदुस्थानला मिळावयाचें असेल तर हिंदुस्थानचें फेडरेशन हें स्वतंत्र राष्ट्राचें फेडरेशन झालें पाहिजे. याचा अधिक खुलासा म्हणजे हिंदुस्थान प्रथम स्वतंत्र करून मग त्यात ही संघराज्याची अथवा संयुक्त राज्याची घटना प्रस्थापित केली पाहिजे. पौष्टिक अन्न हें शक्तिवर्धक कोणाला होईल? ज्याचें शरीरयंत्र सुरळीत व रोगमुक्त असेल त्याला. रक्तक्षयानें पछाडलेल्या माणसाला बदामपिस्त्यांचा काय उपयोग? राष्ट्रीय उत्कर्षाच्या कामीं हा दृष्टांत पुरेपूर लागू पडतो. फेडरेशन ही मूळ राज्यघटना कितीहि चागली असली आणि हिंदुस्थानची परिस्थिती या राज्यघटनेच्या अंमलबजावणीस कितीहि अनकूल असली तरी जोंवर पारतंत्र्याच्या दुर्धर रोगानें हिंदुस्थानचें रक्तशोषण चालविलें आहे तोंपर्यंत या फेडरेशनचा कांहीं उपयोग नाहीं! नुसतें वसाहतीचें स्वराज्य मिळूनहि कांहीं उपयोग नाहीं. कारण, वसाहतीचें स्वराज्य म्हटलें तरी त्यात साम्राज्यशाहीची भागीदारी येतेच. आणि ही भागीदारी पत्करायची म्हणजे हिंदी प्रगतीच्या मार्गात घातलेली तीं संरक्षक बंधनें, ते जादा अधिकार, तो साम्राज्य सरकारचा सर्व खात्यांत होणारा सासुरवास सोसला पाहिजे. ऑस्ट्रेलियांत वसाहतीचें स्वराज्य आहे. फेडरेशनच्या धर्तीवर राज्यघटनाहि आहे तेथें. पण प्रांतांचे (उपराष्ट्राचे) गव्हर्नर्स हे साम्राज्य सरकारच्या हुकमतीखालीं येतात आणि त्यांना आपल्या फेडरेशनच्या अधिपतीची (गव्हर्नर-जनरलची) आज्ञा धाब्यावर बसविता येते!

एका राष्ट्रांत अशा दोन सत्ता निर्माण करून साम्राज्यसरकारनें त्या घटनेंत आपली पकड भक्कम करून ठेवली आहे. हिंदुस्थाननें आजच्या परतंत्र स्थितींत फेडरेशन स्वीकारायचें म्हणजे आपण होऊन आपल्या प्रगतीच्या मर्यादा ठरवून घेण्यासारखें आहे!

गांधीजी, नेहरू इ० राष्ट्रीय पुढाऱ्यांनीं पूर्ण स्वातंत्र्याचा हट्ट जो धरला तो एवढ्यासाठींच. १९३५ चा कायदा राबविण्याऐवजीं तो मोडून त्या जागीं घटनासमितीच्या साह्यानें नवी राज्यघटना स्थापन करण्याचा संकल्प काँग्रेसनें सोडला आहे. ही राज्यघटना फेडरेशन स्वरूपाची असली तरी प्रत्यवाय नाहीं, किंवा असली तर चांगलेंच असेंच म्हटलें पाहिजे. माणसांनीं समुदाय करून रहतांना एकमेकांचें हित पहावें व त्याकरितां स्वतःचा थोडा थोडा स्वार्थ सोडावा ही कल्पना आपणांला पटते. प्रांतांनींहि राष्ट्र म्हणून बलिष्ट होण्यासाठीं सहकार्य व त्यासाठीं थोडाफार स्वार्थत्याग करणें हा याच कल्पनेचा विकास आहे. यालाच खऱ्या अर्थानें फेडरेशन म्हणतात. आगगाड्या, टेलिफोन, तारायंत्र, रेडिओ, आगबोटी, विमानें इ० वेगवान् साधनांनीं दूरदूरचे देशसुद्धां आज जवळ येत आहेत. उपराष्ट्रांनीं किंवा प्रांतांनीं आपलें राष्ट्र बनवावें हे प्रयोग यशस्वी झाले आहेत. तेव्हां जगातल्या मोटमोठ्या राष्ट्रांनीं देखील एक 'जागतिक फेडरेशन' बनविलें पाहिजे असें तत्त्वज्ञ सांगूं लागले आहेत. व्यक्तिप्रेमाची परिणती जशी राष्ट्रप्रेमांत झाली तशी राष्ट्रप्रेमाची प्रगति 'जागतिक फेडरेशन' या भव्य ध्येयाच्या दिशेनें व्हावी असें हे तत्त्वज्ञ आग्रहानें उपदेशितात. हा कांहीं केवळ अशक्य कोटींतला ध्येयवाद नाहीं. पण ती गोष्ट पुढली आहे. आज राष्ट्रीय पातळीवर फेडरेशनचा विचार करतांना स्वातंत्र्य आणि फेडरेशन यांची सांगड घालण्याच्या प्रयत्नांत कुठलीहि तडजोड आपण करतां कामां नये एवढेंच निश्चित धोरण म्हणून पत्करा असेंच मी सांगेन.

---

# चालू युद्ध : : ११

चालू युद्ध हा विषय फार उग्र आणि विराट् स्वरूपाचा आहे. भगवान श्रीकृष्णाचें विराट् स्वरूप पाहाण्याकरितां अर्जुनाला श्रीकृष्णाकडून अगोदर दिव्यदृष्टि मिळवावी लागली असें आपण भगवद्गीतेंत वाचतों. आजच्या या जगड्व्याळ युद्धाचें नीट दर्शन घेतां यावें म्हणून अगोदर अशी ज्ञानाची दृष्टि घ्यावी लागेल. हो! भगवद्गीतेंतील या अद्भुत घटनेच्या दृष्टांतावरून आणखी एक साम्य सुचलें! श्रीकृष्णाच्या त्या विराट् मुखमंडळांत भयंकर विनाश चाललेला दिसत होता! मोठाले मानव समुदाय आपापल्या वैभवांसह त्या महापुरुषाच्या दाढांखालीं रगडले जातांना दिसत होते. "मी सर्व भक्षक काळ आहें आणि लोकांचा संहार करण्याकरितां येथें आलों आहें." असें श्रीकृष्णानेंच त्यावेळीं आपल्या तोंडानें सांगितलें! आजचें युद्ध म्हणजे संहारक शक्तीनें माजविलेला असाच प्रलय नाहीं का?

१९१४ सालच्या युद्धाला महायुद्ध (Great War) म्हणतात. मनुष्याच्या ज्ञात इतिहासांत एवढी मोठी लढाई त्या काळपर्यंत झाली नव्हती म्हणून त्या लढाईला हें नांव मिळालें. सध्या चालू असलेली लढाई ही त्या महायुद्धापेक्षां अनेक पटींनीं मोठी आहे. मनुष्याच्या क्रूर कल्पनेनें संहारक साधनें इतकीं सुधारलेलीं आहेत कीं पूर्वीं एक वर्षांत जेवढी हानि करतां येत नसेल तेवढी आतां एका आठवड्यांत करणें शक्य होतें! पूर्वींची लढाई पश्चिम युरोप व मध्यपूर्व याच ठिकाणीं काय ती विशेष लढविली गेली. बाकी

सारें जग साधारणपणें शांततेचें क्षेत्रच होतें असें म्हणण्यास हरकत नाहीं. सध्यांच्या लढाईची व्याप्ति साऱ्या भूगोलावर पसरली आहे. बॉंबहल्ल्याचा इशारा केव्हां कुठे मिळेल, आपली सारी चीजवस्तु सोडून केव्हां कोठून जीव घेऊन पळावें लागेल याचा नेम राहिलेला नाहीं. भूगोलावरील कुठलेंहि ठिकाण सुरक्षित राहिलेलें नाहीं म्हणूनच हें 'अखिल भौगोलिक युद्ध' ( Global War ) आहे असें अमेरिकेचे अध्यक्ष प्रे. रुझवेल्ट यांनीं या युद्धाचें सार्थ वर्णन केलें आहे.

पण केवळ तुलनेपुरतेंच मागलें महायुद्ध मी चर्चेला घेतलें असें मात्र नाहीं. दक्षिण आफ्रिकेचे मुख्य प्रधान फील्ड मार्शल जनरल स्मट्स् यांचें नांव तुम्हीं ऐकलें असेल. ऐशींच्या घरांत असलेले मुरब्बी मुत्सद्दी आणि रणपंडित असे गृहस्थ आहेत हे. यांनीं एकदां जाहीर रीतीनें बोलतांना असे उद्गार काढले कीं, "प्रस्तुतचें युद्ध म्हणजे मागल्या महायुद्धाचीच पुरवणी आहे." स्मट्स्साहेबांच्या या उद्गारांत फार मोठें तथ्य आहे. मागलें महायुद्ध संपवितांना ज्या चुक्या राहून गेल्या त्यामुळेंच आजचें हें जागतिक युद्ध पेटलें! म्हणजे या युद्धाच्या ठिणग्या मागल्या महायुद्धाच्या शेवटीं डागलेल्या तोफांनींच टाकल्या होत्या. जरा फुंकर घातली जातांच या ठिणग्यांनीं पेट घेतला आणि आज त्यांच्या ज्वाळांनीं सारें जग होरपळून निघत आहे! म्हणून मागील युद्धाच्या शेवटीं पडलेल्या या ठिणग्यांचा व त्यांना पेट घ्यायला कोणतीं कारणें झालीं त्यांचा छडा बारकाईनें आपण घेतला पाहिजे.

इंग्लंड आणि जर्मन यांच्यात लागलेल्या चढाओढीमुळें मागलें युद्ध उद्भवलें. युरोपांत अग्रपूजेचा मान कोणाचा याचा निर्णय लावून घेण्यासाठींच तें लढलें गेलें. महायुद्ध लढलें गेलें तथापि त्यावेळीं पहिला धोंडा जर्मनीनें टाकला आणि बेल्जमसारख्या एका चिमुकल्या राष्ट्राच्या स्वातंत्र्यावर प्रथम नांगर फिरविला हें कांहीं खोटें नाहीं! जगाचें विशेषतः अमेरिकेचें लोकमत आपणांकडे ओढून घेण्यास दोस्त राष्ट्रांना ही नामी संधि मिळाली आणि

तिचा त्यांनीं पुरेपुर फायदा घेतला. चार वर्षांच्या घनघोर युद्धानंतर जर्मनी टेकीला आला. जर्मनींतली राजसत्ता मोडली. जर्मनीला अखेर शरण यावें लागलें. दोस्तांनीं फ्रान्समध्यें व्हर्साय येथें जर्मनीकडून शरणचिठी लिहून घेतली. हाच तो व्हर्सायचा कुप्रसिद्ध तह होय. सांब नांवाच्या यादवाच्या पोटीं ऋषीच्या शापामुळें एक मुसळ जन्माला आलें आणि अखेर त्यानेंच यादवांच्या बलिष्ठ कुलाचा शेवट केला ! प्रलयकर मुसळाची उपमा व्हर्सायच्या तहाला ठीक शोभेल. व्हर्सायच्या तहानें जर्मन राष्ट्राला खची करण्याची निष्ठुर योजना केली. पण याच निष्ठुर योजनेचीं चक्रें फिरूं लागताच युरोपमधील आधींच तापदायक होऊन बसलेले संघर्ष विकोपाला गेले! त्याचा परिणाम म्हणजे आतां चालू असलेलें "युद्धपर्व" होय!

पण अगोदर आपणांला या "युद्धपर्वा" पूर्वीचें "उद्योग पर्व" पाहावें आहे. गेलें महायुद्ध संपल्यानंतर कांहीं सात्त्विक थोर पुरुषांना युद्ध ही मानवजातीवरील फार मोठी आपत्ति आहे आणि माणसाच्या रानटीपणाचा हा अवशेष ज्ञानाच्या आजच्या युगांत नष्ट केला पाहिजे असें वाटूं लागलें. अमेरिकेचे अध्यक्ष प्रे. विल्सन हे अशा दयाशील वृत्तीच्या नेत्यांचे अग्रणी होत. 'राष्ट्रसंघा'ची मूळ कल्पना त्यांचीच. राष्ट्रांनीं आपापसांत भांडत न बसता सहकार्यानें व लवादपद्धतीनें आपलीं गाऱ्हाणीं दूर करावींत यासाठीं 'राष्ट्रसंघ' ( League of Nations ) ही संस्था अस्तित्वांत आली. आपली राष्ट्रवादाची कल्पना जगांतील सर्व राष्ट्रांपैकीं आपण एक आहोंत अशा भावनेनें वाढत गेली पाहिजे, असें जें मीं मागल्या वेळीं 'फेडरेशन'ची चर्चा करताना सांगितलें त्याचें रहस्य 'राष्ट्रसंघांत'त तुम्हांला अधिक स्पष्ट होईल. इंग्लंडमध्यें सेसिलसारखे जे शांतिवादी ( pascifist) होते त्यांनीं राष्ट्रसंघाची कल्पना उचलून धरली. इतकेंच नव्हे तर असें स्पष्ट सांगितलें कीं "संस्कृतीनें जर शस्त्रास्त्रांचा नाश केला नाहीं, तर शस्त्रास्त्रेंच संस्कृतीचा नाश करतील." या भविष्यवाणीचे पडसाद सर्वत्र उमटले. निःशस्त्रीकरणाच्या

योजना सुरू झाल्या. राष्ट्रसंघ जगाच्या शाश्वत शांततेचा पाया घालणार असें वाटूं लागलें. वेल्ससारखे विचारवंत संतुष्ट झाले, आणि म्हणूं लागले "राष्ट्रसंघ हा जगाच्या शाश्वत शांतीचा राहण्याचा राजवाडा नसला तरी तिचा तो सोईस्कर पोस्टाचा पत्ता आहे." दुर्दैवानें पाश्चात्य शांतिवाद्यांची ही सात्त्विक श्रद्धा कधींच फलद्रूप झाली नाहीं !! संस्कृति शस्त्रास्त्रांचा नाश मुळींच करूं शकली नाहीं आणि शाश्वत शांतीला गांजलेल्या राष्ट्रांनीं या सोईस्कर (!) पत्यावर पाठविलेलीं पत्रें तिला कधीं पोंचलींच नाहींत !!

याला कारण काय असें साहजिक तुम्ही विचाराल. दोस्तांच्या क्लेमेंको, लॉईड जॉर्ज यांच्यासारख्या अरेरावी मुत्सद्यांनीं जी सूडाची वृत्ति दाखविली ती दाखविली नसती तर कदाचित् हें आजचें "युद्धपर्व" सुरुहि झालें नसतें. "जर्मनीनें शेंकडों कोटी खंडणी दोस्तांना द्यावी. जर्मनीनें आपलीं शस्त्रास्त्रें उत्तर समुद्रांत बुडवून टाकावींत, युद्धाला जबाबदार असलेले रणनेते आमच्या हवालीं करावेत..." अशा असह्य व अपमानास्पद अटी जर्मनीवर लादून इंग्लंड व फ्रान्स यांच्या त्यावेळच्या मुत्सद्यांनीं जर्मनीची मानखंडना व हानि जेवढी होईल तेवढी करण्याचा उद्योग व्हर्सायि येथें केला! साधुशील विल्सन या भयंकर प्रकाराला कंटाळले आणि युरोपच्या राजकारणांतून त्यांनीं अंग काढून घेतलें! व्हर्सायच्या तहाचें शल्य जर्मन राष्ट्राच्या मनांत किती सलत होतें याचें प्रत्यंतर एकाच गोष्टीवरुन तुम्हांला कळेल. हिटलरनें 'न भूतो न भविष्यति' अशी हुकूमशाही गाजविली, अनन्वित अत्याचार केले; पण "मी व्हर्सायचा तह फाडून त्याचे तुकडे करणार आहें" एवढें आश्वासन तो वारंवार उच्चारी आणि जर्मन जनता त्या आश्वासनानें संतुष्ट होऊन त्याच्या सर्व हिंस्र दांडगाईकडे कानाडोळा करी. "माझा लढा" (My Struggle) या आपल्या आत्मचरित्रांत हिटलरनें व्हर्सायचा तह पायाखालीं तुडविणें हें आपलें पवित्र जीवनकार्य आहे असा उल्लेख केलेला

आहे. व्हर्सायच्या तहानें जर्मन राष्ट्राच्या दुखावलेल्या स्वाभिमानाला आवाहन करून हिटलरनें आपली सत्ता वाढविली.

व्हर्सायच्या तहाप्रमाणें जर्मनीच्या कांठावरील बराच मुलूख हीं ना तीं कारणें पुढें करून शेजारच्या राष्ट्रांत दोस्तांनीं घुसडून दिला! आपण जर्मन गरुडाचे पंख कापले या मस्तींत दोस्त राहिले. पण ही त्यांची मस्ती पुढें अनुभवानें अनाठायीं ठरली! आस्ट्रिया, झेकोस्लोव्हाकिया, पोलंड, फ्रान्स इ॰ ज्या ज्या देशांत जर्मनीचे तुकडे कोंबण्यांत आले होते त्या त्या देशांत या तुकड्यांतल्या जर्मन लोकांनीं कारवाया आरंभिल्या. आस्ट्रियांत सेसिनक्वार्ट, झेकोस्लोव्हाकियांत हेनेलिन या जर्मन पुढाऱ्यांनीं आपापला गट संघटित करून तेथील सरकारांना छळण्यास सुरुवात केली.

जर्मनीवर करांचें जबरदस्त ओझें लादताना आपली सूडाची भावना तृप्त झाल्याचा आनंद दोस्तांना होत होता हें खरें. पण हा आनंद अल्पायुषी ठरणार हें त्यांच्या ध्यानीं आलें नाहीं किंवा पटवून घेण्याचा त्यांनीं प्रयत्न केला नाहीं असें म्हणणें अधिक युक्त होईल. कारण कीन्ससारखे नामांकित अर्थशास्त्रज्ञ ब्रिटिश व फ्रेंच सरकारांना कठरवानें सांगत होते कीं, 'जर्मनी दिवाळखोर झाला तर तें तुमच्या व्यापाराला हानिकारक होईल. म्हणून कर्जाची माफी द्या' कीन्ससाहेबांचा युक्तिवाद अगम्य किंवा ध्येयवादी स्वरूपाचा होता असें नाहीं. आपणांला ज्याच्याकडून ऋण यायचें असतें त्याचा व्यवसाय बरा चालला असेल तरच तो आपणांला हप्ते देऊं शकेल. त्याचा धंदा जर आपण साफ बुडवून टाकला तर तो कसा भर करील हें उघड आहे! दोस्तांना द्यायच्या कर्जाचे हप्ते भरणें जर्मनीला अशक्य होऊं लागलें. कारण युद्धांत व्यापार बसलेला आणि युद्धानंतर उत्पादनाचें तितकेंसें सामर्थ्य नाहीं! शिवाय युरोपमधील जर्मनीचा बराच प्रदेश आणि आफ्रिकेंतल्या वसाहती दोस्तांनीं हिसकावून घेतलेल्या! जर्मनीकडून कर्जाचे हप्ते मिळविण्याची अशक्यता दिसू लागल्यामुळे त्या हप्त्यावर अवलंबून

असलेले दोस्तांचे आर्थिक व्यवहार अर्थातच डळमळीत झाले आणि जगाच्या एकंदर अर्थव्यवहारांतच अनर्थ होऊं लागले । या वेळी जर्मनींत हर स्ट्रेसमान हे चतुर मुत्सद्दी राजकारणाचीं व अर्थकारणाचीं सूत्रें हालवीत होते. जर्मन हे कल्पक, कष्टाळू, कडवे राष्ट्रवादी, आणि संघटित असे लोक आहेत. स्ट्रेसमाननीं या राष्ट्रीय गुणांच उपयोग बेमालुम तऱ्हेनें करून जर्मनीचें सामर्थ्य, वाढविण्यास आरंभ केला. पुढें नाझी पक्षानें तर जर्मनी पुनः पूर्वीइतका–नव्हे त्याहून फार मोठ्या प्रमाणावर बलिष्ठ व्हावा–यासाठीं सर्व राष्ट्रीय जीवनच यांत्रिक स्थितींत आणण्यास सुरुवात केली. ज्या पदार्थांसाठीं बाहेरच्या राष्ट्रांवर अवलंबून राहावें लागतें त्या पदार्थांच्या सारखे तोडीस तोड असे ( कृत्रिम रबर, तेल वगैरे ) पदार्थ देशांत तयार करावयाचे, कांहीं कच्चा माल तटस्थ राष्ट्रांच्या द्वारें देशांत आणावयाचा, आणि शेजारच्या राष्ट्रांशीं कधीं व्यापार करून तर कधीं दांडगाईनें युद्धोपयोगी साहित्य साठवून ठेवायचें । दोस्तांनीं जर्मनीची जी चौफेर नाकेबंदी केली होती तिला अशा युक्तियुक्तींनें जर्मनी शह देऊं लागला.

इटलींत मुसोलिनीनें फॅसिस्ट पंथ काढला आणि त्याचेंच अनुकरण करून हिटलरनें जर्मनींत नाझी पक्षाची स्थापना केली. युरोपांत हुकूमशाही वृत्ति वाढीला लागली. जर्मन लोक हे शूर व विभूतिपूजक असल्यानें व तो देशहि मोठा व संपन्न असल्यानें जर्मनींत हुकूमशाहीचा जम चांगला बसला. जर्मनवंश हा सर्वांत श्रेष्ठ मानववंश आहे आणि जगावर त्याचेंच प्रभुत्व असावें अशी ईश्वराची इच्छा आहे असा नाझी पुढारी वहाणा करूं लागले. जर्मनींत महायुद्धानंतर समाजवाद प्रस्थापित व्हायला अत्यंत अनुकूल अशी संधि होती. पण कम्युनिस्टांच्या नेहमींच्या आत्मघातकी धोरणास अनुसरून त्यांनीं समता स्थापणाऱ्या गटाविरुद्ध नाझींनाच मदत केली ! ! याबद्दलची कृतज्ञता हिटलरनें नाझी पद्धतीनें व्यक्त केली । अधिकारपदावर येतांच हजारों कम्युनिस्टांची त्यानें निर्दयपणें कत्तल केली ! ! असो. हिटलरसारखा समाजवादाचा

कणखर शत्रु आपणांला पाठीराखा मिळाला यामुळें युरोपीय भांडवलशाही प्रफुल्लित झाली. महायुद्धानें डळमळीत केलेलें आसन पुनः स्थिर करूं अशी तिला उमेद आली आणि तिनें मोकळ्या मुठीनें हिटलरला गुप्त मदत करण्यास सुरुवात केली. हळूंहळूं व्हर्सायच्या तहांतलें एक एक कलम मोडून जर्मनी उघड आणि गुप्त रीतीनें प्रचंड प्रमाणावर युद्धविषयक सामानाचें व शस्त्रास्त्रांचें उत्पादन करूं लागला. निःशस्त्रीकरणाच्या योजनेला त्यानें हरताळ फासला. 'राष्ट्रसघा'चा सामोपचाराचा मार्ग सोडून दिला. या कामीं इटलीची मदत व प्रोत्साहन त्याला होतेंच.

दुर्दैवानें इंग्लंडचें राजकरण सुखासीन, विनचढाईखोर भांडवलवाल्या कंपूच्या हातीं होतें. हिटलर व्हर्सायच्या तहाची एकामागून एक कलमें मोडीत चालला आहे हें दिसत असूनहि इंग्लिश सरकारनें त्याला आळा घालण्याचा प्रयत्न केला नाहीं! फ्रान्स व विशेषतः रशिया यांच्यावर दडपण राहावें म्हणून जर्मनीच्या बेशिस्त दांडगाईला इंग्लंडनें फूसच दिली असें म्हणावें लागतें. रशिया समाजवादी म्हणून त्याच्याशीं संधि करायचा नाहीं आणि युरोपांत गुंतलेलें आपलें प्रचंड भांडवल सुरक्षित राहावें यासाठीं जर्मनांशीं झगडा करायचा नाहीं अशी इंग्लंडच्या भांडवलवाल्या प्रधानांनीं वृत्ति ठेवली! इंग्लंडसारखें पहिल्या दर्जाचें राष्ट्र आपल्या धुंडाईचा प्रतिकार करीत नाहीं यामुळें जर्मनी अधिकच चढेल झाला.

युरोपांत हुकूमशाही फोफावत आहे, तिची शक्ति वेळींच खची केली पाहिजे असें छातीठोकपणें सांगणारा इंग्लंडमध्यें एक गट होता. जहाल मजूर किंवा क्रांतिकारक साम्यवादी तर हें म्हणतच असत. पण इंग्लंडांत हा जो नाझी–द्वेष्टा गट होता तो कट्टया हुजूर पक्षीयांतला होता हें विशेष. चर्चिल, एडन, वगैरे जे प्रधानमंडळ अधिकारावर होते तो हा गट होय. "हिटलर आणि मुसोलिनी यांच्या राक्षसी महत्त्वाकांक्षेला वेळींच पायबंद घाला. हे आपल्यावर व जगावर मोठें संकट आणणार आहेत." अशी

ओरड चर्चिल पार्लमेंटांत नेहमीच्या दांडपणानें करीत. पण चेंबर्लेनप्रभृति सुखासीन व समेटवादी पुढाऱ्यांनीं त्यांची उपेक्षा केली. पुढें जेव्हां इटलीनें अॅबिसीनियावर स्वारी केली तेव्हां 'राष्ट्रसंघा' च्या मदतीनें एडननीं इटली-विरुद्ध दंडयोजना करण्याची शिकस्त केली. इटालीयन् व जर्मन वृत्तपत्रांनीं 'रास एडन' म्हणून खुनशीपणानें एडनसाहेबाचीं व्यंगचित्रें काढलीं होतीं! ('रास' म्हणजे अबिसीनियांतील हबशी सरदार. एडनचें अबिसीनियाबद्दलच प्रेम इतकें पराकोटीला गेलें आहे कीं ते आतां हबसाणात सरदार होऊन इटलीशीं लढतील अशी हुकूमशाही वृत्तपत्रांनीं एडनची चेष्टा केली!) पण चर्चिल-एडनचे फॅसिस्ट-नाझी यांच्या विरुद्ध आपल्या राष्ट्राला उठविण्याचे प्रयत्न निष्फळ ठरले आणि चेंबर्लेनसाहेब हिटलरच्या अधिकाधिक आहारीं जाऊं लागले. अखेर जर्मनींतील म्युनिच शहरीं जातीनें जाऊन त्यांनीं झेको-स्लोव्हाकियाची चिरफाड करण्याचा करार हिटलरपुढें लोटांगण घालून केला!! तात्पुरतें युद्ध टळलें खरें. पण इंग्लंडसारख्या पहिल्या प्रतीच्या राष्ट्राची ही शरणागती खुद्द इंग्लंडांत व बाहेरील जगात कडक शब्दांनीं निषेधली गेली! बरें चेंबर्लेनच्या या मेणचट धोरणानें युद्ध होण्याचें तरी टळलें कां? छे. कोणाच्या ध्यानीमनीं नसतां १ सप्टेंबर १९३९ रोजीं हिटलरनें पोलंडवर हल्ला केला आणि ता. ३ सप्टेंबर रोजीं जर्मनीविरुद्ध युद्ध पुकारल्याची घोषणा इंग्लंड व फ्रान्स यांना करावी लागली!!

गेलें महायुद्ध संपून २ दशकें झालीं असतील तोंच पुनश्च युद्धाचा भयंकर वणवा पेटला! हा वणवा पेटण्यापूर्वी युरोपांत काय काय होत होतें हें मी थोडक्यांत सांगितलें. हिटलरनें अकल्पितपणें लढाईस आरंभ केला आणि विद्युद्वेगानें प्रदेश जिंकण्यास सुरवात केली. या वादळी लढाई-लाच "ब्लीट्स क्रिग्" असें म्हणतात. हिटलरनें आपलें वैमानिक सामर्थ्य अपरंपार वाढवून ठेवलें होतें. विमानांतून छत्र्यांच्या (पॅराशूटस्) साह्यानें आपलीं दळें जमिनीवर उतरावयाचीं व खालीं रणगाडे, चिलखती मोटारी

यांनीं सज्ज असलेल्या पलटणी जलदीनें आंत घुसवावयाच्या अशा झपाट्यानें हिटलर चालून जाई. वारकींसारखीं राष्ट्रें अगोदर चढाईच्या वार्तेनेंच घाबरलेलीं असत. पुनः या देशांतून हिटलरच्या 'पंचम स्तंभा' नें म्हणजे फितुरी लोकांनीं कित्येक देश अगोदरच पोखरून ठेविलेले असत. अशा चौफेर चढाईनें युरोपांतील एकामागून एक देश नाझींच्या छत्राखालीं येऊं लागले. २७ सप्टेंबर १९३९ ला पोलंडचा बळी हिटलरनें घेतला! ९ एप्रिल १९४० रोजीं डेन्मार्क पडला! २ मे ला नॉर्वे आटोपला. १० मे ला लक्सेम्बर्गनें पांढरें निशाण उभारलें! १५ मेला हॉलंडची गठडी वळली! २८ मे ला बेल्जमनें लोटांगण घातलें! आणि सर्व जगांत शूर व झुंझार ठरलेल्या फ्रान्ससारख्या बलाढ्य राष्ट्रानें १७ जूनला नाझीशाहीपुढें मान वांकविली! एका वर्षाच्या आंत जर्मनीनें केलेल्या या अद्भुत पराक्रमानें जग दिपून गेलें! भल्याभल्यांची तारांबळ उडाली! ग्रीस, रुमानिया ६० देश हिटलरनें याच दमांत पादाक्रांत केले!

इतिहासांत कधीं आली नव्हती एवढी आणीबाणीची वेळ इंग्लंडवर आतां आली! दरम्यानच्या काळांत डंकर्क व नॉर्वे येथें इंग्लंडच्या मोठ्या सैन्याला नाझींच्या तुफानी हल्यापुढें माघार घ्यावी लागली आणि त्यामुळें इंग्लिश लोकमत प्रक्षुब्ध झालें! चेंबर्लेनच्या पराभववादी मनोवृत्तीनें हा अपयशाचा डाग लागला असें लोकांना वाटलें आणि चेंबर्लेन मंत्रीमंडळाला राजिनामा देण्यावांचून गत्यंतर उरलें नाहीं. इंग्लिश राष्ट्राचीं सूत्रें चर्चिलसाहेबांच्या हातीं आलीं. देशांत लढाईची विशेष तयारी नव्हती. युरोपभर अजिंक्य ठरलेल्या जर्मन अक्षौहिणी डोव्हर खाडीच्या पलीकडे म्हणजे २० मैलांवरच्या देशात विजयोन्मादानें येऊन धडकल्या होत्या. अशा वेळीं घाबरलेल्या देशाची भीति घालवून नाझींच्या तुफानी हल्याला धैर्यानें तोंड देण्यासाठीं देशाला चर्चिलनीं उभें केलें. इतकेंच नव्हे, तर चीन, अमेरिका, आणि रशिया असे प्रबळ दोस्त जोडून नाझींचीं जगद्विजयाचीं स्वप्नें पार धुळीला मिळविलीं! इतिहासांत चर्चिलची ही कामगिरी संस्मरणीय ठरेल यांत वाद नाहीं.

इंग्लंडवर आपण बाँबहल्ले केले तर इंग्लंड जेरीला येऊन शरण येईल ही हिटलरला खात्री होती. त्यानें तीन महिने भयंकर अग्नीवर्षाव इंग्लंडवर केला! " अमुक तारखेस मी लंडनमध्यें उतरेन. चर्चिल व बादशहा जार्ज कॅनडांत पळून जातील. " अशा वल्गना हिटलर करीत असे. त्या फोल ठरल्या. एडननीं नागरिक संरक्षण दलासाठीं पांच लाख नागरिक पाहिजेत असें नभोवाणींतून सांगण्यास सुरुवात करतांच तें भाषण संपण्यापूर्वीच पांच लाख इंग्रजांनीं नांवें दाखल केलीं! अशा राष्ट्राचें मनोधैर्य ( Morale ) भंगणें नाझींना शक्यच नव्हतें.

फ्रान्स पडल्याबरोबर चर्चिलसाहेबांनीं पहिली जर कोणती गोष्ट तत्परतेनें केली असेल तर फ्रेंच आरमार इटली व जर्मनी या गट्टी ( Axis ) राष्ट्रांच्या ताब्यांत जायच्या आंत आपल्या हातीं घेतलें. जें हातीं आलें नाहीं तें 'समुद्रास्तुष्यन्तु' करून टाकलें! त्यामुळें गट्टी राष्ट्रांचा मोठाच तोटा झाला. चर्चिलनीं दुसरी गोष्ट अशी केली कीं इटली हें राष्ट्र जर्मनीच्या मानानें बरेंच कच्चें असल्यानें त्याचा प्रथम कांटा काढण्याचें ठरविलें. अॅबिसीनियाचें साम्राज्य इटलीच्या हातून हिसकावून घेऊन त्यावर त्याचा राजा रागतफारी नेऊन बसविला ( ५ मे १९४१ ). यामुळें उत्तर आफ्रिकेंत दोस्त सैन्यांना मोर्चे बांधण्यास मोकळा प्रदेश मिळाला. शिवाय स्वातंत्र्यप्रेमी लोकांच्या मनांत इंग्लंडबद्दल अनुकूल मत होण्यास साह्य झालें. याहून महत्त्वाची गोष्ट चर्चिलनीं साधली. रशियाला इंग्लंडनें इतके दिवस वाळींत टाकलें होतें. पण चर्चिलनीं रशियाशीं सख्य करण्याचें श्रेय संपादिलें. रशिया आणि जर्मनी यांच्यांत जरी अनाक्रमणाचा करार झाला होता तरी त्या दोन राष्ट्रांचीं तत्त्वज्ञानें इतकीं भिन्न होतीं कीं त्यांच्यांत केव्हांतरी कलहाग्नि पेटणार हें निश्चित होतें, आणि झालेंहि तसेंच! २२ जून १९४१ रोजीं पहाटे जर्मनीनें रशियावर स्वारी केली. रशियाचे परराष्ट्रमंत्री मोलोटाव्ह यांनीं नभोवाणीवरून जाहीर केलें कीं, " नेपोलियनची जी दुर्दशा आम्ही मागील शतकांत केली तीच हिटलरची करून टाकूं. "

रशिया युद्धांत पडल्याबरोबर युद्धाचे रंग कांहीं वेगळेच झाले! रशियानें जर्मन सेनासागराला थोपवून धरण्यांत जें अतुल धैर्य व कौशल्य दाखविलें त्याविषयींचें आश्चर्य कित्येक शतकें ओसरणार नाहीं. सुमारें एक हजार मैलांची प्रदीर्घ आघाडी जर्मनीनें उघडलेली. बहुतेक सर्व युरोपचें वैभव नाझींनीं आपल्या दिमतीला जबरदस्तीनें घेतलेलें आणि त्यांतल्यात्यांत अधिक बलवान् ठरलेलीं सैन्यदळें जर्मनीनें रशियांत घुसविलेली. अशा स्थितींत रशियातल्या प्रत्येक नागरिकानें हें आपलें युद्ध आहे, नाझींचा पराभव होण्यांत आपल्या समतावादी तत्त्वज्ञानाचा जय आहे अशा गाढ श्रद्धेनें जर्मनीशीं निकराची झुंज दिली. स्टॅलिनग्राडला १८ महिने पडलेला वेढा आणि त्यावेळीं रशियन लोकांनीं दाखविलेलें शौर्य व सोशिकपणा हें महाकवींना काव्याचे विषय होतील. नीपर नदीचें धरण रशियानें दहा वर्षें अहोरात्र खपून आणि कोट्यावधि रुपये खर्च करून बांधलें होतें. पण रशियानें जर्मनीला कोंडींत धरण्याकरितां त्याला बेडरपणें सुरुंग लावले! जर्मन सैन्याच्या हातीं कांहीं लागूं नये म्हणून जर्मन सैन्य एकाद्या टापूंत शिरण्यापूर्वीच तेथील आपली सारी जिंदगी रशियन सैनिक भस्मसात करीत! यालाच 'दग्ध भू धोरण' (Scorched earth policy) म्हणतात. अनंत क्लेश सोसून व अलोट त्याग करून, जयापजयाच्या चक्रांत न हुरळतां वा न भितां रशियन लोकांनीं जर्मनीचा मोठा आघात आपल्यावर घेतला. त्यामुळें दोस्तांचा विजयाचा मार्ग सुकर झाला.

रशियाप्रमाणेंच अमेरिकेची फारच मोठी मदत इंग्लंडला झाली. वास्तविक युरोपच्या भानगडींत अमेरिका पडत नसे. अमेरिकेनें आपल्या खंडापलीकडे लक्ष देऊं नये, दुसऱ्याचीं भांडणें लढत बसू नये असें एक तत्त्व १८२३ सालीं मन्रो नावाच्या अमेरिकन अध्यक्षानें अमेरिकेच्या राजकारणाशीं जोडून दिलें. "मन्रो तत्त्व" (Manroe Doctrine) म्हणून प्रसिद्ध आहे तें हेंच. या तत्त्वास धरून एक शतकाच्यावर अमेरिकेनें आपलें राजकारण

चालविलें. पण चालू युद्धात अमेरिकेला अलिप्त ठेवणें अमेरिकेचे धुरंधर अध्यक्ष रूझवेल्ट यांना हिताचें वाटेना. आणि याला कारणेंहि तशींच होतीं. रूझवेल्टच्या शब्दांतच तीं मी तुम्हाला सांगतों. ऐका—

"यूरोपांत आणि आशियांत ज्यांनीं युद्ध उकरून काढलें त्यांना आपल्या गोलार्धापर्यंत पसरलेल्या सागरांवर प्रभुत्व न मिळवू देणें ही आपल्या जिव्हाळ्याची गोष्ट आहे."

"नौकानयनाची कला जेव्हां बाल्यावस्थेंत होती तेव्हांइतकी या सागरांची विस्तीर्णता आतां अवघड वाटत नाहीं......न्यू इंग्लंड पासून ब्रिटनपर्यंत जाऊन ( पुनः कोळसा, तेल भरण्याची गरज न पडता ) तडाख्यानें परत येणारीं विमानें निघालीं आहेत. बाँबफेक करणाऱ्या विमानाचा पल्लाहि वाढत आहे."

"नाझी लोक पवित्र हेतूंचा बहाणा करून आपल्या क्रूर कृत्याचें समर्थन करतात ....उदाहरणार्थ, बेल्जमवर हल्ला करतांना त्यांनीं सांगितलें, आम्हीं इंग्लंडपासून तुमचें रक्षण करण्याकरिता तुमचा ताबा घेत आहोत. उद्या हे लोक दक्षिण अमेरिकेला असें सांगायला भितील का कीं, उत्तर अमेरिकेपासून तुमचें संरक्षण करण्यासाठीं आम्हीं तुमच्यावर स्वारी करीत आहोंत."

"हुकूमशहा आपल्यावर तुटून पडायला तयार असतील तर आपण लढाईला सुरवात करण्याची ते वाट पहाणार नाहींत. नॉर्वे, बेल्जम, हॉलंड यांच्याकडून कांहींच कारण घडलें नसतां या हुकूमशहांनीं त्या देशांवर नाहीं का हल्ला केला?"

"लोकशाहीचा दीप प्रज्वलित ठेवणें हें आपलें पवित्र कर्तव्य आहे.... पण नुसती वात सारणें किंवा काच स्वच्छ करणें एवढ्यानें आपलें काम संपलें असें समजूं नका. ज्योत टिकविण्यासाठीं या दिव्याला सतत अधिकाधिक तेलाचा पुरवठा आपण केला पाहिजे."

"आपलें राष्ट्र हें **लोकशाहीचें शस्त्रागार** (arsenal of democracy) झालें पाहिजे."

रूझवेल्टनीं अमेरिकन लोकांना, लोकसभेला आणि वृत्तपत्रांना उद्देशून जीं भाषणें केलीं त्यांतून हे उतारे मीं तुम्हांला वाचून दिले आहेत. यांवरून तुमच्या लक्षात येईल कीं जर्मनी, इटली, व त्यांचा पूर्वेकडील दोस्त जपान हे लोक दगलबाजीनें अमेरिकन् राष्ट्रावर केव्हां घाला घालतील याचा नेम नाहीं अशी रुझवेल्टना भीति होती. ( आणि ही भीति अनाठायीं नव्हती हें लौकरच कळून आलें. कारण इकडे अमेरिकेशीं तहाच्या वाटाघाटी करण्याचें ढोंग करून ७ डिसेंबर १९४१ रोजीं जपाननें अमेरिकेच्या पॅसिफिक महासागरांतील वसाहतीवर हल्ला केला ! )

रूझवेल्टचा ओढा पहिल्यापासून इंग्लंडकडे होता आणि चर्चिलनीहि मनाशीं खूणगांठ बांधून ठेविली होती कीं आतां रूझवेल्टचा कोट घट्ट धरून ठेवण्यांतच आपलें कल्याण आहे. पहिल्या प्रथम इंग्लंडला शस्त्रास्त्रें पुरविण्यापासून रुझवेल्टनीं सहकार्याला सुरुवात केली, आणि हळूंहळूं अमेरिकेचें लोकमत तयार करून अमेरिकेला युद्धांत खेचण्यांत यश मिळविलें. अशा रीतीनें दोस्तांची फळी फार मोठी तयार झाली. जपानला निकराचा सामना देण्यांत चीननें बहादुरी दाखविली. जर्मनीचा वार रशियानें आपल्या कणखर ढालीवर घेतला आणि त्यामुळें इंग्लंड अमेरिका यांना युद्धाची तयारी करण्यासाठीं भरपूर संधि मिळाली. त्याचा उपयोग आज आपण पहातच आहोंत. उत्तर आफ्रिकेंत अमेरिकेचे सरसेनापति एसेनहॉवर यानीं इंग्रज व हिंदी सैन्यांच्या साह्यानें जर्मनींचा पाडाव करण्यास सुरुवात केली आहे. आज ना उद्यां युरोपांत रशियानें चेचलेल्या जर्मनीला दोस्तांशीं सामना देणें भाग पडेल हें उघड आहे. इटली तर केव्हांच संपुष्टात आला आहे! जर्मनव्याप्त देशांत जी जनता स्वातंत्र्यासाठीं उत्सुक होऊन बसली आहे. ती योग्य घटका येतांच दोस्तांचीं सांथ करणारच. उत्तर आफ्रिकेंत डार्लो, जिरॉं प्रभृति फ्रेंच नेत्यांनीं

अनुकूल काल येतांच नाझींचें जोखड झुगारून दिलें हें आपण पाहतोंच आहोंत. हें सर्व स्पष्ट दिसत असतां युरोपांत दोस्त विजयी होणार हें सांगणें म्हणजे कांहीं अवास्तव आशावाद थोडाच आहे! आतां पूर्वेकडील स्थिति मात्र जरा बिकट होती. सिंगापूर, हाँगकाँग, मलाया, सयाम, ब्रह्मदेश, फिलिपाईन्स हीं सर्व महत्त्वाचीं क्षेत्रें व देश जपाननें तडाखेबंद मारा करून अल्पावधींत गिळंकृत केले. 'पिवळ्या' हुकूमशहाला ते परत द्यायला लावणें फार कठीण होऊन बसलें. परंतु चीनचा प्रतिकार थंडवला नाहीं. आणि युरोपांतील लढाई संपल्यानंतर दोस्तांचा रिकामा झालेला अफाट दलभार जेव्हां जपानवर चालून गेला तेव्हां जपानी बेटांतील भूकंपाच्या धक्क्याप्रमाणें जपानी सैन्याला हादरा बसला.

"भीषण जुलूमशाहीचा निःपात करण्यासाठीं, मानवी कृष्णकृत्यांची आजवरची अत्यंत काळीकुट्ट यादीहि ज्यापुढें फिकी ठरावी अशीं कृष्णकृत्यें करणाऱ्या सैतानशाहीला मूठमाती देण्यासाठीं, अखंड, अविरत लढत राहणें, हाच आमचा कार्यक्रम!"

मुख्य प्रधान होतांच तीनचार दिवसांनींच पार्लमेंटला उद्देशून चर्चिलसाहेबांनीं जें पहिलें भाषण केलें (१४ मे १९४०) त्यांत त्यांनीं वरील उद्गार काढले होते. *या उद्गाराला प्रत्यक्ष कृतीचें पाठबळ त्यांनीं त्यापुढें* सतत दिलेलें आपण पहात आलों.

मानवजातीच्या इतिहासांतील रोमांचकारी 'युद्धपर्वा' चें हें स्थूल वर्णन मीं आतांपर्यंत दिलें. हें युद्ध आतां बंद झालें. कोणी म्हणत तें दीर्घकाल चालेल, पण ध्यानीं मनीं नसतां तें बंद होईल असेंहि कोणी म्हणत. लौकर बंद होईल असें म्हणणारांच्या तोंडांत खरोखरीच साखर पडली आहे. या युद्धाचा आपल्या देशावर काय परिणाम झाला आणि आपल्या देशांतील प्रमुख राजकीय पक्षांनीं या "युद्धपर्वा" वर कोणकोणतीं भाष्यें केलीं याचा विचार केल्याखेरीज वरील ऊहापोहाची सांगता कशी होईल?

१९३९ सालच्या सप्टेंबराचे आरंभीं इंग्लंडच्या बादशहांनीं जर्मनी व व त्याचे साथीदार यांच्याविरुद्ध युद्ध पुकारतांच हिंदुस्थानच्या व्हाईसरॉयनींहि हिंदुस्थान युद्धांत पडल्याची घोषणा केली ! वास्तविक इतर स्वतंत्र देशात आपला देश युद्धयमान व्हावा कीं नाहीं यासंबंधीं लोकसभेचें मत अजमाविण्याची रीत आहे. हिंदुस्थान सरकारला याची गरज वाटली नाहीं ! त्यावेळीं ७-८ प्रांतांत अधिकारपदावर असलेल्या मंत्रीमंडळांनीं जो एकदम अधिकारसंन्यास केला त्याला हेंच प्रमुख कारण झालें. हिंदुस्थानच्या लोकमताला कौल न लावतां हिंदुस्थानला सरकारनें युद्धांत खेचलें हा राष्ट्राचा अपमान होय असें कॉंग्रेसचें म्हणणें होतें.

कॉंग्रेसच्या भूमिकेचें स्पष्टीकरण मग आणखी करीनच. आगोदर हिंदुस्थानांतल्या इतर मवाळ जहाल पक्षांनीं काय भूमिका घेतली ती पाहूं. ती फार थोडक्यांत सांगतां येण्यासारखी आहे. 'युद्धसहकार्य' हेंच त्या भूमिकेचें तत्त्व. ( यांतून मुस्लिम लीग मात्र वगळायची ! तिचा उल्लेख पुढें येईलच.) पण हें युद्धसहकार्य करतांना प्रत्येक पक्षानें आपापल्या भूमिकेला कांहीं ना कांहीं ध्येयवादाचें अस्तर लावलें. या साऱ्या भूमिका त्याच्या अस्तरासह मी तुमच्यापुढें मांडतों. पहा त्यावरून तुम्हांस काय पटतें तें.

ब्रिटिशांच्या संगिनींवर ज्याचें सौभाग्य अवलंबून आहे त्या संस्थानिकांनीं युद्धकार्यांत चढाओढीनें भाग घ्यावा हें साहजिकच आहे. नेमस्ताचा सरकारच्या चांगुलपणावर अद्यापि थोडाफार विश्वास असल्यानें सरकारशी त्यांनीं अर्थात् सहकार्य केलें. मात्र सरकारनें सैन्याच्या हिंदीकरणास चालविलेल्या दिरंगाईची ते वेळोवेळीं हजेरी घेत. सरकारच्या कृपाछत्राखालीं असलेल्या वतनदार वर्गाला युद्धकार्याला साह्य करणें क्रमप्राप्तच होतें. कॉंग्रेसशासित प्रांतांच्या बाहेरील प्रांतांतल्या मंत्रीमंडळांनीं युद्धसहकार्याचें धोरण ठेवून आपापलीं आसनें स्थिर केलीं. यांपैकीं सर अल्लाबक्ष, डॉ. शामाप्रसाद मुकर्जी, मि.

फझलूल हक्क अशा ज्या तडफदार नेत्यांनी या नाहीं त्या कारणांनीं सरकारच्या युद्धकार्यविषयाशीं मतभेद दाखविले त्यांना पदभ्रष्ट व्हावें लागलें ? '

हिंदुमहासभा ही एक प्रमुख राजकीय संस्था. हिनें नक्की कोणतें धोरण स्वीकारलें हें जाणण्याविषयीं तुम्हीं उत्सुक असाल. साम्राज्यशाहीशीं सहकार्य करण्याचें राजकारण महासभेंत पुष्कळ वर्षे शिजत होतें. महासभेचे एक माननीय पुढारी भाई परमानंद जाहीर रीतीनें म्हणाले कीं, " ब्रिटिश सरकारशीं जर आपण सहकार्य केलें तर आपणा हिंदूंना मोठ्या प्रमाणांत राजकीय हक्क मिळतील असें माझ्या अंतरात्म्यास वाटतें. " ही परमानंदी घोषणा प्रत्यक्ष व्यवहारात उतरविण्याचा मोठा प्रयत्न स्वातंत्र्यवीर सावरकरांनीं युद्ध-सहकार्याचे कामीं केला. " राजकारण हिंदुमय करा आणि हिंदुत्त्वाचें सैनिकीकरण करा. " असें सावरकरानीं आपल्या प्रभावशाली वक्तृत्वानें गर्जून सांगण्यास सुरवात केली. प्रस्तुतचें युद्ध हें लोकशाही युद्ध आहे असें सावरकरांनीं कधींच म्हटलें नाहीं. युद्धें हीं स्वार्थाकरितांच लढलीं जातात. म्हणून स्वार्थाच्या बाजारांत, संधि आलीच आहे तर आपणहि स्वार्थाची कमाई कां करूं नये असें सावरकरांनीं सांगायला सुरवात केली. थोडे फार तरी लष्करी शिक्षण मिळण्याचा हा मोका अनायासें आला त्याचा फायदा हिंदु जनतेनें पुरेपुर घ्यावा; आज घेतलेलें हें लष्करी शिक्षण उद्यां स्वातंत्र्यसंपादनासाठीं आणि संरक्षणासाठीं आपणांला खासच उपयोगीं पडेल. म्हणून 'सैन्यांत शिरा' असा आदेश स्वातंत्र्यवीरांनीं हिंदूंना दिला. शिवाय आज आपण असहकार केला तर 'अहिंदु' सैन्यात घुसतील आणि या युद्धानें मिळालेला यदा ते लुटतील ही भीति होतीच ! सावरकरांनीं दिलेला मंत्र महासभेनें कृतींत आणला. जागोजाग 'हिंदु-सैनिकीकरण मंडळें' स्थापण्यांत आलीं. ए. आर. पी. पासून युद्धनिधि जमविण्यापर्यंत हिंदुत्वनिष्ठ नेते अंग मोडून झटूं लागले.

सावरकरांच्या या प्रामाणिक व व्यवहारी भूमिकेशीं कुणाचा मतभेद झाला तरी विसंगति तरी त्यांत कुणालाहि खास काढतां येणार नाहीं. जिनासाहेब व त्यांची मुस्लिम लीग यांची तऱ्हा कांहीं निराळीच. " आमचा पाकिस्तानचा हक्क मान्य करा नाहींतर आम्हीं युद्धसहकार्य करणार नाहीं." असें जिना ओरडून सांगत. इकडे मात्र मुस्लिम लीगच्या पखाखालील प्रांतोप्रांतींचे मुस्लिम प्रधान, पुढारी, संस्थानिक सर्वजण खुशाल संरक्षणमंडळावर जागा पत्करीत होते, युद्धनिधि जमवीत होते, आणि मुसलमान रंगरूट सरकारला मिळवून देत होते! एखाद्या मुस्लिम पुढाऱ्यानें सरकारशीं सहकार्य केलें तर क्वचित् त्यावर शिस्तभंगाबद्दल इलाज केला जाई! पण असे प्रकार थोडेच. ज्या मर. सर शिकंदर हयातखानना मुस्लिम लीगमध्यें मानाचें स्थान होतें त्यांनीं सरकारला लष्करभरतींत जास्तींत जास्त मदत केली!! हिंदुस्थान सरकारला मुस्लिम लीगच्या पुढाऱ्यांचें अवसान ठाऊक असल्यानें युद्ध-विरोधी प्रचार करणाऱ्या लीग पुढाऱ्याची सरकारनें जवळ जवळ उपेक्षाच केली! जगावर पराक्रमी ठरलेला ब्रिटिश वनराज मोहरममधल्या वाघाला कां म्हणून विचकेल?

हिंदुस्थानांत भाई मानवेन्द्रनाथ रॉय यांचा एक लहानसा अनुयायीवर्ग आहे. स्वतःस जहाल क्रांतिकारक व मार्क्सवादी म्हणविणारा हा पंथ आहे. हा संख्येनें अंगुष्ठमात्र असला तरी विराट् हिंदी बहुजनसमाजाचें खरें कल्याण आपल्याच मार्गानें होणार अशी याला श्रद्धा वाटते. या पक्षानें (म्हणजे भाई रॉयनी) प्रथमच पुकारा केला कीं हें 'लोकयुद्ध' आहे. इंग्लंडांतला बहुजनसमाज जागृत होऊन त्यानें आपल्या सरकारला हुकूम-शाहीशीं निकरानें सामना देण्यास भाग पाडलें आहे. इंग्लंड व त्याचीं दोस्त राष्ट्रें लोकशाहीच्या विजयाकरिता झटत आहेत. म्हणून लोकसत्तेसाठीं उत्कंठित झालेल्या हिंदी राष्ट्रानें कायावाचामनें सरकारला मदत करावी.

कम्युनिस्ट पक्ष हा तर अति क्रांतिकारक पक्ष. पण त्याचीं सर्व चक्रें रशियाच्या राजकारणावर चालायचीं! रशिया युद्धांत पडताच हें साम्राज्य-

शाही युद्ध एकदम लोकयुद्ध झाल्याचा साक्षात्कार या पक्षाला झाला यातले वरच पुढारी त्यावेळीं तुरुंगात होते पक्ष तर सरकारनें बेकायदा ठरविला होता! पण आता आम्ही तुम्हाला युद्धाच कार्मी मदत करण्यास तयार आहोत अशीं बोल्णीं कम्युनिस्ट राजबंद्यांनीं सुरु केली, आणि सरकारनेंहि त्याच्या विनंतीचा अव्हेर न करता कम्युनिस्ट पक्षावरील बंदी काढून घेतली व कम्यु निस्टांना कारामुक्त केलें! त्यानतर आपऱ्या नेहमींच्या तळमळीनें व निरलसपणें कम्युनिस्ट युद्धाचा प्रचार करीत होते ही लढाई पूर्वी कदाचित् दोन साम्राज्यातील असेल पण रशिया तींत पडल्यामुळें लोकशाहीविरुद्ध हुकूम शाही असें विशाल स्वरूप तिला प्राप्त झालें लोकशाहीच्या विजयासर हिंदु-स्थानचें स्वातंत्र्य व लोकसत्ता अवलंबून असल्यान हिंदुस्थाननें दोस्ताच्या पारड्यातच आपलें वजन टाकलें पाहिजे असें कम्युनिस्ट म्हणत

कमी जास्त प्रमाणात युद्धसहकार्य करणारे हे नरम गरम पक्ष आपण घेतले आता अर्थातच युद्धकालीं सरकारशीं असहकार करून वनवासी झालेल्या हिंदुस्थानातील सर्वात मोठा पक्ष घ्यायचा कॉंग्रेस सरकारला युद्धात केवळ मदत करीत नाहीं एवढेंच ठाऊक असणाराला आजच्या जगाच्या प्रळयात कॅंग्रेसचें स्थान नक्की करणें शक्य नाहीं कॅंग्रेसनें युद्धाच्या आघाडींत सामील व्हायचें का नाकारलें याची सगतवार माहिती ज्यानें अचूक समजावून घेतली त्यालाच काँग्रेसची भूमिका आकलन करता येईल

युद्धाच्या बाबतींत गांधीजींची भूमिका स्वतंत्र आहे ती कॉंग्रेसच्या दृष्टिकोणाहून वेगळी आहे कुठलाहि हिंसात्मक लढा गांधीजी त्याज्यच मानतात " काशीविश्वेश्वरावर बॉंब् पडल्यानें मला जेवढें दुःख होईल तेवढेंच सेंट पॉल चर्चवर पडल्यानेंहि होइल " असें गांधीजींनीं म्हटलें आहे. पण "तल्वार चालवितील ते तल्वारीनेंच मरतील " या ख्रिस्ती वचनावर गांधीजींची अपार श्रद्धा आहे हिटलरचा नाश करण्याचा शस्त्रा स्त्रानीं आपण प्रयत्न केला आणि तो यशस्वी झाला तर हिटलरपेक्षा

अधिक क्रूर व अधिक हिंसात्मक आपण झालो असा त्याचा अर्थ होईल. हिटलरचें पशुत्त्व आपण जास्त उत्कटतेनें वाढविलें तर हिटलरचा खराखुरा पराभव झाला असें कसें म्हणतां येईल ? गांधीजी म्हणतात, " फ्यूररचा वध करून हिटलरवाद कांहीं तुम्ही नष्ट करू शकत नाहीं " हिटलरचा हिंसावाद व हुकूमशाही आपणास जर त्याज्य वाटते तर तीहून श्रेष्ठ अशी अहिंसा व लोकशाही यांचा जयजयकार करीत आपण हिटलरशीं सामना दिला पाहिजे. गांधीजींनीं आज या प्रचंड हिंसेच्या तांडवांत अहिंसेची उच्चतम निष्ठा जागती ठेविली.

अहिंसेवर एक स्वतंत्र ग्रंथच लिहावा लागेल म्हणून या ठिकाणीं त्या विषयाची अधिक चर्चा करण्याचें कारण मला दिसत नाहीं. सर्व जगावर जलप्रळय झाला तेव्हां नोव्हा नांवाच्या आपल्या परम भक्ताला प्रभूनें एक नाव दिली आणि नोव्हाच्या आदेशाप्रमाणें त्या नावेंत चढलेला प्राणिमात्र सुखरूप राहिला, अशी ख्रिस्ती पुराणांत एक कथा आहे. हिंसेनें सारें जग पोटांत घ्यायचा विक्राळ डाव मांडला असतां अहिंसेचा सुंदर व सरळ अमृतोपदेश करणारा महात्मा हा ' आधुनिक नोव्हा 'च मी म्हणेन. हिंसात्मक युद्धाला विरोध दर्शविण्यासाठीं गांधीजींनीं वैयक्तिक सत्याग्रह सुरु केला. मात्र हा निर्मळ तात्त्विक लढा होता. युद्धप्रयत्नांना अडथळा न होईल ही दक्षता घेण्याचा प्रत्येक सत्याग्रही यत्न करी. सुमारें २५ हजार शांति-वीरानीं अहिंसेचा ध्वज उंच फडकत ठेवण्याकरितां कारावास पत्करला !

पण गांधीजींचा हिंसात्मक युद्धाला जरी विरोध होता तरी जर्मनी, जपान इ. गटी राष्ट्रांच्या आक्रमक धोरणाचा निषेधच त्यांनीं केला. ते म्हणतात.—

" गटी राष्ट्रांनीं हिंदुस्थानाबद्दल दाखविलेल्या सहानुभूतीला मी काडीचीहि किंमत देत नाहीं. तीं राष्ट्रें हिंदुस्थानांत आलीं तर तीं हिंदुस्थानचे उद्धारक म्हणून येणार नाहींत तर हिंदुस्थानच्या लूटमारींतला फायदा वांटून घ्यायला येतील. "

ब्रिटिश व अमेरिकन् राष्ट्रांचीं सन्यें हिंदुस्थानांत राहण्यास गांधीजींची हरकत नव्हती. मात्र त्यांनीं विजेते म्हणून न राहता मैत्रीचा करार करून हिंदुस्थानचे सहाय्यक या नात्यानें रहावें असें गांधीजी म्हणत तसेच जर्मनी जपान यांचे हृदयपरिवर्तन करण्याचाहि कार्यक्रम गांधीजींच्या व्यापक अहिंसा धर्मांत येतो गांधीजींच्या भूमिकेंतली सूक्ष्म गुतागुत व तीमधील सुसंगति ज्याना समजत नाहीं किंवा जे मुद्दामच समजून घेत नाहीं ते गांधीजी हुकूमशाहीचे छुपे मित्र आहेत' असा आरोप करतात! (त्यांत आपणांस बुद्धिवादी, म्हणविणारे कांहीं नतद्रष्ट हिंदी लोकही आहेत!) परंतु अतर्राष्ट्रीय कीर्तीच्या माणसांनीं या आरोपाचें निराकरण केलेलें आहे आणि ब्रिटिश सरकारनेंहि गांधीजींना 'हुकुमशाहीचे हस्तक वा मित्र' म्हटलेलें नाहीं!

गांधीजींच्या खालोखाल काँग्रेसवर ज्याच्या मताची छाप आहे ते नेहरू-आझाद हे थोडे वास्तववादी पुढारी होते. हुकूमशाहीचा सशस्त्र प्रतिकार केला पाहिजे या मताचे ते होते आणि त्यासाठीं हिंदुस्थाननें हिरीरीनें या युद्धांत भाग घ्यावा अशी तळमळ त्यांना होती. पण हिंदुस्थानचा स्वयनिर्णय मान्य करून हिंदुस्थानांत खरेखुरें राष्ट्रीय सरकार स्थापिलें जावें म्हणजे हें युद्ध परमार्थानें लोकयुद्ध आहे असें हिंदुस्थानला वाटेल असे विचार नेहरू-आझादनीं प्रकट केले काँग्रेसचें अहिंसेचें धोरण जरा ढिलें करण्याचीहि त्यांनी तयारी दाखविली पण व्हाईसरॉयनीं आपल्या कार्यकारी मंडळांत आणखी दोनचार प्रतिष्ठितांना जागा करून देण्यापलीकडे हिंदी आकांक्षाची कांहींच दखल घेतली नाहीं! "आजपर्यंत या इंग्रजी राज्यानें आम्हाला इभ्रतीनें जीवन जगू दिलें नाहीं आणि आज वेळ आली तर मानाचें सुंदर मरण सुद्धा हे लोक आम्हाला लाभू देत नाहींत." (*आज तक ये हुकूमतने इज्जतसे जीने नहीं दिया, आज मौका आया है तो ये शानसे मरने भी नहीं देते*) असे उद्गार मौलाना आझाद यानीं तळमळून काढले! १४ ऑगस्ट १९४१ रोजीं अटलांटिक महासागरांत एकत्र येऊन चर्चिल व रूझवेल्ट यानीं युद्धोत्तर काळांत प्रत्येक राष्ट्राला

स्वयंनिर्णयाचा हक्क दिला जाईल अशी घोषणा केली. हिलाच 'अटलांटिक सनद' म्हणतात, पण हिंदुस्थानला मात्र ही लागू नाहीं असें चर्चिलनीं तोंड भरून पार्लमेंटांत सांगितलें !!

पुढें हिंदुस्थानचे मित्र म्हणविणारे क्रिप्ससाहेब हिंदुस्थानांत आले. त्यांनीं ३० मार्च १९४२ रोजीं नव्या सुधारणा जाहीर केल्या. युद्धोत्तर काळांत स्वातंत्र्याचें अभिवचन आणि घटनासमिती देण्याचा वायदा हीं दोन वैशिष्ट्यें क्रिप्स् योजनेंत होतीं! पण आजच्या घडीला विश्वास पटवील असें त्यांत कांहींच नव्हतें! गांधीजींनीं तर क्रिप्स साहेबांनीं आपल्या मुलाखतींत आपल्या योजनेची प्रत पुढें करतांच ती २ मिनिटांत वाचली आणि 'तुमच्यासारख्या गृहस्थानें हा खर्डा आणायला नको होता!' असें स्मितपूर्वक सांगितलें म्हणतात ! नेहरू व आझाद यांनीं मात्र तडजोड करण्याची परकाष्ठा केली. 'इतक्या कडू गोळ्या गिळण्याची तयारी मी माझ्या आयुष्यांत कधींच दाखविली नव्हती,' असें पंडितजींनीं पुढें वृत्तपत्र-परिषदेत सांगितलें. क्रिप्स् आले तेव्हां त्यांच्या बोलण्यांत जी उदारता होती ती कां कोणास ठाऊक हळू हळू मावळली! 'युद्धकाळांत राष्ट्रीय प्रधानमंडळ देऊं' असें प्रथम म्हणतांना क्रिप्स्साहेबांनीं जो भरीव अर्थ व्यक्त केला होता त्याला त्यांनीं अनेक फाटे फोडले आणि संरक्षणाचे बाबतींत तर कुठलेच अधिकार मिळणार नाहींत असें अखेर सांगितलें ! अखेर क्रिप्स् योजना काँग्रेसनें फेटाळून लाविली!!

काँग्रेस नाझी-फॅसिस्ट वादाची विरोधक आहे. अबिसीनियावर जेव्हां इटलीनें हल्ला केला तेव्हां काँग्रेसनें फॅसिस्ट इटलीचा निषेध केला. मंचूरियावरील जपानचें आक्रमण अन्याय्य आहे असें कडक शब्दांनीं काँग्रेसनें प्रथम सांगितलें. लोकशाही स्पेननें फॅसिस्ट फ्रँकोशीं चालविलेल्या लढ्याचा गौरव काँग्रेसनें केला. इतकेंच नव्हे तर फॅसिस्टांच्या निष्ठुर अग्निवर्षावांत जातीनें जाऊन पं. नेहरूंनीं आपला फॅसिस्ट द्वेष सक्रिय शूरपणानें व्यक्त केला होता. चीनमध्येंहि जीव धोक्यांत घालून पं. नेहरू गेले होते आणि लोकशाही चीनला

शुश्रूषापथक पाठविण्याचे कामीं त्यानीं स्वत पुढाकार घेतला व नेहरू स्वत इतके हुकूमशाहीचे द्वेष्टे आहेत कीं लागोपाठ तिसऱ्यानें राष्ट्रीय सभेच्या अध्यक्ष-पदाचा मान देऊ केला तेव्हा 'देशात फॅसिस्ट मनोवृत्ति वाढायला मी साह्य होणार नाहीं' असें म्हणून त्यानीं तो मान नाकारला आपल्या देशात फॅसिस्ट राज्यपद्धतीविषयीं जी घृणा निर्माण झाली आहे आणि लोकसत्तेबद्दल जो आदर वाटू लागला आहे त्याला कारण कॉंग्रेस संस्थेची, विशेषत: व नेहरूची, शिकवणच आहे, हें नाकारील तो मूर्ख तरी असला पाहिजे किंवा मत्सरी तरी असला पाहिजे

चालू युद्धात आपल्या देशातल्या निरनिराळ्या पक्षानीं कोणती वृत्ति पत्करली याची ही हकीकत आहे ९ आगस्ट १९४२ रोजीं कॉंग्रेस नेत्याची धरपकड झाल्यामुळें देशात प्रचंड असंतोष माजला आणि देशभर दंगे, जाळपोळ, नासधूस झाली! सरकार याची जबाबदारी कॉंग्रेसवर टाकीत आहे गाधीजींनीं ३ मार्च १९४३ रोजीं आपलें उपोषण संपविलें. आपण किती थरथरत्या अत:करणानें ते २१ दिवस काढले! जगातली शातिवादी जनता किती हवालदील झाली होती महात्माजींच्या लोकोत्तर विभूतिमत्त्वाची साक्ष तर यावरून पटलीच पण जग शातीसाठीं किती धादावलें आहे आणि हिंदी स्वातंत्र्याविषयीं जगात किती सहानुभूति आहे ह्याचा प्रत्यय आला

या महायुद्धाच्या ज्वाळा आकाशास भिडल्या आहेत पोटात उसळलेला क्षुधाग्नि तर त्याहूनहि प्रदीप्त झाला आहे! जगात हुकूमशाहीचा विजय व्हावा असें आमच्या अतर्मनातसुद्धा पळभरहि येत नाहीं हें युद्ध लौकर संपो आणि या युद्धातून जें नवें जग उदयास येणार आहे त्यात युद्धें, विषमता, वतनदारी, हिंसा याचा मागमूसहि न उरो अशी आपण सदिच्छा करू या

---

# मजूर चळवळ : : १२

मी बोलताना वारंवार सांगत असतों कीं एकादें तत्त्व किंवा एकादी संस्था ही मनुष्यसमाजानें आपल्या उन्नत्तीची अमुक एक पायरी गांठली म्हणजेच उदयाला यायची. मजूर चळवळ ही मजुरांचा एक मोठा वर्ग देशांत निर्माण झाला म्हणजेच सुरू होते, आणि मजुरांचा मोठा वर्ग तयार होण्यासाठीं यंत्रकलेचा थोडाफार विस्तार व्हावा लागतो. सूर्य, पाणी, वारा, इ० पंचमहाभूतांना कल्पक माणसानीं आपल्या दिमतीला राबवून घेण्याची युक्ति काढली तेव्हां जगांत मोठी क्रांति झाली. दूरदूरचे देश जवळ आले, सुखाचीं साधनें वाढलीं. ओबडधोबड सृष्टींतून देखणेपणा काढण्याचें कसब अंगीं आलें. थोडक्यांत म्हणजे निसर्गावर मोठमोठे विजय मिळाल्यानें माणसाचा आत्मविश्वास वाढला आणि यांहून अनंतपटींनीं पराक्रम करण्याची ईर्षा त्याला उत्पन्न झाली.

सरंजामशाहीच्या अमदानींत कल्पक माणसाना आपले शोध व्यवहारांत आणण्यास कां व कसे अडथळे होत होते याचें विवेचन मी मागें केलें होतें. नवीन उत्पादनसाधनें वाढून आपली प्रतिष्ठा कमी होऊं नये म्हणून राजा व त्याची सरंजामी प्रभावळ यांनीं जग जंग पछाडले. विज्ञान म्हणजे पाखंड अशी दिशाभूल करण्याचा प्रयत्न केला. पण महत्त्वाकांक्षी लोकांनीं सरंजामशाहीचीं हीं कारस्थानें वेळींच हाणून पाडलीं. मात्र यांत शेवटीं अखेर फायदा भांडवल-

वाल्याचा झालेला दिसतो. कारण राजा आणि त्याचे सरदार याची अडगळ नाहींशी करण्यासाठीं बहुजनसमाजाच्या हक्काची ढाल पुढे करून व्यापारी पुढे आले; पण या क्रांतीच्या विजयानें खरीखुरी सत्ता लोकांच्या हातीं आली नाहीं. व्यापारी वर्ग मात्र बळावला, आपल्या यशोमार्गावर अडथळे आणणारे कोणी उरले नाहीत हा विश्वास येताच या वर्गानें आपली जनतेविषयींची कळकळ आवरून आपलें असुरी ऐश्वर्य हवें तसें वाढविण्यास सुरवात केली. आणि मग त्याची प्रतिक्रिया म्हणून मजुराना आपली संघटना करावी लागली.

आता तुमच्या ध्यानात येईल कीं सरंजामशाही, भांडवलशाही, आणि मजूरशाही ह्या मानवी समाजाच्या विकासातल्या एका मागून एक येणाऱ्या अवस्था आहेत. अर्थात् भांडवलशाहीचें बस्तान ठाकठीक बसेल तेव्हा मजुराना संघटनेची जरूरी भासू लागणार.

अगदीं एक साधें उदाहरण घेऊ. एका गावात कोष्ट्याचीं पाचपंचवीस घरें आहेत. आपापले माग चालवून हे लोक सुखानें आपलें पोट भरीत आहेत. याच गावांत जर एकादी कापडाची गिरणी निघाली तर साहजिकच त्या कोष्ट्याचा धंदा बसतो. कारण गिरणीपेक्षा हातमागावर कापड काढण्यास वेळ व श्रम फार लागतात, त्यामुळें तें कापड स्वस्तात देणें परवडत नाहीं. शिवाय गिरणीच्या कापडाइतकें तें तलमहि असू शकत नाहीं. गिऱ्हाईक सुंदर वस्तू कमी किंमतींत मिळेल तेवढी घेण्यास केव्हाहि उत्सुक असणार! अर्थात् गिरणीचें कापड लोकप्रिय होतें आणि हातमाग निकामी होतात! अशा रीतीनें बेकार झालेले कोष्टी गिरण्यात नोकरी धरतात. धंदा करून पोटापुरतें मिळविणारे हे स्वतंत्र जीव नोकरवर्गात जाऊन उद्योगधंद्याच्या प्रचंड यंत्रातले निर्जीव भाग बनतात. एका गावची उदाहरणादाखल म्हणून घेतलेली ही गोष्ट सर्व देशालाच लागू आहे. हिंदुस्थानात रेल्वे पसरली आणि यंत्रें वाढू लागलीं तेव्हापासून हळूहळू केवळ मनुष्यबळावरच करता येण्यासारख्या धंद्याना अवकळा

येत गेली आणि लक्षावधि लोकांचे व्यवसाय नष्ट होऊन त्यांना मजूरपेशा पत्करावा लागला.

विसाव्या शतकाच्या आरंभापासून हिंदुस्थानांत यंत्रांचा व्याप वाढूं लागला. मुंबई, कलकत्ता, अहमदाबाद, सोलापूर, इ० ठिकाणीं उंच व अजस्र धुराडीं आकाशांत उंच चढून अस्मान काळें करूं लागलीं. माणसें भूगर्भांत शिरून तेथील गुप्त संपत्ति हस्तगत करूं लागलीं. बिहारात जमशेदपुरला टाटा या महत्त्वाकांक्षी पारशी धनिकानें प्रचंड कारखाना सुरु केला. लगबगीनें सागराकडे जायला निघालेल्या सरितांचे ओघ अडवून त्यांतून विजेची शक्ति काढण्याचे यशस्वी प्रयत्न झाले. हिंदुस्थानच्या मानानें ही औद्योगिक प्रगति फारच अल्प होती आणि अजूनहि ती फार अल्पच आहे. येथें कारखान्यांचें जाळें पसरून पक्क्या मालांचे डोंगर रचले तर इंग्रज व तत्सम भांडवलशाह्यांची कशी पोळी पिकेल ? म्हणून येथील उद्योगधंद्याच्या प्रगतीकडे इंग्रज सरकार केव्हांहि सावत्र आईच्या दृष्टीनेंच पाहतें. पण तरीहि गरज म्हणा किंवा स्वार्थ म्हणा त्याना या देशांत चार कारखान्याचा माड मांडून द्यावा लागला. हिंदुस्थानांत हीं जीं उद्योगधंद्याचीं लहान मोठीं केंद्रें निर्माण झालीं तेथें मजूरवर्गाची वाढ होऊं लागली. पहिला मजूरसंघ नारायण मेघाजी लोखंडे नांवाच्या अल्पशिक्षित पण हुशार मजूरपुढाऱ्यानें १८८० सालीं काढला. अत्यंत अस्पष्ट अशी मजूरवर्गाच्या संघटनेची कल्पना या गृहस्थाला होती.

वर मी तुम्हांला सांगितलेंच कीं यंत्रांचा विस्तार जसजसा होतो तसतसे हस्तव्यवसाय स्वतंत्रपणें करणारे कारागीर मजूर बनत जातात. याखेरीज मजुरात आणखी भरणा होत जातो तो कंगाल होत जाणाऱ्या शेतकऱ्यांचा. हिंदुस्थान हा शेतकीचा देश असला तरी हिंदी शेतकरी म्हणजे मूर्तिमंत दारिद्र्यच आहे ! त्याला मरेमरेतों शेतांत राबावें लागतें आणि तरीहि अर्धपोटीं किंवा पुष्कदां आसपोटीं दिवस काढावे लागतात. शेतीला जोड

व्यवसाय काहीं नसतो. आस्तींत जास्त पैशाची रास पडावी म्हणून जमीनदार अधिकाधिक खंड देणाऱ्या नाना कुळाकडे कसायला जमीन देत राहतात! त्यामुळें यंदा मिळालेली अर्धकोर भाकर पुढल्या वर्षी मिळेलच अशी शेतकऱ्याना खात्री नसते! वडिलोपार्जित मालकीची थोडीफार जमीन असलीच तर तिचे हजार वाटे झालेले असतात! वाट्याला आलेली जमीन पोट भरायला अपुरी असते! मालकीच्या लहानशा तुकड्यात पुरेसें पीक काढण्यासाठीं जें खतपाणी घालावें लागतें तें आणण्यास पैसा नसतो!! हिंदी शेतकऱ्याची अशी हृदयद्रावक कहाणी आहे अशा दुर्दशेंत सापडलेले शेतकरी अश्रुपूर्ण नेत्रानीं आपल्या प्राणाहून प्रिय असलेल्या जमिनीचा निरोप घेतात आणि शहरात येऊन कुठें गिरणींत, कुठें कारखान्यात, कुठें गोदींत मजूर म्हणून राहतात यंत्राच्या पोलादी चाकाखालीं उध्वस्त झालेल्या हस्तव्यवसायाचे कारागीर आणि शेतीवर पोट भरेना म्हणून आपली जन्मभूमि सोडून आलेले शेतकरी हे हिंदी मजूरसृष्टीचे दोन प्रमुख विभाग आहेत अर्थात् केवळ मजूर म्हणूनच असलेले लक्षावधि लोकहि आहेतच

१९१४ सालीं सुरू झालेल्या महायुद्धानें हिंदी भांडवलवाल्याना मोठाच हात दिला. यंत्रकलेचीं माहेरघरें युद्धाच्या अडचणींत सापडलेलीं तिकडे पक्का माल नेहमींप्रमाणें तयार होत नसे आणि झालाच तर तो येथवर धाडून आणायला पुरेशीं जहाजें नसत. पुनः जहाजाचा मार्ग धोक्याचा होऊन बसलेला. चार जहाजें निघालीं तर त्यातलीं शत्रूच्या टारपेडोंनीं किती समुद्रतळीं जातील आणि किती मुक्कामाला पोंचतील याचा नेम नसे साहजिकच देशी उद्योगधंद्याना बरकत आली विशेषत कापडाचा धंदा विलक्षण फोफावला. धंद्यानल्या तेजीचा काहींसा उपयोग मजुराची स्थिति सुधारण्याकडे धनिकानीं केला खरा. पण तो प्रयत्न फार क्षीण होता एकेका मालकाला खाजगी फायदा कोट्यावधी रुपये मिळायचा आणि त्यातले चार दोन लाख रुपये त्यानें हजारों

मजुरांत विभागून यायचे! अशानें युद्धजन्य महागाईनें गांजलेल्या मजुराना कितीसें साह्य होणार?

पण युद्धजन्य परिस्थितीची खरी झळ युद्ध संपल्यावर गरीबांना लागते. युद्धकाळांत अतर्गत व्यवस्थेला धोका पोचूं नये म्हणून सरकार कांहीं उद्योगधंद्यांना उत्तेजन देते. खुद्द युद्धामुळें कांहीं कामें अफाट प्रमाणावर सुरू होतात. त्यामुळें अगणित माणसांना काम मिळतें. पण युद्ध संपलें म्हणजे ही कृत्रिम भरभराट ओसरते. हें उद्योगधंद्याला आलेलें बाळसें नसून ती सूज होती हें कटु सत्य देशाला कळतें. काम मिळत नाहीं. मजुरीचे दर घसरतात आणि त्यामानानें मालाची सुबत्ता काहीं नसते. त्यामुळें महागाई मात्र विशेष कमी होत नाहीं. गेल्या महायुद्धानंतर बरोबर हीच स्थिति अनुभवायला मिळाली आणि त्यामुळें मजुरात फार असंतोष वाढूं लागला. पहिली असहकारिनेची लाट ओसरली त्या सुमारास कम्युनिझमूच्या लाल तत्त्वज्ञानाचा अरुणोदय हिंदुस्थानांत होत होत मजुराचे कैवारी म्हणून पुढें आलेल्या मध्यम वर्गीय चतुर व त्यागी नेत्यानीं रशियांतल्या क्रांतीचा मोठ्या उत्साहानें अभ्यास केला होता. जगात एके ठिकाणीं का होईना पण मजूरराज्य स्थापन झालें यामुळें निरनिराळ्या राष्ट्रांतील मजूर नेत्याना मोठीं आशा वाटूं लागली. "जगांतील शेतकऱ्यांनो आणि कामकऱ्यांनो! एकत्र व्हा. तुम्हांला गमवायचें काहींच नाहीं. सोडायच्याच असतील तर तुमच्या शृंखला. सर्व विश्व तुमच्या ताब्यांत येण्यासारखें आहे." ही मार्क्सची गर्जना हिंदुस्थानांत स्पष्ट ऐकूं येऊं लागली. आणि मुंबईला गिर्नीच्या नेत्यांनीं साम्यवादी विचारसरणीचा अंगीकार करून मजूरांची संघटना करण्यास सुरवात केली.

१९२७ नंतर हिंदुस्थानातल्या मजुराची स्थिति फारच वाईट होऊं लागली. कारण यावेळीं आर्थिक मंदीची प्रचंड लाट जगावर येऊं घातली होती. धंद्याला तेजी असली म्हणजे फायदा खाजगी मालकाकडे जायचा आणि धंदा ओसरूं लागला म्हणजे मजुरावर त्याच्या बोजा पडून त्यांच्या रोज-

मुन्यात कपात व्हायची हें भांडवलवाल्यांचें नेहमींचें धोरण असतें अर्थात् या धोरणास अनुसरून जागतिक मंदीच्या भयानें मजुराच्या सवलती हळूहळू काढून घेण्यात येऊ लागल्या. १९२८-२९ या साली मुंबईच्या गिरण्यांत प्रचंड संप झाला! बंगालच्या तागाच्या गिरण्यात त्याचीच आवृत्ति निघाली! जमशेदपुरला अशीच टाळेबंदी झाली आणि रेल्वेकामगारानींहि आपल्या लढाऊ भाईबंदाच्या पावलावर पाऊल टाकलें! या संपाना जरी जनतेचा पाठिंबा होता तरी हे संप यशस्वी होऊ शकले नाहींत! भांडवलवाल्यानीं ते चिरडून टाकले. आणि १९२१ साली सरकारनें सुमारें ३०-३२ मजूर पुढाऱ्याना गिरफदार करून त्याच्यावर राजद्रोहाच्या कलमाखालीं खटला भरला! पराभवानीं व दडपशाहीनें मजूरवर्ग अधिकच लढाऊ आणि जागृत बनला. राष्ट्रीय चळवळहि जोरात वाढत चालली होती. मजूर चळवळ राष्ट्रीय चळवळींत समाविष्ट जरी झाली नाहीं तरी दोन चळवळींचा प्रवास एकाच दिशेनें समांतर रेषात चालला होता आणि पुढें कठीण प्रसंग येऊन ठेपला आहे याची जाणीव सरकारला होती

तथापि हिंदुस्थानातल्या मजूर चळवळींत जे मोवरे आहेत त्याचा नीट विचार केल्यावेरीज तुम्हाला या प्रश्नाची गुंतागुंत नीट ध्यानात येणार नाहीं. इंग्लंडसारख्या स्वतंत्र देशात लोकांचें सरकार असतें आणि त्या सरकारनें भांडवलवाल्याशीं कितीं संधान बांधलेलें असलें तरी त्यावर लोकमताचें थोडेफार दडपण पडू शकतें आमचें सरकार परकीं आहे. त्याला कळकळ असलीच तर येथील संपन्न वर्गाची थोडीशी असेल इंग्लंडची भांडवलशाही इंग्लंडच्या ताब्यांतील वसाहतींमध्यें हवीतशी लूट करून आपलें वैभव हवेंतसें वाढविते आणि मजुराच्या तोंडावर चार तुकडे टाकते. त्यामुळें आमच्या इकडच्या मध्यवर्गीय गृहस्थापेक्षाहि इंग्रज मजूर सुखात राहू शकतो आम्हाला आमच्या अंकित अशा वसाहती तर नाहींतच खुद्द आमचाहि देश आमच्या ताब्यात नाहीं. आमच्या मजुराच्या सुखसोयींसाठीं योग्य ते कायदे

करूं, व्यापार वाढवूं, उद्योगधंदे स्थापूं म्हटलें तर आमच्या हातांत काय आहे ? आमचे भांडवलवाले परकीय भांडवलशाहीच्या छायेखालीं आहेत आणि आमचे धुरंधर मजूर नेते रशियाच्या कटाक्षावर आपल्या राष्ट्रांतल्या हालचाली करीत आहेत ! ! मजूरवर्ग हवा तितका सुशिक्षित नाहीं. आणि त्यामुळें जागृतहि नाहीं ! मजुरांचे पुढारी हे बहुधा त्यांच्या वर्गांतून न येतां सुशिक्षित मध्यम वर्गांतून येतात. राजकारणाचे डाव यशस्वी करण्याकरितां राजकीय पक्ष मजूरसंघटनेचा पुष्कळदां उपयोग करतात ! ट्रेड युनियन् काँग्रेस ही एक मजुराची संस्था. पण तीमध्यें कोण भांडणें व मतभेद ! हे सारे भयंकर खडक टाळून मजूर चळवळीला आपलें तारूं हाकारावयाचें आहे.

ट्रेड युनियन् काँग्रेसचें पालनपोषण श्री. नारायण मल्हार जोशी या नेमस्त गृहस्थांनीं मोठ्या कसोशीनें केलें. मजुरांचा प्रश्न आर्थिक आहे, तेव्हां राजकारण त्यांत आणून त्या चळवळींत बजबजपुरी माजवूं नये या मताचे जोशी होते. ट्रेड युनियन संस्था इंग्लंडसारख्या पुढारलेल्या देशांत फार सामर्थ्यशाली संघटना ठरली आहे. मजुरांनीं संघटित होऊन मोठ्या प्रमाणावर एक आघाडी निर्माण केली तर भांडवलवाले त्यांच्यापुढें नरमतील अशी स्थिति आहे. कांहीं धंदे एकमेकांवर अवलंबून असतात. विजेवर चालणाऱ्या गिरण्या एकाद्या शहरांत असल्या तर विजेच्या कारखान्यात संप झाल्यास त्या गिरण्यांचें काम बंद पडेल, म्हणजे काय होईल कीं, आपलें काम अडूं नये म्हणून विजेच्या कारखान्यांतल्या मजुरांची समजूत काढा असें दडपण गिरणी मालक वीजकपनीच्या मालकांवर आणतील. ट्रेड युनियन्मध्यें सर्व धंद्यांचे संघ असले आणि ते एकोप्यानें चालले तर त्याचा एकमेकांना फायदा होतो. वेन् म्हणून मजूर चळवळीचे एक इंग्लिश तज्ञ आहेत त्यांनीं इंग्लंडमधील संपाचा अभ्यास करून असें सिद्ध करून दाखविलें आहे कीं, इंग्लंडमधील ट्रेड युनियन् कॉंग्रेसच्या संमतीनें जे इग्लंडमध्यें संप झाले ते कमीजास्त प्रमाणांत यशस्वी झाले. ट्रेड युनियन् कॉंग्रेसच्या मदतीवांचून केलेले सुटे

सप मान नुकसानींत येऊन मजुराचा तोटा झाला. ट्रेड युनियन कॉंग्रेसचे हें सामर्थ्य ओळखून श्री नारायणराव जोशी यानीं हिंदुस्थानात ही चळवळ राजकारणापासून पूर्ण अलिप्त ठेवण्याचा प्रयत्न केला, तथापि अलीअलीकडे त्यात राजकीय मत पथाचा प्रभाव पडू लागलेला स्पष्ट दिसतो

राष्ट्रीय सभेच्या आरंभापासून हिंदी मजुराच्या प्रश्नाकडे नामांकित पुढाऱ्याचें लक्ष असे मात्र त्याच्या साऱ्या शक्ति राजकीय आघाडी लढविण्यात एकत्र झाल्यामुळे प्रत्यक्ष मजूर चळवळींत कॉंग्रेस नेते पूर्णपणें समरस झाले नाहींत इंग्लडमारख्या सुधारलेल्या देशात अर्थशास्त्राचे जे नियम उपयुक्त ठरतात ते आमच्या मागासलेल्या देशात अहितकारक ठरतील म्हणून रानड्यानीं ' हिंदी अर्थशास्त्र ' असें स्वतंत्र शास्त्रच आपल्या अलौकिक बुद्धीनें तयार केलें गोखल्यानीं तीच परंपरा पुढें चालविली, इतकेंच नव्हे तर देशाच्या सर्वांगीण प्रगतीसाठीं निरनिराळ्या शाखात काम करणारे नि स्वार्थी व तज्ञ भारतसेवक तयार करण्याची योजना आखून 'भारत सेवक समाज ' स्थापिला जोशीं सारखे ट्रेड युनियन् कॉंग्रेसचे निष्ठावत पालक व इतर कितीतरी मजूर पुढारी आपणास भारत सेवक समाजानें दिले आहेत हें विसरू नका लोकमान्याकडे आपला राष्ट्रपुरुष म्हणून मजूर भक्तीनें पहात आणि १९०८ सालीं जेव्हा लोकमान्याना शिक्षा झाली तेव्हा मजुरानीं प्रक्षुब्ध होऊन दंगे केले ! ही वार्ता ऐकून ' हाच खरा बहुजनाचा नेता (Mass leader) आहे, ' असे गौरवोद्गार रशियन लोकाग्रणी लेनिन यानें काढले म्हणतात ! होमरूल लीगच्या चळवळीचे एक प्रवर्तक बॅ बॅपटिस्टा हे मजुराचे आवडते पुढारी होते सामुदायिक संघटना करण्यात बॅपटिस्टानीं किती यश मिळविलें हें पाहण्याचें कारण नाहीं. व्यक्तिश मजुराच्या बाबतींत जें काहीं करता येण्यासारखें होतें तें अंग मोडून बॅपटिस्टानीं केलें 'मजुराचा वकील ' असें बॅपटिस्टाना म्हणत, यावरून कामगाराच्या दृष्टींतली त्यांची लोकप्रियता कळून येईल पंजाबचे प्रसिद्ध कॉंग्रेस पुढारी लाला लजपतराय हे मजूर चळवळींत जातीनें

लक्ष घालीत. राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं समाजसुधारणेप्रमाणेंच आर्थिक उन्नति हीहि अवश्य आहे आणि या साऱ्या चळवळी एकाच वेळीं केल्या पाहिजेत अशी लालाजींची व्यापक व पुरोगामी दृष्टि होती.

मजुराकडे पाहण्याचा गांधीजींचा दृष्टिकोन मग चर्चेला घेतों. पहिल्यानें राष्ट्रीय सभेत मजुरांच्या प्रश्नाविषयीं जिव्हाळा कोणी उत्पन्न केला याचा वृत्तांत सांगतों. मी प्रथमच सांगितलें कीं हिंदी मजुराच्या प्रश्नाबाबत राष्ट्रीय सभा उदासीन अशी कधींच नव्हती. तथापि पहिल्यापासून शेतकऱ्यांच्या प्रश्नाची कड जशी काँग्रेसनें हिरीरीनें घेतली तशी मजुरांच्या हितासाठीं कांहीं योजना आपल्या कार्यक्रमात दाखल करण्याची तत्परता कांहीं काँग्रेसनें प्रथम दाखविलेली दिसत नाहीं. याला कारण 'काँग्रेस ही भांडवलवाल्यांची संस्था आहे' असें हिंदविद्वेषी इंग्रज तुम्हांला सांगतील आणि दुर्दैवानें त्या सांगण्याचा अनुवाद करणारे लोक आपणांतहि तुम्हांला भेटतील! पण वर्गयुद्धाचें तत्वज्ञान ज्यांनीं पत्करलें त्या मजूरनेत्यांकडेच काँग्रेसपासून मजूरवर्ग दूर ठेवण्याचा दोष येतो. 'राष्ट्रसभेंत संपन्न वर्गाचें प्रस्थ फार आहे, तेव्हां तुम्ही आपल्या हितासाठीं तरी काँग्रेसच्या चळवळींत सामील होऊं नका.' असा उपदेश केस पिंजारून खुनशी आवेशानें 'भाई' नेते करीत आले. कायदेभंगाच्या चळवळीनें सर्व देश ढवळून निघाला असतां मजुरांना मात्र तीपासून अलिप्त रहाण्याचा इशारा मजूरनेत्यांनीं दिला. जगविख्यात क्रांतिकारक भाई एम्. एन्. रॉय हे मात्र अज्ञातवासांतूनहि कळकळीच्या शब्दांनीं मजुरांना राष्ट्रीय चळवळींत सामील होण्याचा आग्रह करीत होते. "परसत्तांकित वसाहतींत मजुरांचा प्रश्न हा स्वातंत्र्याच्या लढाईशीं निगडीत असतो. अशा वसाहतींतले भांडवलवालेहि साम्राज्यशाहीच्या दडपणानें दबलेले असतात. म्हणून त्यांच्यांत झुंजारपणा येऊन परसत्तेचें जोखड दूर करण्याचे कामीं ते देशांतल्या बहुजनसमाजाला मदत करतात. याकरितां केवळ भांडवलवाले राष्ट्रसभेंत आहेत म्हणून विचकून तीपासून अलिप्त राहण्याचा आत्मघातकीपणा करूं नका." हिंदी

मजूर नेत्यानी रॉयसाहेबाच्या या दूरदर्शी सल्ल्याचा विचार केला नाहीं कारण वसाहतींतल्या मालक-मजूर लढ्याबाबत प्रचार करतांना हाच सल्ला रशियन् सरकारला रॉयनीं दिला होता आणि रशियन् सरकारनें त्याची अवहेलना केली होती इतकेंच नव्हे, तर रशियन् सरकारच्या अंतरंगात असणाऱ्या रॉय साहेबाना असा पोक्त सल्ला दिल्याबद्दल पदच्युत करण्यात आलें होतें! रशियन् सरकारच्या कृपेवर तगलेले व फुगलेले आमचे हिंदी कम्युनिस्ट त्या सरकारच्या अवकृपेला पात्र झालेल्या माणसाचा सल्ला का ऐकतील ? कम्युनिस्टाच्या सोव्हिएट धार्जिणेपणाची एक गोष्ट आचार्य नरेन्द्रदेव सांगतात इटलीनें अबिसीनियावर स्वारी केली तेव्हा कॉंग्रेसनें इटलीचा निषेध केला अबिसीनिया हें इटालीयन साम्राज्यशाहीच्या चक्राखाली रगडलें जाणार यासाठीं कम्युनिस्टासारख्या लोकसत्तावादी लोकानीं इटलीच्या विरुद्ध मोहिम करायला पाहिजे होती आणि हिंदी कम्युनिस्टानीं इटलीविरुद्ध निषेध प्रदर्शित करण्याची एक योजनाहि आखली होती पण सोव्हिएट रशियाचें तेल इटली घेत असे म्हणून आपल्या श्रीमंत गिऱ्हाईकाला न दुखविण्याचा आदेश सोव्हिएट सरकारनें सोडला. हिंदी कम्युनिस्टानीं तो पाळला हें मागणें नकोच ! अशा दुर्दैवी घटना होऊनहि हिंदी मजुराला कॉंग्रेस ही स्वातन्त्र्यवादी लढाऊ संस्था आहे आणि आपलें दु खविमोचन ती करू शकेल असी अंधुक का होईना श्रद्धा वाटू लागली होती. ही श्रद्धा मजुरात निर्माण करण्याचें श्रेय प नेहरूना दिलें पाहिजे राष्ट्रवादी आणि मजूर पंडितजींनीं एकत्र आणले आणि याला कारण पंडितजींना घाम गाळून पोट भरणाऱ्या आपल्या कामगार बधुविषयीं असीम कळकळ तर होतीच पण मालक आणि मजूर याच्यातल्या लढ्याची व आतरराष्ट्रीय विचारप्रवाहाची जाणतेपणानें साक्षात् माहिती प नेहरू यानीं करून घेतली होती

१९२७ सालीं युरोपात ब्रुसेल्स येथें दलित राष्ट्राची परिषद् भरली साम्राज्यशाही आणि भाडवलशाही याच्या टाचाखालीं जीं राष्ट्रें आणि जे वर्ग

चुडविले जात होते त्यांची ही परिषद् होती. चीन जपानपासून अमेरिकेपर्यंत सर्व प्रमुख राष्ट्रांचे प्रतिनिधी या परिषदेस आले होते. याच सुमारास पं. नेहरू युरोपांत होते त्यांना सन्मानपूर्वक पाचारण करण्यांत आलें होतें. आधुनिक विज्ञानमहर्षि डॉ. अलबर्ट आईनस्टाईन हे परिषदेला आले होते. मि. जॉर्ज लन्सबेरी या जगविख्यात ब्रिटिश-मजूरनेत्यांनीं तर परिषदेचें उद्घाटनच केलें. एक दिवस अध्यक्षपदाचा मान पं. जवाहरलालजींनाहि देण्यांत आला. यानंतर मास्को येथे रशियन् राज्यक्रांतीच्या वाढदिवसासाठीहि रशियाकडून पं. नेहरूंना सरकारी आमंत्रण आलें आणि पंडितजी त्याप्रमाणें तेथें गेलेहि. नव्या समतावादी संस्कृतीच्या मंदिरांत पं. नेहरूंना जातां आल्यानें त्या मंदिराची रचना व तेथील उपासनाविधि यांची दाट ओळख त्यांना करून घेतां आली. यानंतर पंडितजी हिंदुस्थानांत परतले ते समाजवादाविषयीं कांहीं दृढ निश्चित संकल्प व श्रद्धा घेऊनच आले. जगांतील दलितांचा प्रश्न हा मजुरांच्या प्रश्नाहून वेगळा नाहीं अशी त्यांनीं खूणगांठ बांधली आणि मजूर चळवळींत विशेष लक्ष घालण्यास सुरवात केली. एवढ्या तोलाचा राष्ट्रवादी नेता आपल्यांत आल्यानें मजूर पुढाऱ्यांतल्या समंजस मंडळींना साहजिकच आनंद झाला. आणि दुसऱ्याच वर्षी ट्रेड युनियन् कॉंग्रेसचें अध्यक्षपद पंडितजींकडे आलें ! १९२९ सालची ही गोष्ट.

पण योगायोग असा कीं याच अधिवेशनांत ट्रेड युनियन् कॉंग्रेसचीं छकलें उडालीं ! जहाल-मवाळ भेद विकोपाला गेले ! नॅशनल फेडरेशन ऑफ ट्रेड युनिअन्स् ही संस्था मवाळ कामगार पुढाऱ्यांनीं काढली !

नरम गरम दलांचा मतभेद सरकारशीं सहकार्य करायचें कीं नाहीं या मुद्यावर झाला. व्हीटले कमिशन म्हणून एक समिति सरकारनें मजुरांच्या स्थितीची पाहणी करण्यासाठीं नेमली होती. या समितीशीं सहकार्य करायचें कीं नाहीं हा मुख्य वादाचा मुद्दा होता. आणि राष्ट्रसंघाला जोडून जी आंतरराष्ट्रीय मजूर परिषद् भरते तिला प्रतिनिधी पाठविण्याबद्दलही कडाक्याची चर्चा चालू

होती जहाल पक्ष व्हीटले कमिशनवर बहिष्कार घालू इच्छित होता आणि अंतरराष्ट्रीय मजूर परिषद् ही सरकारच्या कृपाछत्राखालची व भांडवलशाही मनोवृत्तीची संस्था असल्यानें तिच्याशीहि असहकार पुकारावा असें या पक्षाचें मत होतें नेमस्त मंडळी अर्थात् सरकारशीं सर्वत्र सहकार्य करून साधेल तेवढें मजुरांचें हित साधून घ्यावें या मताची होती प जवाहरलाल जहाल गटाला अनुकूल होते खरे, पण जहाल गटाचा मास्कोशीं जो ऋणानुबंध होता त्याबद्दल मात्र नेहरूना तिटकारा वाटे रशियन् सरकारनें कामगार किसानाच्या हितासाठीं मोठ्या योजना आखून त्या बऱ्याच अंशीं तडीस नेल्या, याबद्दल रशियन् सरकारचें नेहरू मोकळ्या मनानें कौतुक करीत असले तरी रशियात थैमाणा घालणारी हिंसा व असहिष्णुता याची त्याना चीड होती ट्रेड यूनियन कॉंग्रेसमधील दोन गटाचा समेट करण्याचा प नेहरूनीं पुष्कळ प्रयत्न केला पण अखेर ती संस्था दुभगलीच ! राष्ट्रीय सभेचे दुसरे एक प्रमुख युवकनेते बाबू सुभाषचंद्र बोस याना पुढें ट्रे यु कॉंग्रेसचें नेतृत्व देण्यात आलें त्यानींहि समेटाचा यत्न करून पाहिला पण सुभाषबाबूना यश आलें नाहीं !

तो समेट करण्याचा मान पंडितजींनाच मिळावा अशी विधिघटना होती १९३३ सालच्या मे महिन्यात मुंबई येथें ट्रेड युनियन् कॉंग्रेसची बैठक भरली होती या परिषदेला पंडितजींना मुद्दाम पाचारण करण्यात आलें होतें यावेळीं पंडितजींनीं उपद्व्यापी मजूरनेत्याची त्याच्या प्रचंड अनुयायी वर्गापुढें, सडकून हजेरी घेतली ते म्हणाले

' स्वातंत्र्याखेरीज मजुराच्या हालअपेष्टा दूर होणार नाहींत. म्हणून स्वातंत्र्य मिळविण्यासाठीं मजुरानीं राष्ट्रीय सभेशीं सहकार्य केलें पाहिजे तुमचे पुढारी तुम्हाला या कामीं उपयोगीं पडणार नाहींत, कारण आपापलें पुढारीपण टिकविण्यात ते दंग आहेत "

या बैठकींत ट्रेड युनियन् काँग्रेस आणि नॅशनल फेडरेशन ऑफ् ट्रेड युनियन्स् यांचा समेट झाला. संप पुकारणें किंवा अंतरराष्ट्रीय मजूर परिषदेला प्रतिनिधि पाठविणें या बाबी दोन्ही तटांत घसघशीत बहुमत असेल त्याप्रमाणें अमलांत आणायचें ठरलें. "हा समेट म्हणजे पं. जवाहरलाल नेहरूंच्या वैयक्तिक श्रेष्ठतेची साक्षच होय" असे उद्गार बॅ. गिरी या मजूरनेत्यांनीं यावेळीं काढले.

या समेटाच्या आगेमागेंच जगांतील परतंत्र देशांतल्या राष्ट्रीय सस्थांबद्दलचें आपलें धोरण रशियानें बदललें होतें. या संस्थांत शिरल्यास क्रांतीचा कार्यक्रम पुढें रेटण्यास मदत होईल असें सोव्हिएट सरकारला आतां वाटूं लागलें. अर्थात् सोव्हिएट सरकारची हिंदी अर्भकेंहि काँग्रेस ही क्रांतिकारक असल्याची भाषा बोलूं लागली. प्राथमिक काँग्रेस संस्थांपासून तों ऑ. इं. कॉ. कमिटी-पर्यंत जागा काबीज करण्याचा कम्युनिस्टांनीं चंग बांधला. त्यांनीं ब्लेझर व रेशमी कपडे टाकले. खादी अंगावर चढविली आणि काँग्रेसमध्यें शिरण्याची लायकी प्राप्त करून घेतली. देशांत भरणाऱ्या कामगाराच्या व किसानांच्या परिषदांत आता हे काँग्रेस पुढारी म्हणून मिसळूं लागले. काँग्रेसमध्यें या लोकांना मंदिरप्रवेश मिळाला हें खरें, पण काँग्रेसच्या प्रतिष्ठित पुढाऱ्यांबद्दल कम्युनिस्टांना जी अढी होती ती काही कमी झाली नाहीं, त्यांचें रशियाकडे पाहून पाउलें टाकण्याचें धोरण कांहीं बदललें नाहीं, आणि स्वपक्षाखेरीज इतराबद्दल त्यांना वाटणारी तुच्छता मुळींच ओसरली नाहीं. या व अशाच इतर कारणांनीं काँग्रेसच्या बैठकींत कांहीं हुल्लड माजविण्याच्या हेतूनें आलेला अल्पसंख्य कंपू एवढ्याच दृष्टीनें कम्युनिस्टांची संभावना झाली. वजन किंवा प्रतिष्ठा अशी या कंपूला कधींच लाभली नाहीं.

एकाद्या मोठ्या समारंभांत उणींदुणीं काढायला किंवा जमल्यास त्या समारंभाचा चुथडा उडवायला चारदोन बेजबाबदार लोक येतात. हीच काँग्रेसच्या कार्यक्रमांत कम्युनिस्टांची भूमिका होती. परंतु कम्युनिस्टाच्या कारवाया

वर्व्हंर्शी निष्फळ ठरल्या याला कारण कॉंग्रेस सोशालिस्ट पक्षाचा उदय आणि विकास हें होय. नरेन्द्रदेव, जयप्रकाश, कमलादेवी चट्टोपाध्याय, मसानी, मेहेरअली, पटवर्धनबंधु, लोहिया, पुरुषोत्तमदास, मेहता, पूर्णिमा बानर्जी, एस्. एम्. जोशी, गोरे प्रभृति ज्येष्ठ व कनिष्ट समाजवादी पुढाऱ्यांनीं नेहरूपासून स्फूर्ति घेऊन कॉंग्रेसमध्यें समाजवादाला जागा करून दिली आणि मजूर चळवळीचीं सूत्रें आपल्या हातीं घेऊन कॉंग्रेसमध्यें शिरलेल्या उपऱ्या जहालांना व फुटीर क्रांतिवाद्यांना शह दिला.

या वेळीं देशांत आणखीहि मजूरसंघटना होत होत्या. त्यापैकीं डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांचा स्वतंत्र मजूरपक्ष ही विशेष उल्लेख करण्यासारखी संघटना होय. मुंबई शहरांतच तिचें प्राबल्य दिसतें. हिच्या प्रतिनिधींनीं कायदेमंडळांत आणि अनुयायांनीं बाहेर कॉंग्रेस मंत्रीमंडळाचें यश कलंकित करण्याची शिकस्त केली ! रॉय महाशयांनींहि एक मजूरसंस्था स्थापिली आहे. ही अधिकांत अधिक क्रांतिवादी व मूलगामी असल्याचें रॉयवादी सांगतात. तिचा राष्ट्रव्यापी क्रांतीचा कार्यक्रम कोणता आहे तो अजून गुलदस्त्यांतच असावा. पण झटून सरकारशीं युद्धसहकार्य करणें एवढेंच तिचें ढळढळीत कार्य आज दिसतें. कॉंग्रेसच्या झेंड्याखालीं सर्व मजुरांनीं एकवटावें असा आदेश देऊन ज्यांनीं त्याकरितां सोव्हिएट सरकारच्या मंत्रीमंडळांतलें मानाचें स्थान विनदिक्कत गमावलें, त्या एम्. एन्. रॉयनीं कॉंग्रेसच्या भव्य शामियान्यातून बाहेर पडून दूर आपल्या चिमुकल्या अनुयायासाठीं एक छोटीशी राहुटी का ठोकली याची अटकळ येत नाहीं !

आपल्या देशातल्या लहानमोठ्या मजूरचळवळींविषयीं मीं तुम्हाला सांगितलें. या विषयाची सांगता करण्यापूर्वी, यासंबंधींची गांधीजींची भूमिका काय हें सांगण्याबद्दल प्रथम दिलेलें आश्वासन मी पुरें करावें ही तुमची उत्कंठा मी जाणून आहे. आणि गांधीजींचीं या प्रश्नाविषयींचीं मतें समजून घेतल्याशिवाय हा विषय खऱ्या अर्थानें संपवितांहि येणार नाहीं. राष्ट्रांत आणि

एकमेकांच्या हितसंबधाना जोडलेली आहेत. म्हणून मालक व मजूर यानीं सामायिक बुद्धीनें झटावें असें गांधीजी सागतात. आपल्या सूत्राना त्यानीं प्रत्यक्ष व्यवहारातही उतरविलें आहे. अहमदाबाद येथील 'मजूर–महाजन सस्था' ही गांधीजींच्या विचारसरणीचेंच फळ होय. कॉंग्रेस सरकारानीं मजूर-विषयक जे कायदे केले त्यांवर गांधीजींच्या तत्वज्ञानाची दाट छाया पडली आहे.

मला वाटतें स्थूल मानानें मी मजूर चळवळींबद्दल सर्व काहीं सागितलें. मजुराचा प्रश्न हा हिंदी राजकारणात याहूनहि अधिक व्यापक व अधिक गुंतागुंतीचा होत जाणार आहे. उद्योगधद्याचीं केंद्रें जशीं वाढतील व आहेत तीं रुंदावतील तशी मजुराची सघटना प्रखर होत जाईल. मालक आणि मजूर यांचा प्रश्न चिघळून हिंदी राष्ट्राचा इतिहास रक्तलाछित व्हावा असें कुणाला वाटेल? जगातील इतर देशातल्या हृदयद्रावक व क्रूर घटनाची पुनरावृत्ति येथें न व्हावी. पण त्यासाठीं मजूर चळवळ प्रथमपासून निर्दोष ठेविली पाहिजे. हिंदुस्थानातील जातीय सस्था, धर्म व सस्कृति याच्या खोट्या धुंदींत विचाऱ्या मजूरवर्गाचें खपाटीस गेलेलें पोट लक्षांत घेण्यासहि तयार नाहींत! रशियाकडे आपली बुद्धिसंपदा गहाण टाकून बसलेले व वर्गयुद्धाच्या तत्त्वज्ञानानें झिंगलेले 'भाई' वंद आपलें नेतृत्व कसें टिकेल या उचापतींत आहेत. "धर्मवेड" (Communalism) आणि "अधर्मवेड" (Communism) हीं आपल्या राष्ट्रहिताला सारखींच अपायकारक आहेत हें निश्चित समजा. मजुराची स्थिति सुधारावयाची असेल तर व्यापक राष्ट्रीय प्रमाणावर अवाढव्य योजना आखून ती पार पाडण्याची तत्परता दाखविली पाहिजे. पण ती पार पाडण्यास हातीं सत्ता पाहिजे. आणि ही सत्ता स्वातंत्र्यावेरीज कशी मिळेल? आता तुमच्या स्पष्टपणें लक्षात येईल कीं, राष्ट्रीय स्वातंत्र्य हेंच मजुरांच्या दुःखविमोचनाचें एकमेव साधन आहे. अर्थात् तें साधन हातीं आणण्यास झटणारे मजुराच्या हितासाठीं खऱ्याखुऱ्या कळकळीनें झगडत आहेत असें नाहीं का सिद्ध होत?

---

## जहाल चळवळ. : : १३

"इन्किलाब झिंदाबाद" हा घोष आतां हिंदुस्थानात कोनाकोपऱ्यापर्यंत जाऊन दुमदुमला आहे. "क्रांति चिरायु होवो" (Long live Revolution) असा या घोषाचा अर्थ आहे. या घोषणेवर एक लहानसाच पण महत्त्वपूर्ण वादविवाद कांहीं वर्षापूर्वी झाला होता. 'क्रांति चिरायु होवो' हा महामंत्र सुप्रसिद्ध क्रांतिकारक सरदार भगतसिंग आणि त्यांचे सहकारी हे विशेष प्रामुख्यानें उच्चारीत. त्यावेळीं 'मॉडर्न रिव्ह्यू'चे विद्वान् संपादक श्री रामानंद यांनी अशी टीका केली कीं, " क्रांति ही समाजस्थितींत योग्य तें स्थित्यंतर घडवून आणण्याचें एक साधन आहे. असें स्थित्यंतर क्रांतीनें घडवून आणिलें कीं क्रांतीचें कार्य संपलें. 'क्रांति चिरायु होवो' असें म्हणणाऱ्यांना समाजांत नेहमींच दंगल माजून रहायला पाहिजे आहे काय? क्रांति सारखीच पेटत राहिली तर शांतता कशी लाभावी आणि शांतता मिळाल्याशिवाय संस्कृतीचें संवर्धन व संरक्षण कसें होईल?" रामानंद-बाबूंच्या या आक्षेपाला सरदार भगतसिंगनीं अत्यंत विचारप्रवर्तक उत्तर दिलें. "क्रांतिकारकांना नेहमींच उत्पात घडवून आणण्याची इच्छा नाहीं. पण एक स्थित्यंतर प्राप्त झाल्यावर समाज पुनः बुरसट होण्याची भीति असते. एका अवस्थेंत अमुक एका पातळीपर्यंत समाजाचा विकास झाला कीं समाज पुनः चैतन्यहीन बनूं लागतो, अशा वेळीं त्याला पुनः सजीव व प्रगत कर-ण्यास क्रांतीची आवश्यकता असते. या दृष्टीनें क्रांतीचें अस्तित्व नेहमीच

पाहिजे " याच वर्षी पुणें येथें भरलेल्या मुबई इलाखा युवक परिषदेच्या अध्यक्षपदावरुन प जवाहरलाल नेहरु यानीं पुढील महत्त्वपूर्ण वाक्यें उच्चारलीं होतीं—

प्रत्येक निर्कोप समाजात क्रातीचीं बीजें पाहिजेतच क्राति आणि स्थैर्य *या दोन टोकात समाज आदोलना राहिला पाहिजे "*

क्रातीच्या सामर्थ्याचीं हीं सूत्रें लक्षात घ्या समाजाचा प्रवाह तुनून नि सत्त्व होऊ नये म्हणून त्याला गति देण्याचें काम क्राति करते एकदा मिळालेलें स्थैर्य समाजाच्या विकासाला बाधक होऊ नये यासाठीं क्रातीचा अवतार असतो. अर्थात् क्रातीचे उपासक हे समाजाचा गाडा प्रगतिपथावर पुढें रेटणारे वीर होत याच्याच जीवनकार्याला जहाल चळवळ ( Leftist Movement ) असें नाव मी देत आहें.

केवळ बदल याचा अर्थ क्राति होऊ शकत नाहीं आज एकाद्या सोटे-शहानें सक्तीनें बालविवाह नव्हे तर शिशुविवाह सुरु केले तर तोहि एक आजच्या स्थितींत बदलच होईल पण ती काहीं क्राती होणार नाहीं जीर्ण व मृतप्राय झालेल्या गोष्टी उकरुन काढण्यात क्रातीचा हात नसतो नेहमीं नवी व पुढच्या प्रगतीची अवस्था समाजात निर्माण व्हावी याकरिता क्राति झटत असते ज्या परीक्षा मानवतेनें यशस्वी रितीनें पार पाडल्या त्या परीक्षाचा पुढला अभ्यासक्रम क्राति शिकविते क्रातीचा अवतार वर्तमानकाळात होतो खरा, पण तिची दृष्टी भविष्याकडे असते भूतकाळाशीं तिच्या पिढ्या तुटलेल्या असतात

केवळ बदल म्हणजे जशी क्राति नव्हे तद्वत् प्रस्थापित समाजयन्त्राची व सत्याची मोडतोड करणें एवढेंच क्रातीचें कार्य होऊ शकत नाहीं नव्हे, कित्ये कदा अशा मोडतोडीनें क्रातीचें बळ उणावतेहि. आपण मोडतोड कशा-करिता करतों आणि मोडून टाकलेल्या गोष्टींच्या जागीं नव्या व सरस गोष्टी *कोणत्या आणतों यावर क्रातीचें यश व स्वरुप अवलंबून असतें*

क्रांतीच्या रगाड्यांत बारकेसारके उपचार किंवा तंत्रमंत्र यांची उपेक्षा होते किंवा पुष्कळदां करावीहि लागते. आणि म्हणूनच खरा क्रांतिकारक कित्येकदां पुस्तकी क्रांतिवाद्यांना मवाळ भासतो! क्रांतिशास्त्र हें ध्येयवादाच्या प्रतिभेच्या पोटीं जन्म घेतें पण त्याचा संचार व वापर व्यवहारांत होतो हें ध्येयवादी क्रांतिकारक विसरत नाहीं. रशियन् राज्यक्रांतीच्या वेळीं सोव्हिएट रशियाचा जर्मनीशीं तह होणें हें अंतर्गत राजकारणाच्या दृष्टीनें आवश्यक होतें. त्याप्रमाणें लेनिननें आपल्या प्रतिनिधींतर्फे जर्मनश्रेष्ठींशीं तहाचें बोलणें लावलें. पुढें तहावर सह्या करतांना सोव्हिएट प्रतिनिधींनीं उमरावांसारखे आंखूड कोट घालून यावें असा आग्रह जर्मनश्रेष्ठींनीं धरला. कामगार संस्कृतीचे अभिमानी असलेले सोव्हिएट प्रतिनिधी यामुळें त्रस्त झाले. त्यांनीं लेनिनला तार करून याबाबत निर्णय मागितला. तेव्हां लेनिननें लगोलग कळविलें, "तह होत असेल तर उमरावी पद्धतीचे कोट घालून खुशाल जा." तह करून सरहद्दीवरील कटकटी एकदां बंद केल्या कीं अंतर्गत व्यवस्थेसाठीं लेनिनला निश्चिंती मिळणार होती. यावेळीं खरी महत्त्वाची गोष्ट कोणती हें ओळखून केवळ तात्त्विक मानापमानाच्या कल्पनांत लेनिननें तडजोड केली. गांधीजींच्या राजकारणांत हीच दूरदृष्टि आढळते. व्हॉईसरायला मुलाखत मागणें किंवा आडमुठ्या पुढाऱ्याच्या दाराशीं जाणें यांत गांधीजी अपमान मानीत नाहींत. मात्र मूलभूत गोष्टींच्या बाबतींत आपलें म्हणणें कदापि सोडणार नाहींत.

क्रांति हें जिवंत शास्त्र व शास्त्र आहे. त्याच्या तंत्राचें कायम असें अमुक स्वरूप म्हणून सांगतां येणार नाहीं. जगातील क्रांतिकारकांनीं तें एक पद्धतशीर शास्त्र बनविण्याचा प्रयत्न केला आहे खरा; तथापि प्रत्येक समाजांत व काळांत क्रांतीची उठावणी करण्यास हें शास्त्र कित्येकदां अपुरेंहि पडतें. तें पुरें करण्यांत विभूतीचें कर्तृत्व खरें प्रगट होतें. मिठाचा सत्याग्रह किंवा प्रायोपवेशन करण्याचा गांधीजी संकल्प सोडतात तेव्हां आपणाला देशांत कांहीं

हाल्चाल होईल की नाहीं याविषयीं संशयच असतो. पण त्या त्या चळवळींनीं विश्वव्यापी विराट्रूप धारण केलें म्हणजे गांधीजींचा संकल्प किती अचूक होता व तो किती योग्य क्षणीं त्यांनीं जाहीर केला याचें आश्चर्य करीत आपण मुग्ध होतों. क्रांति हें अस्त्र अमोघ आहे. पण तें वापरणारा साक्षात्कारी पुरुषच असावा लागतो. कोणत्या वेळीं कोणता पवित्रा टाकायचा, कोणत्या प्रसंगीं कोणती भावना चेतवायची, हल्ला कशावर करायचा आणि तडजोड कुठें करायची ह्याविषयीं अशा महानुभावाची प्रज्ञा बिनतोड निर्णय घेत असते

क्रांति ही लढ्याची मालिका असते अनेक वर्षे देशाची तयारी करून एका मोहिमेंत ध्येय गाठू म्हटलें तर जमेलच असें नाहीं पाण्यात पडल्यानेंच पोहण्याची कला येते. त्याप्रमाणें क्रांति करण्याचे प्रयत्न केले म्हणजेच क्रांतिशीलता वाढत जाते. जगातील अनेक क्रांत्यांचे इतिहास आपण वाचले तर असें दिसेल कीं अखेरची यशस्वी क्रांति व्हायच्या पूर्वी अनेक लहान मोठ्या अपेशी मोहिमा लढूनच क्रांतिकारकांनीं सामर्थ्य उत्पन्न केलें. क्रांतीचा लढा अगलट आला तरी त्यासाठीं झालेली संघटना व त्यात आलेले अनुभव वाया जात नाहींत. सच्या क्रांतिकारकाच्या दृष्टीनें क्रांति अखेर विजयी होणार हें निश्चितच असतें. क्रांतीचें हें स्वरूप ज्याना आकलन होत नाहीं त्याना मधेंच क्रांतीचा एखादा डाव फसला तर अंतर्यामीं समाधान होतें गंभीर व समंजस चेहरे करून हे निष्क्रिय लोक विचारतात, "पहा, आम्ही म्हणत नव्हतों डाव अंगाशी येईल म्हणून " पण जग अशा स्वास्थ्यप्रिय सज्जनाच्या कर्तृत्वानें काहीं प्रगत होत नाहीं. जगाला गति मिळते ती क्रांतिध्वज घेऊन यशापयशाची पर्वा न करता झुंजणाऱ्या वेडिरांची ध्येयवायामुळेंच मिळते.

हें प्रवचन ऐकताना यात जहाल चळवळ कुठें आली असें विस्मयानें विचारण्याचा भाव मला तुमच्या चेहऱ्यावर दिसतो आहे! विषयाचें अनुसंधान मी सोडलेलें नाहीं. पण हिंदी जहाल चळवळीचा जो वृत्तांत मी तुम्हाला सांगणार आहे तो लक्षात येण्यास क्रांतिशास्त्राचीं सूत्रें अगोदर तुम्हीं लक्षात

घ्यावीं असें मला वाटलें. कारण त्यामुळें जहाल चळवळींतल्या नाना गटांचीं लक्षणें तुम्हांला लौकर कळतील. असो. एक लक्षांत ठेवा कीं कालचा जहाल हा कदाचित् आजचा मवाळहि ठरणें शक्य असतें. कांहीं वर्षांपूर्वीं कानाची पाळी केशकलापानें झांकून अंबाडा बांधणें फार सुधारणेचें लक्षण गणलें जाई. अशी महिला स्त्रीवर्गांत चर्चेचा विषय होई. आज पाठीवर सर्रहा शेपटे सुटले आहेत अशा काळीं तीच स्त्री जुन्या वळणाची म्हणून गणली जाईल. पण ह्या बाह्य वेषभूषेंत बदल झाला तरी सौंदर्याचीं कांहीं सूत्रें न बदलणारीं असतात. कित्येक क्रांतिकारक अगोदरच काळाच्यापुढें जाऊन बसलेले असतात तर कित्येक नव्या युगाशीं तात्काळ समरस होऊन अग्रभागीं येतात. अशांना मागें पडण्याची भीति नसते.

हिंदुस्थानांतील पहिले जहाल हे शस्त्राचारी क्रांतिकारकच म्हणतां येतील. यांचा देशाभिमान जाज्वल्य होता. त्यांना हा भारतवर्ष स्वतंत्र करण्याची तीव्र तळमळ लागलेली होती आणि स्वातंत्र्याकरितां सर्वस्व समर्पण करण्याची किंवा कसल्याहि भयंकर साहसांत उडी घेण्याची त्यांची तयारी होती; पण त्यांनीं वैयक्तिक अत्याचाराचा जो मार्ग पत्करला तो यशस्वी होण्याचा सुतराम् संभव नव्हता. चोहींकडून कोंडलेल्या वाघाची जशी अवस्था व्हावी तशी या क्रांतिकारकाची झाली होती. परसत्तेविषयीं पराकाष्ठेचा तिटकारा आणि देशांत राजकीय जागृतीच्या नांवानें पाहावें तो घनघोर अंधार; अशा स्थितींत हा एक प्रकारचा निराशावादी पंथ त्यांना पत्करावा लागला. दहशतवाद (Terrorism) ही राजकीय जागृतीची अगदीं बाल्यावस्था असते. दहशतवाद परिणामकारक तर ठरत नाहींच पण सरकारला दडपशाही करायला मात्र त्या योगें चांगलें फावतें.

लोकमान्य टिळक हे आपल्या काळांतले मोठे जहाल होते. किंबहुना 'जहाल' ह्या शब्दाचा जन्मच मुळीं टिळकांच्या राजकारणानें झाला. टिळकांच्या वेळीं भाषेची व वक्रोक्तीची आतषबाजी करून टिळकापेक्षाहि आपण

जहाल आहोत असं भासविणारे काही लोक होते. टिळकाजवळ या नाट्य गुणाचा संपूर्ण अभाव होता. हेंहि त्याच्या लोकोत्तरतेचेंच एक लक्षण म्हटलें पाहिजे. टिळकांच्या वेळच्या या इतर राष्ट्रशूर जहालानीं बुद्धिमान् वर्गाला काहीं काळ जरी भुरळ पाडली असली तरी बहुजनसमाज टिळकानाच जहालाचे एकमेव नेते म्हणून ओळखून होता. टिळकांचे पहिले सहकारी आगरकर हे श्रद्धेऐवजीं बुद्धिप्रामाण्यावर भर ठेवणारे जहाल नेते होते. दुर्देवानें त्याचें सारें कर्तृत्व प्रकट व्हायचा योग आला नाहीं. पण वेगवेगळे जहाल गट आज ज्या बुद्धिप्रामाण्याचा उदो उदो करीत असतात त्या बुद्धिप्रामाण्याची मुहूर्तमेढ आगरकरानीं रोवली हें निःसशय. राजकीय क्रातीबरोबरच सामाजिक क्रातीहि झाली पाहिजे हा विचार आगरकर तळमळीनें माडत असो.

मी टिळकाना 'जहाल' म्हटलें त्याबद्दल आणखी थोडें खुलासेवार सागितलें पाहिजे. टिळकाना कॉंग्रेसमध्यें मानाचें स्थान मिळू लागपर्यंत कॉंग्रेसमध्यें वरच्या वर्गाचें प्राबल्य होतें. पण कॉंग्रेसमध्यें अथवा कायदेमडळात प्रभाव पाडायचा असेल तर बहुजन समाजाची सघटना आपल्या मागें पाहिजे हें टिळकानीं प्रथम ओळखलें होतें. इतर पुढारी आपल्या विद्वत्तेनें व बुद्धिप्रकर्षानें कॉंग्रेसमध्यें व सरकारात वजन पाडीत. टिळक हे बहुजन समाजाच्या पाठिंब्यामुळें श्रीमत पुढारी व सरकार याना सारखेच कदनकाळ भासत. इग्रजी राज्यानें बहुजनसमाजाची पिळवणूक झाली ही जाणीव टिळकानीं प्रथम निर्माण केली म्हणूनच "हिंदी असतोषाचे जनक" ( Father of Indian Unrest ) अशी समर्पक पदवी या जहाल लोकाग्रणीला इग्रजानीं दिली !

जहालपणाचें हे कुलव्रत गाधीजींनीच लोकमान्यानतर चालविलें. आज स्वतःला जहाल म्हणविणारे काही गट गाधीजींना 'जहाल' म्हणण्यास तयार नाहींत. पण गेल्या २२–२३ वर्षातला इतिहास पाहिला तर जहालपणाचा खरा आविष्कार सामुदायिक उठावणी करून एकट्या गाधीजींनी केला आहे

असें दिसेल. सूर्य उगवल्याबरोबर जसा त्याचा प्रकाश कोनाकोपऱ्यांत पसरतो त्याप्रमाणें गांधीजींनीं आपल्या तत्त्वज्ञानाचा स्पर्श राष्ट्रांतल्या प्रमुख अशा बहुतेक सर्व विषयांना घडविला आहे. शिक्षणांत त्यांनीं नवीन योजना काढली, त्यांनीं पोषाखांत क्रांति केली, आहारशास्त्रावर त्यांनीं स्वानुभवाच्या बळावर नवीन पद्धति काढली, अहिंसेच्या तत्वज्ञानाला नवा अर्थ व विशाल कार्यक्षेत्र मिळवून दिलें, खादी व ग्रामोद्योग काढून अर्थशास्त्राला नवी चालना दिली आणि राज्यघटनेबद्दल आधुनिक अराज्यवादाइतक्या ( Anarchism ) क्रांतिकारक कल्पना त्यांनीं व्यक्त केल्या. क्रांति ही अंतर्बाह्य व सर्वांगीण व्हावी लागते हें ज्याना पटलें व ज्यांनीं स्वतः तें आचरून लक्षावधि लोकांना त्याची दीक्षा दिली असे जहाल एकटे गांधीजीच आहेत. सौम्येन्द्रनाथ टागोर या माजी कम्युनिस्ट पुढाऱ्यानें गांधीजींवर केलेल्या निर्दय टीकेला उत्तर देतांना पं. जवाहरलाल नेहरू म्हणतात–"रूढ अशा नियमानी पाहतां गांधीजी कदाचित् क्रांतिकारक भासणार नाहींत. पण त्याच्या कांहीं विशिष्ट पद्धतीनें ते क्रांतिकारक आहेत. आणि त्यांनीं ज्या ज्या वेळीं मोठ्या चळवळी केल्या त्या त्या वेळीं बहुजन समाजाच्या उद्धाराची योजनाच त्यांच्या पाठीशीं होती."

गांधीजींच्या तत्वज्ञानाबद्दल व अवतार कार्याबद्दल मीं वेळोवेळीं तुम्हांला सांगितलेंच होतें. म्हणून तो मुद्दा येथेंच संपवून मी गांधी युगांतील इतर जहाल पंथांकडे वळतों. त्यांत पहिला कम्युनिस्ट पक्ष हा येतो. 'कम्युनिस्ट' हा शब्द उच्चारताच तुमच्या चेहऱ्यावर हास्य उमटतें. 'आतां कांहींतरी टीका सुरू होणार' असा अंदाज तुम्ही करीत आहात हें मला स्पष्ट दिसतें. पण आतां मात्र मी तसें कांहीं करणार नाहीं. रूढ राजकारणाला संपूर्ण विरोधी पक्ष म्हणजे जहाल असें जर म्हणायचें असेल तर कम्युनिस्ट हे पहिल्या दर्जाचे जहाल म्हणतां येतील. १९२० नंतर कम्युनिस्ट चळवळीचा उदय झाला तेव्हा संपूर्ण नवें असें कांहींतरी आपण ऐकत अस-

त्याचा भास हिंदी लोकाना झाला. हिंदी परंपरेहून अगदीं वेगळें असें प्रत्येक बाबतींत कम्युनिस्टाचें म्हणणें होतें. धर्म व ईश्वर या गरिबांची झुंजारवृत्ति मारून टाकणाऱ्या अफूच्या गोळ्या आहेत असें कम्युनिस्ट म्हणत. श्रद्धा, गूढवाद याना त्याचा कसून विरोध होता. खाजगी संपत्ति नष्ट करण्याचें व समताराज्याची स्थापना करण्याचें त्याचें ब्रीद होतें. आजची नीति व संस्कृति सारी विषमतेवर उभारलेली आहे म्हणून ती नष्ट करून नवी साम्यवादावर उभारलेली नीति व संस्कृति स्थापणें हें कम्युनिस्टाचें ब्रीद होतें. कम्युनिस्टाच्या तत्वज्ञानाचा आराखडा तपासून पाहण्याचा आजचा प्रसंग नाहीं. मला एवढेंच सांगावयाचें आहे कीं जहाल चळवळींत एक अगदीं नवा, हिंदी परंपरेशीं दूरचाहि संबंध नसलेला प्रवाह कम्युनिस्टानीं आणून सोडला.

१९२७ पासून आपणाला देशभर युवकसंघाचें (Youth Leagues) जाळें हळूं हळूं पसरत चाललेलें दिसतें. पं. जवाहरलाल नेहरू यांच्या व्यक्तित्वानें मोहित झालेले तरुण या चळवळींत होते. या वेळीं कॉंग्रेसची गाडी सनदशीरपणाच्या आडवळणाला जाऊन पडली होती. कायदेमंडळातले वाचिक पराक्रम म्हणजे स्वातंत्र्याच्या लढ्यातली यशस्वी गोलंदाजीच आहे असें लोकांना वाटूं लागलें होतें. अशा सनदशीरपणाकडून पुनः स्वातंत्र्याच्या मुख्य रुळावर कॉंग्रेसची गाडी कशी आणतां येईल या चिंतेंत नेहरू, बोस इ. कॉंग्रेसमधील त्यावेळची युवक मंडळी गढलेली असत. युवकसंघानीं या बाबतींत चांगली जागृति केली. प्रांतोप्रांतीं युवक परिषदा भरूं लागल्या आणि कायदेमंडळाबाहेरच खरा स्वातंत्र्याचा लढा असतो ही जाणीव या परिषदांच्या द्वारा पसरूं लागली. लाहोर येथें कॉंग्रेसमध्यें पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास झाला आणि पं. जवाहरलाल नेहरूंसारखा तडफदार तरुण नेता अध्यक्षपदावर येऊं शकला याचें बरेच श्रेय युवक संघटनेलाच द्यावें लागेल. सायमन् कमिशनवरील बहिष्कारात युवकसंघानीं अत्यंत उत्साहानें भाग घेतला; आणि पुढें १९३४ सालीं कायदेभंगाची मोहिम जेव्हा सुरू झाली तेव्हा तर *या संघटनेनें अगणित पुढारी व अनुयायी पुरविले.*

'युवक संघ' ही निश्चितपणें जहाल चळवळ असे असलें तरी शास्त्रशुद्ध असें तत्त्वज्ञान प्रथम तिला नव्हतें. ही कांहींशीं तरुणांची काव्यमय (रोमँटिक) चळवळ आहे असेंच उपहासानें तिच्याविषयीं म्हटलें जाई. पण मी स्वानुभवानें सांगतों कीं 'युवक संघ' चळवळींत काव्यमयता असली तरी कळकळहि होती. युवक नेते हिंदी स्वातंत्र्याचे कट्टे उपासक होते आणि सामाजिक बाबतींत त्यांचा दृष्टिकोण उदार होता. कॉंग्रेसमधील जुन्या पुढाऱ्यांच्या मागें आपण शौर्यांत व स्वार्थत्यागांत खास पडणार नाहीं हें वेळ येतांच त्यांनीं सिद्ध केलेंच.

३० सालच्या कायदेभंगांत युवक नेते कारागृहांत गेले आणि तुरुंगवासांतील एकांताचा फायदा घेऊन त्यांनीं जगांतल्या नव्या विचारप्रवाहांचा व राष्ट्रवादाचा कसून अभ्यास केला. तुरुंगांतून बाहेर येतांना बरेचसे समाजवादीच होऊन आले. आणि कॉंग्रेसमध्यें समाजवादी असा एक गट तयार झाला. मजूर चळवळीविषयीं सांगतांना मीं तुम्हांला या गटाची म्हणजे कॉंग्रेस समाजवादी पक्षाची थोडीशी माहिती दिलीच होती. जहाल गटांची ही माहिती पुरी करण्यासाठीं मला नेहरू आणि रॉय यांच्या कामगिरीबद्दल थोडें सांगावें लागेल. कॉंग्रेसमधील जहाल गटाशीं पं. नेहरू पूर्णपणें कधीं समरस झाले नाहींत हें जरी खरें असलें तरी नेहरूंच्या स्फूर्तिप्रभेनेंच कॉंग्रेसमधील जहाल गटांचें पोषण झालें हें कोणी नाकारू शकणार नाहीं. गेल्या २०-२२ वर्षांत निरलस व तन्मयतेचा प्रसार करून पंडितजींनीं अनेक प्रगतिपर कल्पना देशभर लोकप्रिय केल्या. पंडितजींनीं समाजवादाचा पुरस्कार करताच त्या तत्त्वज्ञानाविषयीं सर्वत्र कुतूहल उत्पन्न झालें. चेस्टरफील्ट फर्निचरवर सुखेनैव पडलेल्या मदालसाहि या तत्त्वज्ञानाकडे उत्कण्ठेनें पाहूं लागल्या. नागरीक हक्कांची (Civil liberties) जाणीव लोकांना व्हावी यासाठीं पंडितजींनीं एक मध्यवर्ती मंडळ स्थापिलें, घटनासमितीसाठीं राष्ट्राची तयारी केली आणि देशी उद्योगधंद्यांचा विकास व्हावा यासाठीं राष्ट्रीय संयोजन-

समितीचा व्याप माडला हुकूमशाही विरुद्ध लोकशाही या लढ्यात हिंदुस्थानने लोकशाहीचाच ध्वज कसा उचलून धरला पाहिजे हे त्यानीं सागितलें लोकमान्यानीं राष्ट्रात असतोष निर्माण करून राष्ट्रीय लढयासाठीं योग्य भूमिका तयार केली, गाधीजींनी प्रत्यक्ष स्वातन्त्र्यसग्रामाला सुरुवात करून त्याचें तत्र बहुजनसमाजाला शिकविलें, आणि प नेहरूंनी आपल्या राष्ट्रीय लढ्याला आतरराष्ट्रीयतेची बैठक देऊन तो व्यापक केला या तीन नेत्याना आपापल्या काळातले जहाल अग्रणी म्हणणें योग्य नाहीं का ?

हिंदुस्थानातल्या क्रातिकारक विचारसरणींत त्याच्या लोकोत्तर प्रतिभेने भर घातली त्या एम एन् रॉय याचा उल्लेख न केला तर जहाल चळवळीचें वर्णन अपुरें राहील हिंदुस्थानाबाहेर रॉय याचें बरेच दिवस गेले त्यानीं एक दोन राज्यक्रात्यात भाग घेतला रशियात नवीन सृष्टि स्थापण्यात त्यानीं लेनिनबरोबर पुढाकार घेतला होता कम्युनिझम् या विषयात त्याचा अधिकार फार मोठा आहे हिंदुस्थानातल्या अनेक राष्ट्रीय प्रश्नाचें मूलगामी व शास्त्रीय विवेचन अगदीं प्रथम रॉयनींच केलें श्रद्धेवर आधारलेली आपली परपरागत सस्कृति टाळून विज्ञानाधिष्ठित अशी नवी सस्कृति आपण पत्करली पाहिजे असा कडवा प्रचार रॉयनीं आजवर केला ते पहिल्या रागेंतले कम्युनिस्ट पुढारी असले तरी रशियाच्या आहारी कधींच गेले नाहींत दुर्दवानें हिंदुस्थानात त्याचें राष्ट्रीय पक्षाशी जमलें नाहीं आणि ते आज आपल्या चार अनुयायासह वेगळे ठाण माडून बसले आहेत। हिंदी मनोवृत्तीला आवाहन करण्यात रॉय अपेशी ठरले असले तरी रूट हिंदी राजकारणाचे क्रातिकारक भाष्यकार व तात्त्विक टीकाकार ह्या पदव्या त्याना कोणीहि नाकारणार नाहीं रॉयचे सिद्धात अगम्य वाटले किंवा त्याच्या परस्परविरोधी वर्तनातली त्याच्या चार भक्तानाच कळणारी सुसगति कोणी जाणू शकला नाहीं तरी रॉयच्या उच्च स्थानावरून त्याना कोणीच खालीं ओढणार नाहीं

अलीकडे काग्रेसमध्यें विशेष नावारूपाला आलेला गट म्हणजे किसान पुढाऱ्याचा होय तसें पाहिलें तर कॉंग्रेस ही मुख्यत किसानाचीच सस्था आहे

काँग्रेसनें राष्ट्रीय संग्रामाच्या ज्या तीन चार मोहिमा केल्या त्या सर्व किसानांनीं आपल्या म्हणून ठरविल्या; इतकेंच नव्हे, तर त्यांत मोठ्या उत्साहानें भाग घेतला. गांधीजी, सरदार पटेल, बाबू राजेंद्रप्रसाद ह्यांचें किसानामधील कार्य डोळ्यांत भरण्यासारखें आहे. खादी, ग्रामोद्योग यांनी शेतकऱ्यांच्या घरापर्यंत काँग्रेसचें माहात्म्य पोचविलें. परंतु जुने काँग्रेस पुढारी हे नेमस्त वृत्तीचे व सरकार आणि सावकार याचे छुपे चहाते आहेत असा जहाल किसानाचा ग्रह झाला आणि काँग्रेसमध्यें काहींशी विरोधी फळी त्यानीं तयार केली. काहींनीं काँग्रेसबाहेर राहून आपली भक्कम संघटना बनविली आणि तिच्या जोरावर काँग्रेसमध्यें प्रतिनिधित्व मिळावें अशी मागणी केली. काँग्रेस सरकारे अधिकारपदावर असताना व त्यापूर्वीहि प्रांतोप्रातीं भरणाऱ्या किसान परिषदात ह्या नव्या किसान पुढाऱ्यानीं आपली चमक बरीच दाखविली. युद्ध सुरू झाल्यानंतर मात्र कांहीं जहाल किसान पुढारी दुर्दैवानें कम्युनिस्टाच्या कारवायांना बळी पडले आणि तेवढ्यापुरती त्यांची राष्ट्रवादापासून ताटातूट झाली !

रॉयसाहेबांच्या या चिकित्सेचा बराचाईट अनुवाद पुष्कळांनी केलेला आढळेल. या टीकाकाराचा उद्देश कॉंग्रेसमध्यें क्रांतिविरोधी पुढाऱ्यांचें प्राबल्य आहे असें सागण्याचा असतो कॉंग्रेसचें आजचें स्वरूप एकजिनसी नाहीं हें कुणीहि मान्य करील. देशाच्या स्वातंत्र्यासाठीं तळमळणारे व कृति करू इच्छिणारे अनेक पक्ष तींत एकवटले आहेत आणि पुष्कळदा परस्परविरोधी पक्षांना जुळेल अशी तोड काढताना कॉंग्रेसचे काहीं कार्यक्रम मिळमिळीत किंवा विचित्र होतात हें खरें परंतु कॉंग्रेसच्या विकासाला किंवा तिच्या जहालपणाला तीमधील विविधता बाधक झाली असें मुळींच सिद्ध करून देता येणार नाहीं. जेव्हा जेव्हां एकाद्या महत्वाच्या प्रश्नावर रणें माजलीं तेव्हा नेमस्त पक्षाला माघार घ्यावी लागली किंवा बाहेर पडावें लागलें कॉंग्रेसमध्यें जहाल पक्षाचा नेहमींच वरचष्मा राहत गेला. प्रथम नेमस्त बाहेर पडले, मग जिनाप्रभृति जात्यंध मुसलमानांनीं कॉंग्रेसमधून काढता पाय घेतला, पुढें प्रतिसहकारवादी निघाले, शेवटीं महासभेच्या नेत्यांनीं प्रस्थान ठेवलें वरवरच्या वर्गाच्या आणि कमी कमी क्रांतिकारक अशा पुढाऱ्यांची ही जी पद्धतशीर गैरहजेरी लागत गेली तीवरून कॉंग्रेसमध्यें सदैव जहाल गटच विजयी ठरत गेला असें दिसत नाहीं काय ?

यावर आपल्यापैकीं एक जण मला " त्रिपुरी कॉंग्रेसमध्यें काय घडलें ? " असें विचारील आहेत त्रिपुरी येथें मवाळ गट विजयी झाला आणि जहाल गट बाहेर पडला असें त्यांना म्हणावयाचें आहे असें दिसतें. हा प्रश्न विचारल्याबद्दल मला आनंद वाटला नाहीं तरी मी त्यावर येणारच होतों. त्रिपुरी येथील कॉंग्रेसच्या अध्यक्षपदाकरिता डॉ पट्टाभिसीतारामय्या व बाबू सुभाषचंद्र असे दोन उमेदवार उभे होते या पैकीं 'पट्टाभि' हे जुने व गांधीवादी, सुभाषबाबू हे नवे जहाल आदल्याच वर्षी हरिपुरा येथें सुभाषचंद्र अध्यक्ष झाले असल्यानें पुन त्यांनीं अध्यक्षपदाकरिता उभे न राहता तो मान आणखी एकाद्या लायक व श्रेष्ठ देशभक्ताला मिळू द्यावा अशी जुन्या कॉंग्रेस

पुढाऱ्यांची इच्छा होती. पण सुभाषचंद्र दाडगाईनें उभे राहिले. आणि त्यांनीं असें भासविलें कीं, 'येऊं घातलेलें घातकी फेडरेशन मुळांत उध्वस्त करण्यास कोणी तरी जहाल नेता पाहिजे म्हणून मी उभा राहिलों.' आणि असेंहि सूचित केलें कीं येऊं घातलेलें हें अराष्ट्रीय फेडरेशन पत्करण्यासंबंधीं जुन्या कॉंग्रेस पुढाऱ्यांनीं सरकारशीं कांहीं गुप्त करार केला आहे! सुभाषबाबूंचें हें वर्तन गर्ह्य होतें. वर्षभर अध्यक्ष म्हणून ज्या पुढाऱ्यांशीं सहकार्यानें त्यांनीं काम केलें त्या पुढाऱ्यांबद्दल असलें बदनामीकारक व खोटें विधान जाहीरपणें त्यांनीं करायला नको होतें! असो. 'पट्टाभीं'च्या मानानें सुभाषचंद्र हे केव्हांहि अधिक लोकप्रिय! त्यांचें वैयक्तिक आकर्षण जबरें. तेव्हां त्याना अधिक मतें पडून ते अध्यक्षपदीं निवडून आले! जहाल गटाचा जय झाला! 'पट्टाभि' पडले. पुढें कॉंग्रेस वर्किंग कमिटीच्या १५ पैकीं १२–१३ जुन्या सदस्यांनीं राजिनामे दिले! नवी वर्किंग कमिटी बनविण्याचें काम सुभाषचंद्रावर येऊन पडलें!

या प्रकरणाला कोणी १९०७ मध्यें घडलेल्या सुरत कॉंग्रेसची पुनरावृत्ति असें म्हणतात आणि सुभाषचंद्रांना टिळकांची पदवी देतात! परंतु ही तुलना भ्रामक आहे. कसें तें पहा. सुरत कॉंग्रेसमध्यें टिळकांनीं ज्या प्रतिष्ठित पुढाऱ्यांशीं सामना दिला ते वरच्या वर्गाचे नेमस्त पुढारी होते आणि टिळकांना बहुजन समजात प्रचंड वजन होतें. गांधीजी, सरदार पटेल, राजेंद्रप्रसाद, गफारखान इ० ज्यांना धुडकाविण्याचा चंग सुभाषनीं बांधला, त्यांच्यापेक्षां हिंदी बहुजनसमाजांत सुभाष अधिक लोकप्रिय होते असें कोण म्हणूं शकेल? अर्थात् ही तुलना होऊंच शकत नाहीं. शिवाय टिळकांनीं आपल्या सहकाऱ्यांवर गंभीर आरोप केले नाहींत. आणि वैयक्तिक महत्त्वाकांक्षेचा वासहि टिळकांनीं दिलेल्या सामन्यात येत नाहीं. सुभाषबाबूंच्या बद्दल असा निर्वाळा देता येईल काय?

सुभाषचंद्रांचा विजय म्हणजे कॉंग्रेसमधील जहाल गटानें जुन्या पुढाऱ्यांवर केलेली मात असें म्हणणें युक्त होणार नाहीं. कारण त्रिपुरीला कॉंग्रेस भरली

असता पं. गोविंद वल्लभपंत यानीं जुन्या अधिकारसन्यास घेतलेल्या पुढाऱ्यावर विश्वास प्रकट करणारा ठराव मांडला तो प्रचंड बहुमतानें पास झाला! यानंतर जुन्या पुढाऱ्याखेरीज कॉंग्रेसचें राजकारण चालविता येतें कीं नाहीं याचा अदाज थोडे दिवस सुभाषबाबूंनीं घेतला पण तें जेव्हा आवाक्याबाहेर असल्याचें त्याना आढळून आलें तेव्हा सुभाषचंद्रानीं अध्यक्षपदाचा राजीनामा दिला।

अशा रीतीनें त्रिपुरीला जुने प्रतिष्ठित पुढारी भरवशाचे ठरले पण यात जहालाचा पराभव झाला असेंहि मी म्हणावयास तयार नाहीं. मीं तर असें म्हणेन कीं आणीबाणीच्या प्रसगीं कॉंग्रेसचीं शकलें होऊ नयेत आणि सरकार व हिंदविद्वेषी लोक यांचे नवस सफळ होऊ नयेत म्हणून जयप्रकाशप्रभृति कडव्या जहालानीं योग्य मार्गदर्शन केले आणि सुभाषचंद्राची पाठराखणी करण्याचें नाकारलें! सुभाषचंद्रानीं 'डाव्या'च्या बाजूनें घड पुकारलें खरें पण अगोदर 'डाव्या'ची संघटना करण्याची त्यांनीं खबरदारी घेतली नव्हती म्हणून वैयक्तिक विजय मिळूनहि ते अखेर स्थानभ्रष्ट झाले

हिंदुस्थानात पं जवाहरलाल नेहरू याना जहालाचे नेते म्हणून अमुप प्रतिष्ठा लाभली आहे त्रिपुरीला घडलेल्या या प्रक्षोभक प्रसगीं पंडितजी काय करतात याकडे सर्वांचें लक्ष लागून राहिलें होतें यावेळीं भावनावश न होता किंवा खोट्या व वाझ जहालवादाचे भक्ष्य न बनता पंडितजींनीं सुभाषबाबूंच्या बडखोरीचा कडक निषेध केला लोकप्रवादाची तमा पंडितजींनीं बाळगिली नाहीं आजच्या या विषयाचा समारोप करताना पं नेहरूंनीं त्या वेळीं केलेल्या तर्कशुद्ध चिकित्सेंतले मीं काहीं उतारे दिले तर तुम्ही मला दुवा द्याल. 'आपण कोठें आहोंत?' (Where are we?) या मथळ्याची एक लेखमाला पंडितजींनीं त्या वेळीं आपल्या 'नॅशनल हेरल्ड' या पत्रात लिहिली गांधीवाद, अहिंसा, जहाल विरुद्ध मवाळ गट, सयुक्त

नेतृत्व, इ० अनेक विषयांचा परामर्ष या लेखमालेंत पंडितजींनीं घेतला आहे. त्यांतले आजच्या विषयाला लागू पडतील एवढे उतारे देतों. ऐका—

"मोठ्या मतभेदाच्या छटा अवश्य असाव्यात परंतु पुनः त्या एका सांखळींत सांधलेल्याहि असल्या पाहिजेत. कॉंग्रेसमध्यें स्थूल मानानें दोन मोठ्या फळ्या आहेत. (पण जहाल व मवाळ अशीं नांवें त्याना देतां येणार नाहींत.) एक गांधीवादी आणि दुसरे आपणांला आधुनिक (Modernist) समजणारे. हे शब्द चप्खल किंवा अचूक आहेत असें नाहीं. कारण त्यायोगें गांधीवाद म्हणजे कांहीं जीर्ण व मुदतीबाहेर गेलेला पंथ आहे असा समज होतो. उलट, खरें पाहिलें तर गांधीवाद हा अगदीं आधुनिक आहे आणि कांहीं बाबतींत तर तो आधुनिक काळाच्याहि पुढें आहे. मात्र पाश्चात्य आधुनिकपणापेक्षां तो वेगळा आहे आणि त्यांत कांहीं धार्मिक छटा मिसळलेल्या असल्यानें विज्ञानाच्या आधारावर चाललेल्या आजच्या उत्कृष्ट युरोपीय विचारांशीं त्याचें जुळत नाहीं.........परंतु गांधीवादी तंत्राचा आधुनिक शुद्ध शास्त्रीय दृष्टीनें विचार होऊन तें विज्ञानाच्या भूमिकेवर कां आणतां येऊं नये कळत नाहीं.

"(कॉंग्रेसमध्यें) जे आपणाला आधुनिक म्हणवितात त्यांत वेगवेगळ्या पंथाचे समाजवादी आणि विज्ञान व प्रगति यांवर संदिग्धपणें बोलणारे पुढारी यांचा समावेश होतो. यातले कित्येक जुन्यापुराण्या राष्ट्रवादाचे अवशेष आहेत आणि विज्ञानशास्त्रें किंवा प्रगति यांच्याशीं त्याचा कसलाहि संबंध नाहीं.

"म्हणून हे स्थूल दोन विभाग (Rightist) व डावे (Leftist) म्हणतां येणार नाहींत. दोनहि पक्षांत उजवे डावे आहेत. आणि आमच्यांतले कित्येक लढाऊ वीर गांधीपक्षात आहेत. डावे आणि उजवे या दृष्टीनें कॉंग्रेसकडे पाहायचें असेल तर असें म्हणता येईल कीं, लहानशी उजव्यांची

फळी व अल्पसंख्य डावे या दोन टोकांच्या मध्यें अनेक पक्ष असून ते सर्व डाव्या मध्यकेंद्राकडे झुकलेले आहेत या लोकांतच गांधीगट येतो राजकीय-दृष्ट्या कॉंग्रेस ही पूर्णपणें डावी म्हणजे जहाल आहे, कॉंग्रेसचें सामाजिक तत्वज्ञान डावेपणाकडे झुकलेले पण प्रामुख्यानें मध्यकेंद्रित आहे आणि शेतकऱ्याच्या बाबतींत कॉंग्रेस त्याची कैवारी आहे.

"काहीं समाजवादी लोक जुन्या पुढाऱ्यांना उखडून त्या जागीं नवें नेतृत्व प्रस्थापित करण्याची भाषा उघडपणें बोलतात आणि हें कार्य करण्यासाठीं दैवानें आपली योजना केलेली आहे असें त्यांना वाटतें स्थानिक कॉंग्रेस कमिट्यांतून आपले उमेदवार निवडून आणण्याचा हे प्रयत्न करतात त्यामुळें असा समज होतो कीं या समित्यांचा ताबा घेऊन त्या चालविण्याचा यांनीं मनसुबा केला आहे लोकशाहीच्या दृष्टीनें त्यांना तसा अधिकार आहे. पण त्यांचे प्रयत्न व त्यांचें तंत्र त्यांच्या विरुद्ध जातें आणि तटस्थ पक्ष बिचकून त्यांच्या विरुद्ध असलेल्या फळीमध्यें जाऊन उभे राहतात अशा रीतीनें ज्यांना समाजवाद खरोखर पटायचा असेच तिऱ्हाईत लोक दूर लोटले जाऊन त्यांचे वैरी बनतात.. ...

"मी स्वत जुने पुढारी आणि नवे समाजवादी पंथ यांच्यातलें अंतर नाहींसें करण्यासाठीं झटत असतों आणि दोनहि पक्षांत मला प्रवेश असल्यानें या कामीं मी थोडाबहुत लायक असें वाटतें. माझी अशी खात्री झाली आहे कीं हिंदुस्थानला या दोन पक्षांतल्या कोणालाहि वगळून चालणें शक्य नाहीं आणि या दोन पक्षांत साम्राज्यशाहीविरुद्ध लढण्यात एकोपा का होऊ नये याचें सयुक्तिक कारण मला तरी दिसत नाहीं जुने पुढारी हे अनुभवी असून त्यांना बहुजनसमाजात प्रतिष्ठा व वजन आहे आणि अनेक वर्षें स्वातंत्र्य संग्रामाचें नेतृत्व त्यांनीं केलेलें आहे त्यांना मवाळ किंवा उजवे म्हणता येणार नाहीं राजकीय दृष्ट्या ते कडवे डावे आणि कट्टे साम्राज्यविरोधी आहेत. कॉंग्रेसबाहेर राहून त्यांना पाठबळ देणारे गांधीजी हे त्यांचे तसेंच देशाचेंहि

## राष्ट्र म्हणजे काय ? : : १४

प्रथम काँग्रेसचा इतिहास मीं सांगितला आणि नंतर लोकशाहीच्या विकासाचे कथन केलें. गेल्या ५०–५५ वर्षांत राष्ट्रवादाची वाढ राष्ट्रीय पुढाऱ्यांच्या कर्तृत्वानें व बहुजनसमाजाच्या चळवळींनीं कशी झाली हें मीं दाखविलें. गंगेच्या ओघाबरोबर हिमालयातील अत्यंत सुपीक द्रव्यांनीं युक्त अशी माती शतकानुशतकें वाहत आल्यानें कांठचा प्रदेश सुपीक झाला आहे. राष्ट्रीय चळवळींच्या जिवंत वाढत्या ओघाला हीच उपमा देता येईल. या चळवळींनीं देशांत पसरून दृढमूल केलेली राष्ट्राभिमानाची भावना वाढत चाललेली आपणांला स्पष्ट दिसत आहे. माझ्या कुठल्याहि विवेचनांत राष्ट्रवाद आणि लोकशाही यांचा स्पष्ट किंवा अस्पष्ट उल्लेख येतोच. तुमच्यापैकीं गायनाचा ज्यांना अभ्यास असेल त्यांना ठाऊक असेल कीं एकाद्या चिजेचा विस्तार करतांना वादी आणि संवादी अशा दोन प्रकारच्या स्वरांचा भरणा त्यांत अधिकांत अधिक होत राहतो. माझी अभ्यासमंडळाची योजना जसजशी मी तुमच्यापुढें उलगडीत गेलों तसतशी लोकशाही व राष्ट्रवाद या दोन गोष्टींची प्राधान्येंकरून तरफदारी मी करीत होतों हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. आपल्या स्वातंत्र्यसाधनेंतले लोकशाही व राष्ट्रवाद हे वादी संवादी स्वर आहेत. माझ्या या निश्चित मताला पुष्टि देणारें एका प्रख्यात इंग्रजी लेखकाचें वाक्य मी तुम्हांला सांगणार आहें.

"लोकशाहीचें युग म्हणजेच राष्ट्रवादाचें युग होय."

राजनीतिशास्त्रातल्या एका जगमान्य पंडिताचें हें वाक्य आहे.

या सूत्रावरून आता माझें काम सुकर झालें असें मला वाटतें म्हणजे मी तुम्हाला आता असें सांगेन कीं लोकशाहीचीं बीजें वाढीला लागायला काय कारणें झालीं याची आठवण करा म्हणजे राष्ट्रकल्पनेचें आज विकसित झालेलें स्वरूप तुमच्या ध्यानात येईल. यंत्रकलेचा उदय झाला आणि लोकशाहीचें तत्त्व बळ धरू लागलें कल्पक व महत्त्वाकांक्षी वैश्यांनीं सरंजामी सत्ता कांहीं ठिकाणीं उलथून पाडली तर कांहीं ठिकाणीं दुर्बळ केली प्रत्येक माणसाला आपलें इष्ट ध्येय साध्य करून घेण्याची संधि पूर्ण मिळाली पाहिजे या तत्त्वाचा या नवयुगीन वैश्यांनीं जयजयकार केला हेंच तत्त्व व्यक्तीप्रमाणें समाजसमूहाला लावण्यात येऊं लागलें तेव्हा राष्ट्रकल्पनेचा जन्म झाला.

१८ व १९ व्या शतकाच्या संधिकालात नेपोलियन बोनापार्टचीं तुफान वादळें सर्व युरोपभर आपल्या घोड्यांच्या टापांनीं युरोपची भूमि उसळीत चाललीं तेव्हा त्याना आळा घालण्याची आवश्यकता ब्रिटिशाना वाटू लागली आणि मग इंग्रजी मुत्सद्यांनीं युरोपीय राष्ट्रांच्या राष्ट्र कल्पनेला आवाहन करून नेपोलियन-विरोधी अशी एक प्रबळ एकजूट तयार केली. 'तुम्ही जर्मन राष्ट्र म्हणून जगणार कीं नेपोलियनचे दास होणार?' असा खडा प्रश्न केल्यानंतर कुठला जर्मन माणूस 'दास होणार' असें उत्तर देईल? युरोपात राष्ट्र कल्पनेचा झेंडा सर्वत्र नाचविण्याचें अप्रत्यक्ष श्रेय नेपोलियनच्या अवताराला दिलें पाहिजे.

पण या राष्ट्रकल्पनेमागील व्यवहाराची भूमिका मात्र विसरू नका.

Britania rules the waves
Britains shall never be slaves

(ब्रिटिश राष्ट्राची सागरतरंगावर सत्ता आहे ब्रिटिश कधींही गुलाम होणार नाहींत.) असें आज अनेक वर्षे इंग्रज लोक अभिमानानें गात आले. या दोन पद्यपंक्ति राष्ट्रीय भावनेच्या द्योतक असल्या तरी त्यात ब्रिटिश साम्राज्याच्या

विस्ताराची सूचना दिसत नाहीं कां? समुद्रावरून जहाजें नेऊन दूरच्या लोकांचा व्यापार आपल्या ताब्यात घ्यायचा, Made in England ह्या छापाच्या विविध मालांनीं जगाच्या बाजारपेठा भरून टाकायच्या, ही महत्त्वाकांक्षा जगांतील सर्वात प्रभावी व्यापाराचा मार्ग म्हणजे समुद्रमार्ग ज्याच्या ताब्यांत असेल तेंच राष्ट्र सफळ करून दाखविणार. इग्लंडचें समुद्रावरील स्वामित्त्व आणि राष्ट्राभिमान याचा असा ध्वनीनें उल्लेख केलेला वरील पद्यपंक्तींत आलेला दिसेल. अर्थात् इंग्लंडला जर Made in England छापाचा माल जगांत सर्वत्र खपवून आपलें ऐश्वर्य अपरंपार वाढवावें असें वाटतें तर फ्रान्स, जर्मनी, अमेरिका यांना आपापल्या देशांतल्या मालाविषयीं तसें कां न वाटावें? वाटणें साहजिक होतें! राष्ट्राभिमानाचा उगम हा असा होतो. आणि मग फ्रान्स आणि जर्मनी, जर्मनी आणि आस्ट्रिया, अमेरिका आणि इंग्लंड याच्यांत झगडे झालेले आपणांला दिसतात. हे झगडे लढण्यांत राष्ट्रीयत्त्वाचें तत्त्व आपणांस अग्रभागीं झळकतांना दिसलें तरी मुख्यतः व्यापारी वर्चस्वासाठीं प्रतिस्पर्धा हेंच त्याचें मुळांत स्वरूप होतें असें आढळून येईल. 'म्हणजे आपल्या महत्वाकांक्षेला अनिर्बंध संचार करायला मिळावा म्हणून लोकशाहीला व्यापारी वर्गानें असे उचलून धरलें तसें आपल्या मार्गे लोकांची भक्कम फळी उभी असावी यासाठीं राष्ट्रवादाचा जयजयकार केला.

अठराव्या शतकांत शेवटीं फ्रान्समध्यें राज्यक्रांति होऊन बहुजनपक्षानें राजपक्षाला चीत केलें व लोकराज्य स्थापिलें. लोकशाहीच्या इतिहासांत ही फ्रेंच राज्यक्रांति जशी क्रांतिकारक तशीच त्याच शतकांत अमेरिकेनें आपल्या स्वातंत्र्यासाठीं इग्लंडशीं केलेली यशस्वी झुंज ही स्वातंत्र्याच्या इतिहासांत अग्रगण्य ठरेल. अमेरिकेचा लढा तसें पाहिल्यास व्यापाराचाच नव्हता का? 'आमचे प्रतिनिधी पार्लमेंटात घेतल्याशिवाय आमच्यावर कर लादूं नका. (No taxation without representation) हें जें अमेरिकेनें आपलें घोषवाक्य ठरविलें तें आपल्या आर्थिक फायद्याकरितांच नव्हे काय? अमेरिकेंत

पुढें येऊं पाहणाऱ्या महत्त्वाकांक्षी व्यापाऱ्यांनीं इंग्लंडचा सासुरवास नको होता म्हणून बंडाचें निशाण उभारलें आणि अमेरिकन राष्ट्रीयत्व विकसित होऊं लागलें. राष्ट्रीयत्वाच्या परंपरेला इटली, आयर्लंड, हिंदुस्थान इ० राष्ट्रांनींहि आपापल्या त्यागानें व शौर्यानें उज्वल केलें आहे.

विमान जमिनीपासून निघतें पण त्याचा संचार अंतराळांत असतो. तसेंच राष्ट्रीयत्वासारख्या तत्त्वाचा आरंभ जरी आपणाला आर्थिक कारणांत दिसला तरी त्याचा विकास फार उच्च पातळीवर होत असतो. म्हणून शास्त्रीय चिकित्सेसाठीं जरी मीं राष्ट्रीयत्वाचा अथवा राष्ट्रवादाचा उगम तुम्हांला व्यापारी कारणांत दाखविला असला तरी जगावर या तत्त्वज्ञानाला जी उदात्तता आली तिचा अवमान मला करावयाचा नाहीं. राष्ट्रवादानें कित्येक मानवसमूहांतले सुप्त व अविकसित गुण तरारून वाढीला लागले, शौर्यत्यागाचीं उज्ज्वल उदाहरणें जगाला घातलीं गेलीं, उत्कृष्ट वाङ्मय निर्माण झालें, आणि अनेक विभूतींनीं आपलीं जीवितें होमून बराच काळ मानवांना आपला मार्ग दिसेल इतका प्रकाश भविष्याच्या वाटेवर पाडून ठेविला.

मानव्याची एकंदर उंची वाढविणारी ही राष्ट्रकल्पना कशी उत्पन्न होते ? कुणी म्हणतात मानववंश एक असला म्हणजे राष्ट्र बनतें. पण हें विधान रशियासारखे देश पाहिले म्हणजे टिकत नाहीं. स्लाव लोकांपासून मंगोलियन जातीपर्यंत अगदीं भिन्न आकाराचे व स्वभावधर्मांचे अनेक मानवसमूह तेथें असूनहि आज राष्ट्र या दर्जाला रशिया पोंचलेला आहे.

राष्ट्रकल्पनेला सर्वांचा एक धर्म असण्याची आवश्यकता आहे असेंहि नाहीं. ही गोष्ट दोन विरुद्ध प्रकारांनीं सिद्ध करता येण्यासारखी आहे. म्हणजे एक धर्म असूनहि अनेक राष्ट्रें पडल्याचें उदाहरण युरोपखंडाचें देता येईल. युरोपखंडाचा धर्म खिस्ती आहे. पण फ्रान्स, इंग्लंड, जर्मनी, इटली अशीं भिन्न भिन्न राष्ट्रें त्या खंडांत पडलीं असून त्यांच्यांत किती प्रेम आहे हें युरोपचा गेल्या काहीं शतकांचा रक्तरंजित इतिहास आपणाला सांगतोच

आहे! याच्या उलट उदाहरण घेऊं. जपानची हकिकत मला वाटतें मीं मागें एकदां सांगितली होती. जपानमध्यें खिस्ती, शिंटो, बौद्ध इ० अनेक धर्म असूनहि जपानी राष्ट्रीयत्व अबाधित राहिलें आहे. या परस्परविरोधी दोन उदाहरणावरून एक धर्म आणि राष्ट्रीयत्व यांचा अभेद्य संबंध नाहीं असेंच सिद्ध नाहीं का होत?

एका राजसत्तेखालच्या अमलाखालील प्रदेश म्हणजे एक राष्ट्र असेंहि समीकरण आपणांला मांडतां येणार नाहीं. कसें तें पहा. हिंदुस्थान, कॅनडा, ऑस्ट्रेलिया हे प्रदेश एका ब्रिटिश सत्तेच्या अमलाखालीं आहेत. पण हीं निरनिराळीं राष्ट्रें आहेत. उलट, हिंदुस्थानातील गोवें पाडेचरी एवढेच प्रदेश पोर्तुगाल व फ्रान्स या राष्ट्रांचे अंकित आहेत. पण म्हणून कांहीं त्याना वेगळीं राष्ट्रें म्हणतां येत नाहीं. हाच निर्णय भाषेबाबतहि देतां येईल. अमेरिका व कॅनडा हे शेजारीं आहेत. दोघांची भाषाहि एकच म्हणजे इंग्रजी ही आहे. पण आज तीं दोन वेगळीं राष्ट्रें म्हणून प्रसिद्ध आहेत. उलट, रशियासारख्या देशांत अनेक भाषा व संस्कृति असून त्याच्या एकराष्ट्रीयत्वाला त्यामुळें दुबळेपणा आलेला दिसत नाहीं!

अशा रीतीनें आपण पाहिलें कीं मानववंश, धर्म, राज्यव्यवस्था, भाषा इ० गोष्टी एकजिनसी असणें याचा राष्ट्रीयत्वाशीं संबंध नाहीं. राष्ट्रकल्पना ही लोकशाहीशीं एकजीव झाली असल्यानें हिंदुस्थानांत जे कोणी दोन किंवा अनेक राष्ट्रें असल्याच्या वाता झोकतात ते खऱ्याखुऱ्या लोकशाहीचे शत्रू होत असें बिनदिक्कत धरून चला आणि अशी मंडळी जातिनिष्ठ संघटनेच्या सूत्रचालकातच आढळतात. यावरून जातिनिष्ठेचा प्रतिगामीपणा पुन: एकदां दिसून येतो. हें तुम्हांला मला निक्षून पटवून द्यावेंसें पुनः पुनः कां वाटतें याचें कारण हिंदुस्थानच्या देशी विदेशी हितशत्रूंनीं एकराष्ट्रीयत्वाविरुद्ध जी ओरड चालविली असते, तींत नेमके हेच गैरलागू आक्षेप ते घेत असतात. "हिंदुस्थानचा राष्ट्रीयतेचा प्रश्न बिकट आहे.

कारण अनेक मानववंश, अनेक धर्म, विविध भाषा यांच्या वुजबुटामुळे एकराष्ट्रीयत्त्वाची भावना तेथें निर्माण होणें शक्य नाहीं " या कोल्हेकुईला चोख उत्तर देण्यासाठीं अमेरिका, रशिया, जपान, युरोपातील राष्ट्रें, कॅनडा यांचे दाखले आपणाला उपयोगी पडतील आपण असें छातीठोकपणें सांगितलें पाहिजे कीं, 'हिंदुस्थानचा विस्तार व विविधता हीं त्याच्या राष्ट्रीयत्वाच्या आड येणार नाहीं, अनेक सुरांच्या मीलनांतून जसा राग तयार होतो तद्वत् या भिन्न पंथांच्या, भिन्न भाषांच्या व भिन्न वंशांच्या विविधतेंतून एक नवें सुसंवादी राष्ट्रीयत्त्व जन्माला येणार आहे आणि ही आता केवळ कल्पनासृष्टींतली गोष्ट राहिली नाहीं तिचीं प्रसादचिन्हें आजहि दिसू लागलीं आहेत '

हीं चिन्हें कोणत्या प्रकारचीं आहेत हें सांगण्यापूर्वी राष्ट्रीयत्वाचें रहस्य काय हें मला प्रथम सांगितलें पाहिजे आतापर्यंत मीं केवळ नकारात्मक विवेचन केलें मानववंश, भाषा, धर्म इ० गोष्टींची विविधता राष्ट्रकल्पनेच्या आड कशी येत नाहीं हें मीं सांगितलें पण राष्ट्रकल्पनेचें जीवन कशांत आहे, तिला प्राणवायु देणारी परिस्थिति कोणती, हें सांगायचेंच आहे अजून. फेडरेशनवर बोलताना मीं यावर थोडें प्रवचन केलें होतें फेडरेशनमधील भिन्न घटकांना एकत्र नांदवून त्यांचा विकास करणारें तत्त्व कोणतें त्याची मीं ओळख त्यावेळीं करून दिली होती तेंच पुन अधिक समर्पक व साधाररीतीनें सांगावयाचें आहे

अर्नेस्ट बार्कर या नावाचे एक पाश्चात्य पंडित आहेत इतिहास व राज्यशास्त्र यावर खोल व्यासंग करून त्यांनीं ग्रंथरचना केली आहे. या ज्ञानवृद्ध पंडिताचे मतें " राष्ट्र ही एका रक्तानें किंवा एका राजसत्तेकडून येणारी पार्थिव घटना नाहीं तिचा संबंध मनाशीं असून एका पवित्र परंपरेपासून तिचा उगम होतो. " आपल्या विधानाला पुष्टि देण्याकरिता

चाकेरसाहेबांनीं रेनाँ नांवाच्या विख्यात फ्रेंच ग्रंथकाराचें एक अवतरण दिलें आहे. पाठ करून सदैव उल्लेखीत राहावें असें तें अवतरण आहे. रेनाँ म्हणतो–

" राष्ट्र हें एक आध्यात्मिक तत्त्व आहे. या तत्त्वाची घडण मुख्यतः दोन गोष्टींनीं होते. त्यांपैकीं एक गोष्ट भूतकालांतली असून दुसरीचें अस्तित्व वर्तमानकालांत आहे. देशाच्या इतिहासात घडलेल्या अनेक उज्ज्वल गोष्टींकडे आपुलकीच्या अभिमानानें पाहणें आणि त्याना साजेशा गोष्टी वर्तमानकाळांत घडाव्या असा एकजुटीनें प्रयत्न करण्याची उमेद बाळगणें, या त्या दोन गोष्टी होत. ज्या लोकांना एकत्र राहण्याची इच्छा असतें व पूर्वपरंपरेचें पावित्र्य उज्ज्वल राखण्याविषयीं ज्यांना तळमळ वाटतें त्यांचेंच राष्ट्र होऊं शकतें. "

हें अवतरण अगदीं सुस्पष्ट असल्यानें त्याची फोड करण्याची गरज नाहीं. आतां तुम्हांला कळून येईल कीं राष्ट्र म्हणून जगायचें व वाढायचें म्हटलें म्हणजे कोणत्या एका गोष्टीची मुख्य आवश्यकता आहे ती.

राष्ट्र ह्या कल्पनेचें आकलन होतांच तिला अनुषंगिक अशी दुसरी कल्पना मला तुमच्यापुढें मांडायची आहे. इजिप्त किंवा हिंदुस्थान हें रान्यांतुन्या अर्थानें राष्ट्र आहे. परंतु हे दोनही देश पूर्णपणें स्वतंत्र नाहींत. अशा परतंत्र स्थितींत राष्ट्र म्हणून सान्या गोष्टी असूनहि तेथल्या लोकांना त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. त्यांना आपले उद्योगधंदे वाढवितां येत नाहींत, परदेशाशीं व्यापार करण्याची मुभा त्यांना नसते, परसत्तेच्या पिळणुकीखालीं त्या राष्ट्रातले बहुसंख्य लोक ऐहिक वैभवाला पारखे होतात ! दुर्दैवानें या स्थितींत आपण या दुर्दशेंत होरपळत आहोंत तेव्हां या गोष्टीचें अधिक वर्णन करून सांगाण्याची आवश्यकता नाहीं ! इतिहासाच्या गतीनें, परिस्थितीनें व लहानमोठ्या राष्ट्रभक्तांच्या कर्तृत्वानें राष्ट्र ही कल्पना प्रगत झाली तर स्वातंत्र्य हें मागोमाग आलेंच पाहिजे. स्वातंत्र्य ही राष्ट्राच्या ऐहिक वैभवाची जीवनशक्ति आहे. इतकेंच नव्हे तर स्वातंत्र्य नसेल तर राष्ट्राचें नैतिक

असें त्यानें घोषित केलें. पण स्वातंत्र्य उपभोगणाऱ्या माणसांनीं आपलेंहि जीवन शिस्तींत घालविणें अवश्य आहे असें सांगून मॅझिनीनें "मानवी कर्तव्यें" ( Duties of Man ) म्हणून एक सुंदर प्रबंध रचला. आपल्या सात्त्विक राष्ट्रवादाच्या प्रचारासाठीं त्यानें उदंड हालअपेष्टा सोसल्या. दुर्दैवानें खुद्द युरोपांत मॅझिनीचा 'महायान' राष्ट्रवाद फारसा भरभराटीला आला नाहीं !

गेल्या आणि आजच्या महायुद्धात पाश्चात्य देशांतल्या राष्ट्रवादाचें भीषण स्वरूप आपणाला पुरें कळून चुकलें आहे. आपलीं साम्राज्यें वाढविण्यासाठीं आपल्या राष्ट्रांतल्या लोकांना चेतविण्याची युक्ति म्हणून राष्ट्रवादाचा आज तिकडे उपयोग केला जातो. अर्धपोटीं जनतेंतली क्रांतीची प्रवृत्ति मारून त्यांना लष्करशाहीला जुंपावयाचें आणि त्यांची आहुति रणांगणात द्यायची हा युरोपीय राष्ट्रवादाचा आजचा निष्ठुर उद्योग आहे. कारण भांडवलशाही व साम्राज्यशाही याना असा प्रकार केल्यावाचून गत्यंतर उरलेलें नाहीं. "रक्त आणि तलवार" हें ब्रीद आजच्या युरोपीय राष्ट्रवादानें अंगिकारलें आहे. उलट, आपल्या राष्ट्रवादानें आपला देश पारतंत्र्याच्या गर्तेतून वर काढण्याचें कंकण बांधलें आहे. हिंदी राष्ट्रवाद कोणाच्या मुळावर आलेला नाहीं. गुण्या-गोविंदानें राहून आपलें जीवित सुखानें घालवीत असलेल्या स्वतंत्र राष्ट्राच्या पायांत दास्याच्या शृंखला अडकविण्याचें पाप हिंदी राष्ट्रवाद करणार नाहीं. आपल्या राष्ट्राचा हक्क म्हणून स्वातंत्र्य मिळवणें एवढेंच त्याचें ध्येय आहे. युरोपीय राष्ट्रवाद हा क्रूर व आक्रमक आहे, तर हिंदी राष्ट्रवाद म्हणजे माणसांना रास्तपणें वाटणाऱ्या स्वातंत्र्यप्रीतीचा उद्गार आहे. आम्ही स्वतंत्र होऊंच होऊं. दुसऱ्याना परतंत्र तर करणार नाहींच, पण शक्य झाल्यास परतंत्र असलेल्या अन्य राष्ट्रांचें जोखड दूर करण्यास झटूं. विवेकानंद, रानडे, टिळक, रवीन्द्रनाथ, गांधीजी, नेहरू इ० देशभक्त व दार्शनिक यांनीं संगोपन केलेला हिंदी राष्ट्रवाद या सात्त्विक प्रकारचा आहे.

हिंदी राष्ट्रवादानें संकल्पिलेलें ध्येय सत्यसृष्टींत उतरायचें असेल तर या राष्ट्रवादानें दोन पथ्यें सांभाळिलीं पाहिजेत. या राष्ट्रवादाला स्वातंत्र्याची सनद मिळतांच तिचा वापर बहुजनसत्तेकडून होईल असेंच तंत्र या राष्ट्रवादानें निर्माण केलें पाहिजे. युरोपीय इतिहासांत राष्ट्रवादाची मिरास वरिष्ठ वर्गाकडे राहिली आणि तीमुळें अखिल मानव संस्कृतीवर घाला पडेल असा प्रसंग येऊन ठेपला. या प्रकारची आवृत्ति आपणांकडे न निघावी. दुसरें असें कीं, वेगवान् दळणवळणांच्या साधनांनीं, यंत्रकलेनें जगांतले देश अगदीं एकमेकांजवळ आणिले आहेत. अशा स्थितींत आपलें राष्ट्र अगदीं स्वतंत्र, कुणाशीं संबंध न ठेवतां अलग राखूं अशा तुसड्या वृत्तीनें चालणार नाहीं. परस्परावर आक्रमण करण्याची किंवा परस्परापासून दूर रहाण्याची वृत्ति जाऊन परस्पराशीं सहकार्य करण्याची भावना वाढली पाहिजे. म्हणजे जग हा एक राष्ट्रसंघ ( Federation of nations ) आहे आणि आपण या संघाचे एक घटक आहोंत असें सर्व राष्ट्रांतील नागरिकांनीं वागलें पाहिजे. हिंदी राष्ट्र एवढें संपन्न व अवाढव्य आहे कीं स्वतंत्र हिंदुस्थानांतला राष्ट्रवाद अशा जागतिक दृष्टीनें वाढूं लागला तर " **आई ! गुरुस्थान अंतीं जगाचें तुझें यांत शंका न कांहीं ...** " ही रे० टिळकांची उक्ति सत्य झाल्याशिवाय राहणार नाहीं.

---

## काय वाचावें ? :: १५

प्रथम मला दोन गोष्टींचा खुलासा केला पाहिजे. एक म्हणजे आज निव्वळ मराठींत जें राजकीय वाङ्मय निर्माण झालें आहे त्याचीच मी माहिती देणार आहे. इतर विशेषतः इंग्रजी भाषेंत राजकीय वाङ्मयाचें भांडार फार प्रचंड आहे. आधुनिक जगाला नवीन दृष्टि देणाऱ्या पाश्चात्य द्रष्टयाचे विचार मुळांतून वाचायला मिळाले तर उत्तमच. पण परकीय भाषेचें इतकें खोल ज्ञान नसेल त्यांनीं स्वस्थ का बसायचें ? सुदैवानें मराठींत आतां चांगलें राजकीय वाङ्मय तयार होत आहे. त्याचा नीट अभ्यास केल्यास राजकारणाच्या विद्यार्थ्यांस आधुनिक दृष्टि खास येईल. दुसरी गोष्ट मला सांगितली पाहिजे ती ही कीं, एका तासांत सर्व राजकीय पुस्तकांची यादी देतां येणार नाहीं. कित्येक महत्त्वाचीं पुस्तकें राहतील पण जसजशीं हीं पुस्तकें तुम्ही हातावेगळीं कराल तसतसा नवीन पुस्तकाचा शोध लागत जाईल. प्रत्येक पुस्तक वाचतांना त्या पुस्तकांतील उल्लेख व संदर्भ ग्रंथांची यादी काळजीपूर्वक पाहिली म्हणजे झालें.

इंग्रजी किंवा इतर संपन्न परकीय भाषा यांच्याप्रमाणें मराठींत राजकीय वाङ्मय विपुल नसेल, पण जें थोडेंफार आहे त्याची सुद्धां आमच्या वाचकांना पुरेशी ओळख नसते हें दुर्दैव होय ! माझी स्वतःची अशी समजूत आहे कीं वृत्तपत्रांतील उल्लेख करून देशांतील प्रबळ राजकीय विचारप्रवाह स्थूल

मानानें समजतील एवढें राजकीय वाङ्मय मराठींत खासच निर्माण झालें आहे. निव्वळ मराठी वाचकांना तें उपयुक्त होईलच. पण मूळ इंग्रजींतून वाचण्याचें ज्यांना ज्ञान आहे त्यांनीहि हें मराठी राजकीय वाङ्मय वाचावें अशी माझी शिफारस आहे. कारण ज्ञान इंग्रजींतून घेतलें तरीं तें आपल्या देशबांधवांना देशी भाषेंतून द्यावयाचें आहे ना? मग देशी भाषांत इंग्रजी भाषेंतल्या कल्पना, संकेत, ध्वनि कसे सांगावेत याची कला साध्य नको का व्हायला? माझे एक नामांकित साम्यवादी मित्र आहेत. ते असें म्हणत असतात कीं, "आपल्या महाराष्ट्रीय लोकांस राजकारणाचें नवें ज्ञान द्यायची ज्यानें मनीषा बाळगली त्यानें लो. टिळकांचे केसरींतील लेख पाठ केले पाहिजेत. म्हणजे इंग्रजींतील कल्पना सुबोध व सावेश लोकभाषेंत व्यक्त करण्याचें सामर्थ्य त्याचे अंगीं येईल." म्हणून राजकारणाच्या आंग्ल भाषाकोविद विद्यार्थी विद्यार्थिनींनाहि माझ्या यादीचा उपयोग होईल अशी माझी नम्र अपेक्षा आहे.

पूर्वतयारी करण्यासाठीं महाभारत आणि रामायण या महाकाव्यापासून सुरुवात करावी असें मीं म्हटलें तर तें केवळ भाविकपणें अथवा अंधश्रद्धेनें म्हटलें असें समजूं नका. ह्या काव्यांत आपल्या देशांतल्या राजनैतिक, नैतिक व धार्मिक आदर्शांची सर्वांत श्रेष्ठ पायरी दाखविली आहे. महाभारताला एका त्रावणकोरी पंडितानें 'मानवाचा शाश्वत इतिहास' असें म्हटलें आहे तें खोटें नाहीं. प्रत्येक मानवसमाजानें ध्येयविषयक कल्पनांत कोणता पल्ला गांठला आहे यावर त्या समाजाची प्रगति अवलंबून असते. आपल्या देशाच्या अखंडत्त्वापासून तों समाजांत प्रत्येक माणसाला सुख लाभावें अशा तत्त्वज्ञानाच्या चर्चेपर्यंत सर्व कांहीं वरील ग्रंथांत सांपडेल. प्रत्येक हिंदवासीयानें हा पाया धरून मग वरील ज्ञानाची इमारत उभारावी असें माझें स्पष्ट मत आहे. त्यानंतर आपल्या लोकांचा इतिहास कळावा म्हणून 'मध्ययुगीन भारत' (वैद्य) आणि 'रियासती' (सरदेसाई) वाचाव्या. 'राजस्थानचा

इतिहास,' 'गुजराथचा इतिहास' (लोकहितवादी), 'मराठी सत्तेचा उत्कर्ष' (रानडे) याहि पुस्तकांत मन रमवावें. आणि गोगटे भटजींनीं लिहिलेल्या ५७ च्या बडाची सुरस हकिकत वाचावी. आधुनिक कालखंडांत शिरण्यापूर्वी निदान एवढी सामुग्री तरी आपल्या गाठीं असणें जरूर आहे.

आजचा हिंदुस्थान कसा घडविला गेला याचें ज्ञान असेल तरच आपण आजच्या राजकारणांच्या विचारप्रवाहातला प्रबळ व जोरकस प्रवाह नीट पाहूं शकूं हें उघड आहे. आधुनिक भारताचे जे प्रणेते आहेत त्यांच्या अवतारकार्याची माहिती करून घेणें हा आधुनिक भारताचें ज्ञान करून घेण्याचा पहिला आणि अत्यंत मनोरजक मार्ग आहे हें उघड आहे. 'दादाभाई' आणि 'रानडे' यांच्या चरित्रांचें परिशीलन आपणांस करावें लागेल. प्रो. फडके (दादाभाई), प्रो. द. गो. कर्वे व रा. न. र. फाटक (रानडे) या प्रख्यात लेखकानीं वरील द्रष्टया पुरुषांचें जीवनकार्य सुंदर रीतीनें आपणाला सांगितले आहे. श्री. केळकरानीं विरचिलेलें 'टिळक चरित्र' म्हणजे महाराष्ट्राची व हिंदुस्थानच्या जीवनांतील अलीकडील चाळीस वर्षांची रावेश व हृदयंगम बखरच म्हणता येईल. महात्माजींचे 'सत्याचे प्रयोग' (अनु. देव), पं. जवाहरलाल नेहरूंचें 'आत्मचरित्र' [अनु. भाई गोरे] आणि लाला लजपतरायचे आत्मचरित्र (अनु. 'राम' व खानोलकर) हे जगविख्यात ग्रंथ मराठींत वाचायला मिळतात हे त्या त्या अनुवादकांचे आपणांवर केवढे उपकार आहेत !

इतिहासाची घडण विभूतींच्या प्रतिमेनें केली जाते तशीच परिस्थितीचीहि तिला मदत लागते हें आपण मान्य केलें पाहिजे. या परिस्थितींत परंपरा, भौतिक स्थिति, आंतर्राष्ट्रीय आंदोलन इ० अनेक द्रव्यें असतात. आपल्या केवळ महाराष्ट्रापुरतें पाहायचें असेल तर पाध्ये व टिकेकर या दोघा चतुर लेखकांनीं लिहिलेलें 'आजकालचा महाराष्ट्र' हें पुस्तक मोठें नमुनेदार आहे. त्यांत महाराष्ट्रीय समाजाचाच फक्त विचार जरी केलेला असला तरी महाराष्ट्र

हा हिंदुस्थानचा एक भाग असल्यानें हिंदुस्थानच्या आधुनिक अवस्थेचा प्रपंच लेखकद्वयाला त्यांत करावा लागलाच आहे. 'अस्पृष्टांचा प्रश्न' हें प्रो. श्री. म. माटे यांचें पुस्तक याच पुस्तकाबरोबर वाचावें असें मी सुचवितों. कारण मुख्यतः महाराष्ट्रीय बैठकीवर विवेचन करून त्यांतून निघणाऱ्या सूत्रांचा अखिल भारतीय योजनेशीं सांधा जुळवून घेण्याचा उपक्रम वरील लेखकांसारखाच याहि पुस्तकाच्या विद्वान् लेखकांनीं केला आहे. शिवाय आज अत्यंत जिव्हाळ्याचा होऊन बसलेला अस्पृश्याचा प्रश्न सामन्यानें आपणांला यावरून समजतो.

आपल्या देशाची स्थिति कशी आहे याची भेसूर जाणीव आज आपणांला दनंदिन होत आहे. पण इंग्रजी राज्याच्या पहिल्या अमदानींत नव्या संस्कृतीची झांपड आपल्या डोळ्यांवर इतकी होती कीं आपल्या दैन्याचें नीटसें आकलन आपणास होत नसे. राष्ट्रवादाचे पहिल्यातले प्रमुख पुरस्कर्ते विष्णुशास्त्री चिपळूणकर यांनीं 'आमच्या देशाची स्थिति' हा जळजळीत निबंध लिहून लोकांना मोहमुक्त करण्याचा मोठा प्रयत्न केला. हा निबंध आजहि आपणाला उत्कृष्ट वाटेल.

इंग्रजी अमदानींतील परावलंबनाची जाणीव नष्ट करून स्वराज्योन्मुख करण्याचे ज्या लोकोत्तर पुरुषानें ४० वर्षे भगीरथ प्रयत्न केले त्याचें वाङ्मय हें आपलें राष्ट्रीय वाङ्मय होय. केसरींतील लोकमान्य टिळकांचे लेख, माहिती, सुबोधता, आवेश, स्वातंत्र्यप्रेम, तर्कशुद्धता या सर्वच दृष्टींनीं केवळ अलौकिक आहेत. त्यांचें परिशीलन आज आपण करायला पाहिजे तितकें करीत नाहीं ही करंटेपणाची खूण होय! असो. टिळकांच्या निबंधसंग्रहाबरोबर आगरकर व परांजपे यांचेहि निबंध वाचा. या निबंधांच्या वाचनाला सुरवात करतांच तुम्ही मुग्ध होऊन जाल आणि सहज शेवटच्या पानापर्यंत पोंचाल याची मला खात्री वाटते.

'आधुनिक भारत' हा आचार्य जावडेकरांचा ग्रंथ आपल्या भाषेचें भूषण समजला जाईल. निव्वळ मराठी वाचकाला नव्या दृष्टिकोणानें राजकारणाचें ज्ञान करून देणारा हा उत्तम शिक्षक भेटला आहे. हिंदुस्थान इंग्रजांनीं कसा घेतला याचें हृदयभेदक पण वास्तव वर्णन आपणांला राजकारणाकडे पहाण्याची नवी दृष्टि देईल. राममोहन, रामकृष्ण, रानडे, टिळक, गांधीजी, आणि नेहरू या महानुभावांनीं आधुनिक भारताचें मंदिर उभारतांना कोण-कोणतीं मतें व सामर्थ्यें वापरलीं याची खोल व विशाल चर्चा या पुस्तकांत आहे. राजकारणाची गोडी थोडीफार जरी असली तरी हें पुस्तक एकाग्रतेनें वाचावें अशी त्याची योग्यता आहे.

हिंदी राष्ट्रवादाची प्रतीक म्हणून गणली गेलेली संस्था म्हणजे काँग्रेस होय. या काँग्रेसच्या इतिहासांत गेल्या ५०।५५ वर्षांतील लढाऊ राज-कारणाचा इतिहास आहे. डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांनीं इंग्रजींत लिहिलेलें काँग्रेसच्या इतिहासावरील पुस्तक मराठींत भाषांतरित झालें आहे. हें पुस्तक सविस्तर आणि बरेंच मोठें आहे. याला जोडून 'स्वदेशी समाज' हें पुस्तकही वाचण्याचा मी आग्रह करतों. कविसम्राट् रवीन्द्रनाथ टागोर यांनीं वंगभंगाच्या वेळीं दिलेलीं हीं व्याख्यानें आहेत. साने गुरुजींनीं त्याचा अनुवाद मराठींत केला आहे. हीं व्याख्यानें बरींच जुनीं असलीं तरी कवी-न्द्रांची विचारसरणी अत्यंत पुरोगामी असल्यानें तीं अगदीं आजतागायत वाटतात. 'सावरकर वाङ्मय', 'आधुनिक गीता' (फडके), 'मानसमंदिर' (फडके), 'विज्ञानप्रणीत समाजरचना' (सहस्रबुद्धे), 'विवाह आणि नीति, (निरंतर), 'रसेलनीति' (काणेकर), 'ध्रुवयांतून लाल ताऱ्याकडे' (काणेकर), 'विज्ञान बोध' (माटे), 'पुरोगामी वाङ्मय' (फडके-जावडेकर) 'ज्ञानोपासना आणि भारतीयाचें कर्तव्य' (वनहट्टी), इ० पुस्तकें राजकीय वाङ्मयांत बसणारीं नाहींत. पण मीं 'नवी दृष्टि' या व्याख्यानांत सांगि-तलेल्या विशाल विषयांत यांना स्थान आहे. 'विज्ञानबोधाची' प्रस्तावना जरूर वाचा

संस्कृति ही गोष्ट राष्ट्राच्या जीवनांत ऑक्सिजनइतकी महत्त्वाची आहे. स्वातंत्र्य हें राष्ट्राचें साधन आहे. आणि संस्कृति हें साध्य आहे असें म्हटलें तरी चालेल. विशेषतः आपल्या हिंदुस्थानसारख्या प्राचीन व उज्ज्वल परंपरेच्या देशांत तर संस्कृति हेंच सर्व काहीं समजलें जातें. आपल्या राजकारणावर सर्वत्र एका विशिष्ट संस्कृतीचा पगडा असलेला दिसतो. संस्कृतीचा विजय व विकास व्हावा या दृष्टीनेंच लोकनेते प्रयत्न करीत असतात. अर्थात् या प्रयत्नाचें स्वरूप व माहिती होण्यासाठीं संस्कृति म्हणजे काय तें करून घेतलें पाहिजे. हिंदुस्थानातल्या प्राचीन संस्कृतीची तोडओळख करून घ्यायची असेल तर 'बुद्धपूर्व जग,' 'बुद्धोत्तर जग' 'हिंदुस्थान' इ० मराठी ज्ञानकोशाचे विभाग काळजीपूर्वक वाचावेत. या विषयाचें इतकें मूलगामी विवेचन इंग्रजींतहि नाहीं असें मोठ्या अभिमानानें सांगता येईल. डॉ. सर राधाकृष्णन् यांच्या ग्रंथाचा अनुवाद 'हिंदु धर्माचीं मूलतत्त्वें' आणि साने गुरुजींचें 'भारतीय संस्कृति' हीं पुस्तकें वाचण्याची मी आग्रहानें शिफारस करीन. वादविवेचनमालेंत 'केसरी' चे विद्वान् संपादक श्री. ज. स. करंदीकर यांनीं गुंफलेलें 'हिंदुत्ववाद' हें पुष्पहि अवश्य अभ्यासावें. आपल्या देशांत प्रमुख होऊन राहिलेल्या बौद्ध व इस्लामी धर्मांचा परिचय करून घेणें अगत्याचें आहे. 'बौद्धपर्व' (वा. गो. आपटे), 'भगवान् बुद्ध' (कोसंबी) हीं पुस्तकें या कामीं फार मार्गदर्शक होतील. आज अहिंसावादाचा जो ऊहापोह चालला आहे, त्याचें मर्म समजून घेण्यास अहिंसेचा प्रमुख महर्षि काय म्हणतो हें आपण अभ्यासिलें पाहिजे. असो. इस्लामी संस्कृतीचा आज आपल्या देशाला ७१८ व्या वर्षी संपर्क झालेला आहे. आजचीं जातीय भांडणें सोडून, मूळ इस्लामी संस्कृतीचें बळ काय होतें हें आपण जिज्ञासेनें शजमाविलें पाहिजे. 'इस्लामी संस्कृतीचें क्रांतिकार्य' (मूळ लेखक— एम. एन. रॉय) या लहान पुस्तकांत बुद्धीस पुष्कळ खाद्य मिळेल व तें बरेच चविष्ट वाटेल. त्यांत पौष्टिक गुणहि बरे आहेत. मात्र तें पारखून घेतलें

रिपोर्ट मागें पडला. पूर्ण स्वातंत्र्य हेंच हिंदुस्थानचें राजकीय ध्येय झालें. 'वसाहतीचें स्वराज्य' (देवगिरीकर) हें पुस्तक वाचावें. हिंदुस्थानची राज्यघटना संघराज्याच्या स्वरूपाची असावी असा सूर सर्वत्र वाहतांना दिसतो. संघराज्य (Federation) म्हणजे काय याची कल्पना 'फेडरेशन व त्याचें भवितव्य' हें याच लेखकाचें मोठें पुस्तक वाचून चांगली येईल. या दोनहि पुस्तकांचा विशेष असा आहे कीं त्यांत माहिती तर चांगली आहेच. पण ग्रंथकर्ता हा स्वतः राजकीय कार्यकर्ता असल्यानें एक प्रकारचा जिव्हाळा प्रतिपादनांत वाटतो. आचार्य वि. प्र. लिमये यांचा प्रांतिक स्वायत्ततेवरील ग्रंथ अभ्यासू वृत्तीनें लिहिलेला असून त्यांतील १९३५ च्या कायद्याचें वर्णन सरकारच्या सत्तादानविषयक वृत्तीवर चांगला प्रकाश पाडतें.

एकाद्या देशाचे तुकडे पाडणें अथवा तो देश अखंड ठेवणें हा राज्यघटनेंतलाच प्रश्न आहे. दुर्दैवानें एक लहानसा का होईना पण अरेराव व फुटीर वृत्तीचा मुस्लिम लीग पक्ष देशाचीं खांडोळीं करण्यास निघाला आहे! आपल्या देशाचे दोन तुकडे करून मुसलमानांना पाकिस्तानचा सवता सुभा तोडून द्यावा असें या पक्षाचें मागणें आहे. राष्ट्रविघातक मागणीची सांगोपांग व सटीक चर्चा 'पाकिस्तानचें संकट' [ शि. ल. करंदीकर ] आणि 'पाकिस्तान कीं पन्नास टक्के' ( पाध्ये ) या दोन पुस्तकांत केली आहे. ती जिज्ञासूंनीं चांगली घोळून घोळून वाचावी.

नवे राजकीय पंथ आपल्या देशांत निघत आहेत आणि आपल्या देशांतील निरनिराळ्या राजकीय पक्षांवर त्यांच्यांतल्या कांहीं पंथांची स्पष्ट छाप पडूं लागली आहे. अमुक एक रंगाचा डगला एवढेंच या राजकीय पंथाचें वैशिष्ट्य नव्हे. त्या प्रत्येक पंथामागें एक आर्थिक व्यवस्था आहे, जीवनाकडे पाहण्याचा एक वेगळा दृष्टिकोण आहे. म्हणून केवळ नाझीझम् म्हणजे स्वस्तिक चिन्ह, कम्युनिझम् म्हणजे हातोडा कोयता एवढेंच लक्षांत ठेवून चालणार

पाहिजे. यांत काय वगळायचें हें समंजस माणसाला सहज समजावें इतके यांतले दोष स्पष्ट आहेत.

राज्यशास्त्र जर अवगत नसेल तर आपण स्वातंत्र्याकरितां त्याग करूनहि उपयोग होणार नाहीं. राज्ययंत्र काय असतें ? राज्ययंत्रामागें शक्ति कुठून येते ? कोणती राज्यघटना खरी लोकहिताची ? या गोष्टी आपणांस कळल्या पाहिजेत. विशेषत: गेल्या कांहीं वर्षांत परकीय सरकारनें आपणांस कांहीं मर्यादित अधिकाराची राज्यघटना देऊं केल्यानें आपल्याच देशात मतामतांचा गलबला सुरु झाला आहे. अशा वेळीं सरकारच्या योजनेंत वैगुण्यें कोणतीं आहेत हें कळल्याशिवाय जनतेला अमुक बरोबर हें सागतां येणार नाहीं, आणि देशहितबुद्धीनें झटणारा कोणता पक्ष आहे हेंहि ओळखतां येणार नाहीं. म्हणून राज्यशास्त्राचें स्थूल ज्ञान तरी प्रत्येक सुबुद्ध नागरिकाला पाहिजेच.

राज्यशास्त्र याची शास्त्र म्हणून कल्पना येण्यास विशेषतः त्यांतील जुनाट मतांतरें आणि त्याचा आधुनिक विकास समजण्यास रा. केळकरांचें ' राज्य-शास्त्र ' आणि आचार्य जावडेकरांचें त्याच विषयावरील पुस्तक हीं दोनहि पुस्तकें सहाय्यक होतील. नागरिकशास्त्र हा राज्यशास्त्राचाच एक भाग असल्यानें केळकरांचें ' हिंदुस्थानचा नागरिक ' हें एतद्विषयक पुस्तक प्रत्येकानें डोळ्यांखालीं घालावें. हिंदुस्थानच्या लोकांना आपली राज्यघटना ठरविण्याची पात्रता आहे हे सिद्ध करणारा नेहरू रिपोर्ट १९२८ सालीं प्रसिद्ध झाला. वसाहतीच्या स्वराज्याची सुंदर योजना नेहरू-सप्रूसारख्या उच्च दर्जाच्या नेत्यांनीं यात आखली होती. या योजनेची माहिती सर्व लोकांना करून देण्याच्या हेतूनें ' असलें स्वराज्य आम्हांला हवें, तूर्त पण तावडतोब ' ही एक लहान पुस्तिका केळकरांनीं तयार करून तिचा खूप प्रसार केला. नेहरू-रिपोर्टाचा आराखडा तीवरून फार स्पष्ट रीतीनें कळतो. पण पुढें १९२९ सालीं लाहोर कॉंग्रेसमध्यें पूर्ण स्वातंत्र्याचा ठराव पास झाला आणि नेहरू-

रिपोर्ट मागें पडला. पूर्ण स्वातंत्र्य हेंच हिंदुस्थानचें राजकीय ध्येय झालें. 'वसाहतीचें स्वराज्य' (देवगिरीकर) हें पुस्तक वाचावें. हिंदुस्थानची राज्यघटना संघराज्याच्या स्वरूपाची असावी असा सूर सर्वत्र वाहतांना दिसतो. संघराज्य (Federation) म्हणजे काय याची कल्पना 'फेडरेशन व त्याचें भवितव्य' हें याच लेखकाचें मोठें पुस्तक वाचून चांगली येईल. या दोनहि पुस्तकांचा विशेष असा आहे कीं त्यांत माहिती तर चांगली आहेच. पण ग्रंथकर्ता हा स्वतः राजकीय कार्यकर्ता असल्यानें एक प्रकारचा जिव्हाळा प्रतिपादनांत वाटतो. आचार्य वि. प्र. लिमये यांचा प्रांतिक स्वायत्ततेवरील ग्रंथ अभ्यासू वृत्तीनें लिहिलेला असून त्यांतील १९३५ च्या कायद्याचें वर्णन सरकारच्या सत्तादानविषयक वृत्तीवर चांगला प्रकाश पाडतें.

एकाद्या देशाचे तुकडे पाडणें अथवा तो देश अखंड ठेवणें हा राज्यघटनेंतलाच प्रश्न आहे. दुर्दैवानें एक लहानसा का होईना पण अरेराव व फुटीर वृत्तीचा मुस्लिम लीग पक्ष देशाची खांडोळीं करण्यास निघाला आहे! आपल्या देशाचे दोन तुकडे करून मुसलमानांना पाकिस्तानचा सवता सुभा तोडून द्यावा असें या पक्षाचें मागणें आहे. राष्ट्रविघातक मागणीची सांगोपांग व सटीक चर्चा 'पाकिस्तानचें संकट' [ शि. ल. करंदीकर ] आणि 'पाकिस्तान कीं पन्नास टक्के' (पाध्ये) या दोन पुस्तकांत केली आहे. ती जिज्ञासूंनीं चांगली घोकून घोकून वाचावी.

नवे राजकीय पंथ आपल्या देशांत निघत आहेत आणि आपल्या देशांतील निरनिराळ्या राजकीय पक्षांवर त्याच्यांतल्या कांहीं पंथांची स्पष्ट छाप पडूं लागली आहे. अमुक एक रंगाचा डगला एवढेंच या राजकीय पंथाचें वैशिष्ट्य नव्हे. त्या प्रत्येक पंथामागें एक आर्थिक व्यवस्था आहे, जीवनाकडे पाहण्याचा एक वेगळा दृष्टिकोण आहे. म्हणून केवळ नाझीझम् म्हणजे स्वस्तिक चिन्ह, कम्युनिझम् म्हणजे हातोडा कोयता एवढेंच लक्षांत ठेवून चालणार

नाहीं. या सर्व पंथाचें स्थूलमानानें तरी आपण वैशिष्ट्य समजावून घेतलें पाहिजे.

समाजवाद या पंथाचा आपल्या देशांत गाजावाजा खूप झालेला आहे. रा. पां. वा. गाडगीळ यांचें 'समाजवादाचा ओनामा' आणि 'समाजवाद' (वादविवेचनमाला) हीं दोनहि पुस्तकें चागलीं आहेत. Why Socialism? या भाई जयप्रकाश नारायण यांच्या पुस्तकाचें भाई गोरे यांनीं केलेलें सरस रूपांतर वाचून आपल्या देशाच्या राजकारणात समाजवादाचें स्थान कोणतें याची नीट कल्पना येईल. 'साम्राज्यवाद' (वा. वि. माला) हेंहि भाई गोरे यांचें पुस्तक या बरोबरच अभ्यासिलें पाहिजे. छायाप्रकाशाखेरीज चित्र जसें पूर्ण होत नाहीं तद्वत् साम्राज्यवादाची पार्श्वभूमि असल्याशिवाय समाजवादाचें उज्ज्वल चित्र उठावदार दिसणार नाहीं.

आपला देश सध्या स्वातंत्र्यासाठीं झगडत आहे. आज तरी आपणावर राष्ट्रवादाचा पगडा सर्वांत जास्त आहे. तेव्हा शास्त्रीय दृष्टिकोनांतून (भावनात्मक पद्धतीनें नव्हे) राष्ट्रवादाचें अंतरंग समजावून घ्यावयाचें असेल तर 'राष्ट्रवाद' हें रा. कोल्हटकराचें पुस्तक पाहावें. समाजावादाप्रमाणें हिंदुस्थानांत गांधीजींनीं जगातील विषमता दूर करण्याचें एक तत्वज्ञान काढलें आहे. तें 'गांधीवाद' या नांवानें ओळखलें जातें. तें अद्यापि बाल्यावस्थेंत असलें तरी त्यांत मोठें सामर्थ्य आहे. आचार्य जावडेकर यांनीं 'गांधीवाद' (वा. वि. माला) या पुस्तकात सूत्ररूपानें पण सुबोधपणें गांधीवादाचा विचार माडला आहे. 'अराज्यवाद' हेंहि पुस्तक या वादांतल्या कांहीं भागांवर प्रकाश पाडणारें आहे. हिटलर, मुसोलिनी यांनीं जी हुकूमशाही विचारसरणी निर्माण केली तिचे भीषण परिणाम आपण पाहात आहोंतच! समाजवादाला हें स्वरूप पूर्ण विरोधक आहे याची कल्पना 'फॅसीझम्' (मूळ लेखक–एम्. एन्. रॉय) हें भरदार पुस्तक वाचल्यानें येईल. हिंदी संस्कृति व हिंदी राष्ट्रवादी पुढारी याना दिलेल्या यांतील शिव्या मात्र आपण संयम-

पूर्वक विसराव्या! रा. सुखठणकर यांचेंहि 'मार्क्सवाद' हें पुस्तक अभ्यासकांनीं विसरूं नये. समाजवादी वाङ्मयास रशियासंबंधानें वाङ्मयाचा भाग आपण प्रामुख्यानें घेतला पाहिजे. कारण *समाजवाद प्रत्यक्ष व्यवहारात उतरविण्याचें* श्रेय रशियानें घेतलें आहे. आपले थोर पुढारी पंडित जवाहरलाल नेहरू यांनीं लिहिलेलें 'Soviet Russia' हें पुस्तक रा. दिवेकर यांनीं मराठींत (आजचा रशिया) उतरलें आहे. कामगार प्रकाशन मालेनें 'रशियाची राज्यक्रांति,' 'कम्युनिस्ट जाहीरनामा' इ० पुस्तकें प्रसिद्ध केलीं आहेत. तीं आणि 'कार्लमार्क्स,' 'लेनिन' (वि. म. भुस्कुटे) हीं समाजवादी द्रष्ट्यांचीं व प्रणेत्यांचीं चरित्रें सावधानपणें वाचलीं तर जगात प्रबळ होऊं घातलेल्या एका नव्या तत्त्वाज्ञानाशीं आपला दाट स्नेह जमेल.

इतर कांहीं पुस्तकें मी सहज उल्लेखितों. आपल्या देशांत यांत्रिक सुधारणेबरोबर नव्या कल्पनाहि आल्या. आतां राष्ट्रें हीं निरनिराळ्या भौतिक साधनांनीं एकमेकांस जोडलीं जाऊं लागलीं आहेत. तेव्हां आपल्या देशात येणाऱ्या नव्या कल्पनांचा ठाव घेण्यास आपणांस इतर राष्ट्रांचे इतिहास पाहिले पाहिजेत. ऑक्सफोर्ड प्रेसनें चालू युद्ध व महत्त्वाचीं राष्ट्रें यावर प्रसिद्ध केलेल्या पुस्तिका फार सुंदर आहेत. 'तुर्कांचें साम्राज्य' (वा. कृ. भावे), 'जगाचें राजकारण' (स. ज. करंदीकर), 'फिलिपाईन्सच्या स्वातंत्र्याचा इतिहास' (देवगिरीकर), '*आयर्लंडचा इतिहास*' व '*फ्रेंच राज्यक्रांति*' (केळकर), 'मुसोलिनी आणि फॅशिस्मो' (द. वि. ताम्हणकर), 'जपानची जीवन क्रांति' (खैर), अशा पुस्तकांचें वाचन आपल्या राजकारणाच्या अभ्यासाला निःसंशय पोषक आहे. रा. कृ. प्र. खाडिलकर यांनीं लिहिलेलें गेल्या महायुद्धाचें चतुःखंडात्मक समालोचन, 'टॉलस्टॉय' (भा. गौ. ग्रंथमाला), 'बिस्मार्क' (भा. गौ. ग्रंथमाला) इ० चरित्रें, 'उद्यांचें जग' व 'भटकत्या ज्वाला' (पोतनीस), रा. नातू या अल्पवयी लेखकानें लिहिलेला '*जगाचा इतिहास*' पं. नेहरूंच्या *'Glimpses of World History'* चें मराठी

भापातर ह्या ग्रंथानीं निव्वळ मराठी वाचकांना हिंदुस्थानाबाहेरील इतिहास-कालाचा प्रवास सुलभ करून दिला आहे हें मोठें भाग्यच म्हटलें पाहिजे. हा प्रवास केल्याशिवाय आपल्या देशातल्या खळवळीचें खरें रहस्य तर कळणार नाहींच पण आपल्या देशाचा उद्धार होण्याचा नेमका मार्ग कोणता याचेंहि ज्ञान होणार नाहीं.

'मराठीचियें नगरीं' उपलब्ध असलेल्या या राजकीय वाङ्मयाची ही ओळख झाली. आता या ओळखीचें दाट स्नेहात रूपांतर करणें सर्वस्वीं तुमच्या हातीं आहे. ही ओळख ओझरती आहे. याची जाणीव आपणा सर्वांपेक्षां मलाच जास्त आहे. 'केसरी'च्या ५० वर्षांच्या कामगिरीचा परिचय आणि त्याच-बरोबर हिंदी राजकारणात विषयप्रवेश करून देणारा 'केसरी प्रबोध' आणि 'महाराष्ट्र सांवत्सरिका' चे भाग यांचें महत्त्व सांगावयाचें तसेंच राहून गेलें. चरित्रांचा तर मोठाच भाग संशोधित करण्याचें मीं तुम्हांवर सोंपविलें आहे. इतिहासाचार्य 'राजवाड्यांच्या प्रस्तावना विशेषतः 'राधामाधवविलासचंपू' ची प्रस्तावना, आणि त्यांतील मूलग्राही विचारप्रणालि याचा फक्त उल्लेख करूनच पुढें जावें लागत आहे. 'हिंदुधर्मावरील कलंक' (अनु. निरंतर) हें गांधीजींच्या अस्पृश्यता निवारणावरील व्याख्यानांचें सुंदर पुस्तक सांगावयाचें राहूनच गेलें. 'महाराष्ट्र बुद्धिप्रधान आहे आणि तो गांधीजी व काँग्रेस यांच्या मागें कधींच नव्हता' असें सांगणाऱ्या पर्यंकपंडितांना चोख उत्तर देणारें व रमणीय भाषा-शैलीनें नटलेलें 'सत्याग्रही महाराष्ट्र' (प्रेमा कंटक) हें पुस्तक समारोपाचे घाईंत सांगावें लागत आहे याचें वाईट वाटतें. 'लोकहितवादी' या गृह-स्थाच्या द्रष्टेपणाची हलूंहलूं आपणांस कल्पना होत आहे. त्यांचीं 'शतपत्रें' तर अवश्यमेव वाचा. पण त्यांच्या अवतारकार्याची यथार्थ कल्पना देणारा 'लोकहितवादी' (व्यक्ति आणि वाङ्मय–ले. क्षीरसागर) हा उद्बोधक लेख प्रथम पहा अशी माझी नम्र सूचना आहे. अहिंसा हें एक थोतांड आहे असें प्राकृत जनांचें मत आपणांला तितकेंसें पटत नाहीं. पण आपल्या श्रद्धेला

बुद्धिवादाचें चिलखत चढविण्यासाठीं ‘ गांधींची अहिंसा ’ (देवगिरीकर) आणि ‘ निःशस्त्राचें राजकारण ’ ( ले. डॉ. श्री. व्यं. केतकर ) ह्या पुस्तकांचा अभ्यास जरूर आहे हें सांगावेंसें वाटतें. यांत ‘मानवी कर्तव्यें ’ हें मॅझिनीचें पुस्तक तन्मयतेनें अभ्यासा. आपल्या सात्त्विक राष्ट्रवादाला पोषक असें युरोपीय वाङ्मयांत याहून सुंदर पुस्तक क्वचित् असेल. नियतकालिकांच्या ढिगाऱ्यांत दडलेले अनेक विचारप्रवर्तक लेख यांत आले नाहींत हें सांगतों. हल्लींच प्रसिद्ध झालेलें युसुफ मेहेरअलीचें ‘ MODERN WORLD’ ( A study syllabus ) हें पुस्तक राजकीय अभ्यासकांना काय वाचावें यासाठीं अतिशय उपयुक्त आहे. असो. माहितींत न्यून पुष्कळच आहे. ‘ न्यून तें पुरतें । करून घ्यावें तुमतें । विनवितसे ’

---

# साधना :: १६

हें शेवटचें प्रकरण आहे! आनंद आणि औदासीन्य या दोनहि भावनांनीं माझें अंतःकरण व्यापून टाकिलें आहे! आनंद कशाकरितां हें सांगणें नकोच! माझें राजकीय कथन मी यशस्वी रीतीनें करूं शकलों याबद्दल मला आनंद आहे. विशेषतः हा कालखंड मोठा कठीण व वादळी असता मी लिखाण लिहूं शकलों याबद्दल कां संतोष वाटणार नाहीं? देशाच्या खवळलेल्या परिस्थितींत हें पुस्तक तयार झाल्यामुळें याची गोड स्मृति विशेष उत्कट झाली आहे. ती माझ्या व वाचकांच्या जीवनांत सदैव दरवळत राहील असें निश्चित वाटतें. पण या मधुर विचाराबरोबरच औदासीन्याची सावलीहि मनावर दाट पडली आहे हें नाइलाजानें सांगावें लागतें. आतां पुस्तकरूपानें आणखी राजकीय गप्पा मारता येणार नाहींत याची जाणीव मनाला व्यथित करते. असो. या ठिकाणीं आपण एकमेकांच्या सहकार्यानें संपादिलेलें ज्ञान आपल्या वैयक्तिक व सामाजिक मोक्षासाठीं उपयोगीं पडावें असें माझ्याप्रमाणें तुम्हालाहि वाटत असेल. या पुस्तकांत जें मी लिहिलें आहे त्यांत माझें असें फार थोडें आहे. जगांत आपलें जीवित उच्चतर कसें करावें याविषयीं द्रष्ट्या महानुभावांनीं प्रकट केलेलीं सूत्रें जमवून मीं तुम्हांपुढें मांडलीं. "फोडिलें भांडार, धन्याचा हा माल, मी तों हमाल

भारवाही " असें खोट्या नम्रतेनें नव्हे तर खऱ्या अर्थानेंच म्हणतों. आणि त्यांत मला कमीपणा वाटत नाहीं. आपल्या जीवनांत ज्यांचें व ज्यांच्या उपदेशाचें मंगल दर्शन आपणांला घडलें त्यांचा संदेश भाविकांना सांगणें याहून दुसऱ्या कशांत अधिक कृतार्थता आहे असें मला वाटत नाहीं. आणि ही कृतार्थता थोडीफार मला अनुभवायला मिळाली हें सांगण्यांत कमीपणा कसला?

राष्ट्राच्या जीवनांतले अनेक महत्त्वाचे प्रश्न मी चर्चेला घेतले. त्यांत निःपक्षपाती चर्चा करण्याचा शक्य तेवढा मीं प्रयत्न केला. कुणाचें श्रेय नाकारलें नाहीं. ज्याचें देणें त्याला दिलें. पण तरीहि विवेचनांत माझ्या आवडीनिवडीचें स्पष्टास्पष्ट प्रतिबिंब पडलें असेल. माझ्यासारख्या भावनाशील व कल्पवादी माणसाच्या बाबतींत असें होण्यावांचून गत्यंतर नसतें. माझी विचारसरणी तुम्हीं ओळखली असेलच. पण तरीहि कित्येकांनीं अनेकवेळां सांगितलें कीं, "तुम्हीं वेगवेगळ्या विषयांवर उलट सुलट प्रतिपादन केलें. तर आपण काय करावें यासंबंधीं नेमकें काहीं तरी सांगा." त्या आग्रहाचा अर्थ मी असा समजतों कीं आजवर जीं मतें वेळोवेळीं प्रकट केलीं त्यांचें संकलन करावें तेच आज मी करणार आहें.

आजवर आपण जे विषय घेतले त्यांत हिंदी स्वातंत्र्य हा मध्यबिंदु होता आणि हिंदी राष्ट्रवाद हा त्याचा परिघ होता. पण हिंदी स्वातंत्र्याची कल्पना परसत्तेचें जूं दूर करणें एवढीच करूं नका. पण इतिहासाच्या घडामोडींत कुणीं सांगावें कदाचित् हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न फार थोड्या सायासांनीं सुटूनहि जाईल. परंतु असें परिस्थितीच्या दावानें मिळालेलें हें स्वातंत्र्य परिस्थिति बदलतांच आपण गमावूनहि बसूं. आपण आपल्या सर्व जीवनाला शिस्त लावून स्वतःच्या शौर्यानें व त्यागानें जें स्वातंत्र्य मिळवूं तें आपणांला जोसमीनें सांभाळतां येईल. स्वातंत्र्यासाठीं सिद्धता करतांकरतांच आपण स्वातंत्र्यरक्षणाचें सामर्थ्य मिळवीत असतों. म्हणून बाह्यतः विफल वाटणारी स्वातं-

त्याची प्रत्येक मोहीम ही अंतिम यशाच्या दृष्टीनें यशस्वीच झालेली असते. स्वातंत्र्य याचनेनें मिळणार नाहीं हें निश्चित आहे. तसेंच जगातल्या क्रूर व प्रतिगामी शक्तींशीं संगनमत करूनहि तें मिळणार नाहीं. आज दुसऱ्यांच्या नाशासाठीं रक्ताच्या नद्या वाहविणारे हिंस हुकूमशहा हिंदुस्थानचे यावतींत तेवढे स्वातंत्र्याचें दान करण्याइतके उदार होतील काय ? म्हणून आपल्या देशांत राजकीय हक्क मिळविण्यासाठीं सरकारदरबारीं अर्जविनंत्या करणारे आणि देशाबाहेर जाऊन हुकूमशाहीशीं मैत्री जोडणारे दोनहि प्रकारचे पुढारी, प्रामाणिकपणें राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं झटत असले तरी त्यांचे मार्ग चांगल्या अर्थानें सफळ होणारे नाहींत.

हिंदुस्थान ही जगांतली मोठी बाजारपेठ आहे. हें कच्च्या मालांचें प्रचंड क्षेत्र आहे. तेथें सुपीक शेतांतून अगणित मोत्याचे दाणे तरारून वर येतात तर काळ्याकभिन्न दगडाच्या पोटांत अमूल्य रत्नें व धातू सापडतात. साम्राज्यशाहीचा हा मोठा आधार आहे आणि म्हणूनच हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळालें कीं साम्राज्यशाहीचीं शंभर वर्षे भरलीं हें निश्चित आहे. हिंदी स्वातंत्र्य जगांतून पारतंत्र्याची कायमची हकालपट्टी करील असाच हिंदी राष्ट्रवादाचा महिमा आहे. प्राचीनता, संपन्नता आणि विशालता या गुणांनीं हें राष्ट्र आज जगाच्या अग्रभागीं आहे. एकदां पारतंत्र्याचें पटल त्यावरून दूर झालें म्हणजे हा विशाल राष्ट्रपुरुष जगाच्या कल्याणाकरिता झटायला मोकळा होईल. हिंदुस्थान ज्या ध्येयाची कड घेईल, जी योजना आंखील तें ध्येय व योजना जगन्मान्य होईलच होईल. हुकुमाची उतारी करणें हें भारतवर्षाच्या हातीं असलें पाहिजे. कोणीं किती पिकवावें, कोणीं कोणता माल तयार करावा, कोणीं कोणत्या देशाची व्यवस्था पाहावी, जलमार्गावर गस्त कोणीं घालावी, रानटी टोळ्यांची सुधारणा कोणीं कशी करावी, संशोधनासाठीं कोणी झटावें इ० गोष्टी हिंदुस्थानच्या तंत्रानें झाल्या पाहिजेत. स्पर्धा व द्वेष यांच्या आहारीं गेल्यामुळें जगभर जी मचमच आणि अशांति

पसरली आहे ती नाहींशी होऊन शांतता व सुरक्षितता यांचें राज्य सुरू होण्यास आपल्या विराट् भारताच्या हातीं जगाचीं सूत्रें जाणें जरूर आहे.

म्हणूनच सर्व पीडित जगानें भारतीय स्वातंत्र्याच्या प्रश्नाकडे आपलेपणानें पाहिलें पाहिजे. तशी थोडीशी जागृति झालेली आज दिसते. पण आपण ज्या मानानें स्वातंत्र्याला अधिक लायक होऊं त्या मानानें ही जागृतीहि वाढत जाईल.

स्वातंत्र्य हें साधन आहे. साध्य नव्हे. स्वातंत्र्य स्थापण्यानें आपण मानवतेला उच्च संस्कृति देऊं शकूं. पण केवळ स्वातंत्र्य म्हणजे उच्च संस्कृति नव्हे. ऑक्सिजन् आणि आपले प्राण यांचा जो संबंध तोच स्वातंत्र्य आणि संस्कृति यांचा आहे. पशुकोटीपासून उन्नत होत होत आपण देवकोटीकडे निघालों आहोत. ध्येयाची ही चढण सुसकर व यशस्वी व्हावी यासाठीं झटण्यांतच जीवनाची कृतार्थता आहे. माधुर्य (Sweetness) आणि प्रकाश (Light) अशी संस्कृतीची व्याख्या एक प्रख्यात इंग्लिश कवि करतो. फार रमणीय आहे ही व्याख्या. आणि तितकीच सार्थ आणि संपूर्ण. आपल्या वासनांवर किंवा विकारांवर नियंत्रण ठेवण्याची कला ज्याला साध्य झाली त्याच्याच अंगीं माधुर्य येतें. उगीच संतापून अपशब्द बोलणाऱ्या किंवा क्षणोक्षणीं खदखदा हसणाऱ्या माणसांत माधुर्य गुण आपणांस आढळतो का ? मुळींच नाहीं. संयमनानें माधुर्य येतें तर ज्ञानानें प्रकाश मिळतो. या प्रकाशामुळें जगांतल्या गलबल्यांतून शुद्ध मार्ग दिसतो. सर्व दुःख नाहींसें होतें. 'माधुर्य आणि प्रकाश' या व्याख्येप्रमाणेंच संस्कृतीचें दुसरें एक स्थूल लक्षण आपले वंद्य पुढारी पं. जवाहरलाल नेहरू यांनीं सांगितलें आहे. 'आपल्या मनावर ताबा आणि दुसऱ्याच्या सुखदुःखाची जाणीव' अशी संस्कृतीची व्याख्या पंडितजी करितात. या दोनहि व्याख्यांवर एकाग्र मनानें विचार करा म्हणजे उच्च जीवन म्हणजे कांय याचा साक्षात्कार तुम्हांला होईल.

ऱ्याची प्रत्येक मोहीम ही अंतिम यशाच्या दृष्टीनें यशस्वीच झालेली असते. स्वातंत्र्य याचनेनें मिळणार नाहीं हें निश्चित आहे. तसेंच जगांतल्या क्रूर व प्रतिगामी शक्तींशीं संगनमत करूनहि तें मिळणार नाहीं. आज दुसऱ्यांच्या *नाशासाठीं रक्ताच्या नद्या वाहविणारे हिंस हुकूमशहा हिंदुस्थानचे बाबतींत* तेवढे स्वातंत्र्याचें दान करण्याइतके उदार होतील काय ? म्हणून आपल्या देशात राजकीय हक्क मिळविण्यासाठीं सरकारदरबारीं अर्जविनंत्या करणारे आणि देशाबाहेर जाऊन हुकूमशाहीशीं मैत्री जोडणारे दोनहि प्रकारचे पुढारी, प्रामाणिकपणें राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं झटत असले तरी त्यांचे मार्ग चांगल्या. अर्थानें सफळ होणारे नाहींत.

हिंदुस्थान ही जगातली मोठी बाजारपेठ आहे. हें कच्च्या मालांचें प्रचंड क्षेत्र आहे. तेथें सुपीक शेतांतून अगणित मोत्यांचे दाणे तरारून वर येतात तर काळ्याकभिन्न दगडाच्या पोटात अमूल्य रत्नें व धातू सांपडतात. साम्राज्यशाहीचा हा मोठा आधार आहे आणि म्हणूनच हिंदुस्थानला स्वातंत्र्य मिळालें कीं साम्राज्यशाहीचीं शंभर वर्षे भरलीं हें निश्चित आहे. हिंदी स्वातंत्र्य जगातून पारतंत्र्याची कायमची हकालपट्टी करील असाच हिंदी राष्ट्रवादाचा महिमा आहे. प्राचीनता, संपन्नता आणि विशालता या गुणांनीं हें राष्ट्र आज जगाच्या अग्रभागीं आहे. एकदां पारतंत्र्याचें पटल त्यावरून दूर *झालें म्हणजे हा विशाल राष्ट्रपुरुष जगाच्या कल्याणाकरितां झटायला* मोकळा होईल. हिंदुस्थान ज्या ध्येयाची कड घेईल, जी योजना आंखील तें ध्येय व योजना जगन्मान्य होईलच होईल. हुकुमाची उतारी करणें हें भारतवर्षाच्या हातीं असलें पाहिजे. कोणीं किती पिकवावें, कोणीं कोणता माल तयार करावा, कोणीं कोणत्या देशाची व्यवस्था पाहावी, जलमार्गावर *गस्त कोणीं घालावी, रानटी टोळ्यांची सुधारणा कोणीं कशी करावी,* संशोधनासाठीं कोणी झटावें इ० गोष्टी हिंदुस्थानच्या तंत्रानें झाल्या पाहिजेत. स्पर्धा व द्वेष याच्या आहारीं गेल्यामुळें जगभर जी मचमच आणि अशांति

कल्याणकारण मूल्यें आहेत त्यांना आपण घट्ट धरूं. म्हणजेच आपला विध्वंस टळेल. विनाशाच्या शक्तीचा आणि मृत्यूचा प्रतिकार करणारा आधुनिक 'मार्कंडेय' आपणांला परम भाग्यानें लाभला आहे. त्याची तपश्चर्या वाया न जाऊं देणें आपल्या हातीं आहे.

या कामीं स्त्रियांना तर मोठाच वाटा उचलायचा आहे. नवीन संस्कृति निर्माण करण्याचे कामीं स्त्रियांना कोणती महत्त्वाची भूमिका करावयाची आहे यासंबंधीं मला थोडें सांगितलें पाहिजे. मी निःसंदिग्ध शब्दात सागतों कीं चूल आणि मूल एवढेंच स्त्रियाचें कार्य क्षेत्र आहे असें सागणारे पंथ क्रांति-विरोधी, मागासलेले व हिंसावादी आहेत. फॅसिस्ट व नाझी हुकूमशहांनीं सार्वजनिक जीवनांतून स्त्रियांची हकालपट्टी करून त्याना परत स्वयंपाकघरांत कोंवलें! राष्ट्राला शिपाई पुरविणें एवढेंच त्याचें जीवितकार्य असा या पंथांचा समज आहे. स्त्रियांविषयींची ही अनुदार व मध्ययुगीन नाझी कल्पना दुर्दैवानें आपल्याकडेहि कित्येक राजकीय पंथांनीं अंगीं मुरवून घेतली आहे. हे पंथ थोड्याबहुत प्रमाणात जातिनिष्ठ आहेत हें लक्षात ठेवलें म्हणजे जातिनिष्ठ संस्था या केवळ क्रांतिविरोधीच असतात असें नव्हे तर सामाजिक वागणींतहि त्या बुरसट विचाराच्या कशा असतात हें तुम्हाला उमगेल. स्त्रियांना पडदानशीन ठेवण्यात अजूनहि या लोकांना खानदानीपणा वाटतो. आपण पराक्रम करून आलों म्हणजे पंचारती घेऊन आपणांला ओवाळणें एवढेंच स्त्रियाचें मंगल कर्तव्य अशा मताचे बरेच आहेत. पुरुषाच्या स्फूर्तिदायी महिलेला पुरुषाचें एक लेणें किंवा त्याच्या चैनीची वस्तू म्हणून समजणाऱ्या ह्या पंथांवर प्रथम कोणीं कडक बहिष्कार घालायला पाहिजे असेल तर तो स्त्रियांनींच!

जगाच्या संस्कृतींत स्त्रियांचें स्थान पुरुषाबरोबरचें आहे असा प्रगल्भ विचार माडणारे पक्ष हेच खरे पुरोगामी होत. मात्र या ठिकाणीं मला एक-दोन गोष्टींचा खुलासा करावासा वाटतो. स्त्रीच्या दर्जाबद्दल इंग्लंड, अमेरिका,

रशिया इ. देशांतली पुढारलेली वृत्ति हीच खरी निर्दोष आहे यांत शंका नाहीं. पण समान हक्क मिळविण्यासाठीं व वापरण्यासाठीं तिकडे जे हास्यास्पद प्रकार घडले तसे मात्र आपणांकडे होऊं नयेत. समान दर्जा म्हणजे समान कामें नव्हेत हें स्त्रियांनीं लक्षांत ठेविलें पाहिजे. "आपल्यांतील निम्मी लोकसंख्या ( स्त्रिया ) जोंपर्यंत स्वयंपाकघरात डांबलेली आहे. तोंपर्यंत आपला कसा उद्धार होणार?" अशा आशयाचे उद्गार लेनिननें काढले आहेत. ते फार अर्थपूर्ण आहेत. पण स्वयंपाकघरांतून बाहेर पडल्यावर आपण एकदम रणगाड्यावर किंवा आगबोटीच्या सुकाणूंवर जाऊन बसूं हाहि स्त्रियांचा आग्रह विचित्रच म्हणावा लागेल. स्त्रियांनीं जीवनाच्या आघाडीवर पुरुषांच्या बरोबरीनें असावें. पण स्त्रियाच्या अंगीं जे विशिष्ट गुण आहेत त्याचा प्रभाव पडेल अशींच कामें त्यांनीं निवडावीं. आपलें जीवन जर व्यवस्थितपणें व गोंधळ न होतां विकसित होत राहिलें तर स्त्रियांना त्यांच्या विशिष्ट नैसर्गिक शक्तींना योग्य अशींच कामें सहजासहजीं मिळत जातील.

या बाबतींत चिनी महिलाचा आदर्श फार अनुकरणीय आहे. पूर्वेकडील स्त्रिया म्हणजे मागासलेल्या, 'चूल नि मूल' यांत गर्क, अशिक्षित व भित्र्या अशी समजूत आहे. आणि तींत थोडेंफार तथ्यहि आहे. त्यातल्यात्यांत चीन देशांतल्या स्त्रिया तर फारच मागासलेल्या. पण आज चीनमध्यें नवी जागृति झाली आहे. मादाम चाग कै शेक या सुविद्य व कर्तबगार स्त्रीनें चिनी स्त्रियांत नवचैतन्य उत्पन्न केलें आहे. राष्ट्राच्या अनेक शाखात स्त्रिया प्राविण्यानें काम करीत आहेत. जपानच्या पाशवी आक्रमणानें देश हैराण झाला असतां पुरुषाप्रमाणेंच स्त्रियाहि राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठीं अहोरात्र झटत आहेत. चीनमध्यें समान हक्कासाठीं वाद झाले नाहींत, मोर्चे निघाले नाहींत, पुरुषांना शिव्या खाव्या लागल्या नाहींत. राष्ट्रावर संकट येताच स्त्रियातले सुप्त गुण प्रकट झाले. पुरुषाच्या बरोबरीनें आपणांकडेहि याचा प्रत्यय आलेला आहे. गेल्या २५ वर्षांत राष्ट्रीय संग्रामाच्या आघाडीवर हजारों हिंदकन्या आनंदानें

हाल सोसायला पुढें आल्या. त्यांचें शौर्य, त्याग, देशप्रीति हीं कुणाला गौरवास्पद वाटणार नाहींत.

गांधीजी म्हणतात, स्त्री ही त्यागाची केवळ मूर्ति आहे. आपणांला जें नवीन शांततामय जग रचायचें आहे त्यासाठीं त्यागाची व दुःख सोसण्याची प्रचंड तयारी आपणांस करावी लागेल. आपले त्रिखंडकीर्ति तत्त्वज्ञानी डॉ. सर राधाकृष्णन् म्हणतात, "व्यवहारांतील कायद्याची तमा न धरतां आणि निराशेची पर्वा न करतां जे झटतात त्यांच्याच हातून महत्कार्य होतें· आपल्या प्राचीन ऋषींना भय माहित नव्हतें. ते मृत्यूलाहि भीत नसत. बुद्धानें आपला राजवाडा सोडून कष्टाचा रस्ता धरला आणि नवधर्माची स्थापना केली. खिस्ताचें जीवन कष्टाचें होतें. यातना सोसण्याची तयारी आहे त्यांनाच सत्याचा तळ गांठतां येतो. यातना सोसण्याचे बाबतींत आम्ही पुरुष केवळ हौशी आहोंत. पण आमच्या स्त्रिया मात्र कसलेल्या व्यवसायी आहेत. नवीन हिंदुस्थानची उभारणी करण्यांत त्यांचा वांटा मोठा आहे."

अहिंसेच्या बाबतींत महात्माजींना स्त्रियाविषयीं किती आदर आहे आणि त्याविषयीं त्यांनीं स्त्रियांकडून केवढ्या अपेक्षा केल्या आहेत हें मीं मागें सांगितलेंच होतें. 'स्त्री' या विषयावर आपल्या भारताचे प्रतिभाशाली कविसम्राट रविंद्रनाथ टागोर यांनींहि अति उदात्त विचार मांडले आहेत. "Personality" या त्यांच्या सुंदर निबंधसंग्रहांत हा निबंध आहे. ज्यांना शक्य असेल त्यांनीं तो जरूर वाचावा. रवीन्द्र म्हणातात—

"पावित्र्य, नम्रता, भक्ति, आणि त्यागाची शक्ति हे गुण पुरुषापेक्षां पुष्कळच प्रमाणांत अधिक स्त्रीमध्यें आहेत. निसर्गाच्या बेफाम शक्तींना कह्यांत आणून त्यांतून सौंदर्य निर्माण करावयाचें व तें जीवनाच्या कारणीं लावावयाचें याला हेच गुण उपयोगी पडतात···मानवाची आजची संस्कृति ही निर्भेळ पुरुषी आहे. स्त्रीला तींत स्थान नाहीं. म्हणून या संस्कृतीचा तोल

सुटला असून एका युद्धातून दुसरें युद्ध असा तिचा क्रम सुरू आहे. विनाशाच्या शक्तींनीं ही संस्कृति बनलेली असून असंख्य जीवांचा होम तिच्यापायीं होत आहे. या संस्कृतीच्या एकाडेपणानें ती वादळांच्या मालिकांतून रखडत चालली आहे. आता अशी वेळ आली आहे कीं स्त्रियांनीं पुढें येऊन या सत्तेच्या बेफाम आंदोलनाला ताब्यात आणून तिच्यात लयबद्धता, तोल आणावा."

यापेक्षा समर्पक व यापेक्षां उदात्त संदेश स्त्रीजगताला कोण देऊं शकेल?

भुकेचा प्रश्न सुटल्याशिवाय कुठलीहि सुधारणा करता येणार नाहीं हें खरें. पण एकदां कारखाने आणि शेती राष्ट्राच्या मालकीची झाली कीं झोपड्यांतून लगोलग संस्कृति व सुवत्ता नांदूं लागेल हें समजणें चुकीचें आहे. आपल्यातल्या कोट्यवधि लोकाना आज पिढ्यान् पिढ्या स्वच्छता, आरोग्य, शिक्षण, कला यांचें दुरूनहि दर्शन नाहीं. या लोकाची अन्नवस्त्राची तरतूद आज केली कीं उद्यां सकाळीं त्याना स्वच्छतेचें महत्त्व कळेल. त्यांच्या तोंडीं असलेल्या शिव्या जाऊन ते शुद्ध भाषा बोलूं लागतील, आणि त्याना आपल्या जीवनांत संपन्नता कशी आणावयाची याचें ज्ञान होईल हें समजणें वेडगळपणाचें होईल. बहुजनसमाजाच्या भुकेचा प्रश्न सुटला, मूठभर श्रीमंत वर्गानें चालविलेली असंख्य गरिबांची पिळवणूक बंद झाली तरी पिढ्यान् पिढ्या असंस्कारित राहिलेल्या त्यांच्या जीवनाला आपण जाऊन वळण द्यावें लागेल. त्यांच्या झोपड्यांशीं जाऊन स्वच्छता व संस्कृति याचे धडे त्यांना द्यावे लागतील. आपणाला वर्णाभिमान सोडावा लागेल. ज्याच्याकरिता आपण हें करणार त्यांना कदाचित् आपलें ध्येय किती उच्च आहे हें कळणार नाहीं. हे उच्चवर्णीय लोक स्वार्थी मतलबीपणामुळें हें सर्व करीत आहेत असा गैरसमज होऊन बहुजनसमाज तुम्हाला शिव्याहि देईल. पण मुकाट सहन करुन तुम्ही आपलें कार्य चालू ठेवलें पाहिजे. आपल्याबद्दल त्यांच्या मनांत दंश असणें साहजिक आहे. पण हा दंश नाहींसा होण्यास प्रत्यक्ष कार्य केल्या-

शिवाय उपाय नाहीं. प्राचीन यतिवर्ग, बौद्ध संन्यासी किंवा आधुनिक मिशनरी व आर्यसमाजी या मंडळींची सेवावृत्ति तुम्ही अंगीं बाणवा. "कमी आकर्षक पण अत्यंत भरीव असें व्यक्तिसुधारणेचें काम तुम्ही हातीं घ्याल तेव्हांच एकंदर समाजाची उन्नति होईल." असें डॉ. राधाकृष्णन् यांनी १९३३ सालीं अखिल भारतीय महिला परिषदेंत सांगितलें तें मनन करा. आतां हें काम कशा पद्धतीनें करायचें तें तुम्ही आपापल्या आवडीनिवडी व अनुकूलता लक्ष्यांत घेऊन ठरवा. मला मुख्य दोनच गोष्टी सांगावयाच्या आहेत. गिरिकंदरीं जाऊन आपल्या एकट्याच्या मोक्षाकरितां तप साधन करण्याचें तें प्राचीन युग आतां संपलें. आतां आमच्या मोक्षसुखाची **साधना** समाजाच्या सुधारणेसाठीं झटतां झटतांच झाली पाहिजे. वैयक्तिक मोक्ष आणि सामाजिक मोक्ष यांच्यातली सीमारेषा आतां नष्ट झाली आहे. दुसरें म्हणजे आपल्या देशांत कामाचे हिमालय पडले आहेत. सर्वस्व समर्पण करणाऱ्या आजीव समाजसेवकापासून तो यथाशक्ति लोकगंगेचें पूजन करणाऱ्या संसारी कार्यकर्त्यापर्यंत मिळतील तेवढीं माणसें आम्हांस पाहिजेत आहेत. संसाराच्या किंवा वैयक्तिक जीवनाच्या अरण्यांत लुप्त होऊन किंवा गढून जाऊं नका. समाजाच्या दलित विभागाची, आपल्या मातृभूमिची आठवण ठेवा.

राजकीय विषयांवर लिहितांना मी कांहीं निश्चयात्मक सांगतच असे. पण आपण जे विषय घेतले व जी चर्चा केली त्यातला गाळून असा कांहीं भाग घ्यावा हें बरें.

लोकशाही ही शासनसंस्थेंतली सर्वश्रेष्ठ अवस्था आहे. प्रत्येक व्यक्ति सुखी व्हायची असेल तर लोकशाहीचाच विजय या भूमींत झाला पाहिजे. हुकूमशाहीचीं कितीहि झगझगीत वर्णनें तुम्हीं वाचलीं किंवा ऐकलीं तरी वंशाभिमान, द्वेष, हिंसा, वतनदारी इ० दुर्गुणांनीं हुकूमशाही बरबटलेली आहे हें लक्षांत ठेवा. अमेरिका, फ्रान्स, इंग्लंड, रशिया तुर्कस्थान, चीन इ० देशांत लोकशाहीचे वतीनें जे संग्राम व ज्या क्रांत्या झाल्या त्यांनीं मानवतेचें

कांहीं असाधारण गुण आहेत. निसर्गावर विजय मिळविण्याची ईर्षा, उद्योग-प्रीति, सामुदायिक निष्ठा, या जगांतल्या वैभवाची आस्था, शास्त्रीय दृष्टि, बुद्धिवाद, अशा कित्येक उत्कृष्ट गोष्टी पाश्चात्य संस्कृतीपासून आपणांला शिकल्या पाहिजेत. तिचे दुष्परिणाम आज दिसतात पण हा दोष त्या संस्कृतीच्या उपासकांचा आहे. त्या संस्कृतीचा नव्हे. हिंदुस्थान हें प्रयाग व्हावें. प्राचीन संस्कृतीचा शतकानुशतकें वाहत आलेला ओघ आणि पश्चिमेकडील संस्कृतीचा प्रवाह याचा संगम हिंदुस्थानांतच व्हावा. असा हा संगम सर्व जगाच्या आदराला पात्र व्हावा आणि या विशाल संगमात युद्ध, पिळवणूक इ० क्रूर गोष्टींच्या अस्थींचें विसर्जन व्हावें असें भव्य ध्येय आपल्या डोळ्यांपुढें आपण ठेवूं या. आपल्या कर्तबगारीवर या ध्येयाची पूर्तता अवलंबून आहे.

हिंदुस्थानच्या स्वातंत्र्याचे मार्गात जातीय प्रश्न हा मोटाच अडथळा आहे अशी भीति वाटते. कुणाच्या मतें तर यादवी ही होणारच असें जवळ जवळ निश्चित आहे! मला अशी भीति फारशी वाटत नाहीं. आणि माझी अशी मेसूर इच्छा नसल्यानें तें अशुभ भविष्य वर्तविण्याचा चोरटा आनंद मला उपभोगायचा नाहीं. यादवीच्या भीतीनें (कीं आशेनें?) ज्यांनीं वालोपासना चालविली आहे त्यांनीं ती खुशाल चालवावी! स्वातंत्र्याच्या प्राप्तीशिवाय जातीय प्रश्न नीटपणें सुधारणार नाहीं आणि जातीय त्रिकोणातील एक परदेशी रेषा दूर गेल्यावर त्या प्रश्नाला आजच्याइतकें उग्र स्वरूप राहणारहि नाहीं. अल्पसंख्यकांचा प्रश्न आपण घरच्या भाडणासारखा प्रेमानें व सामोपचारानें सोडवूं, त्यांच्या मानानें त्याना भरपूर पासंग देऊन वहुसंख्यकांच्या हक्काचीहि पायमल्ली न करतां एक राष्ट्रीय योजना आखू, आणि अल्पसंख्यकांच्या चढेल पुढाऱ्यांची कदर न करतां त्यांच्या वहुजनसमाजाच्या मतपरिवर्तनाठीं तनुमनधनानें झटूं या. या मार्गानें यश येणार ही खात्री ठेवा. निदान जें थोडेंबहुत यश मिळत जाईल तें टिकाऊ व वावनकशी असेल. केवळ प्रति-

प्रयत्न करून त्या गाड्याला अधिक गति व योग्य दिशा देऊं शकतों याचा आत्मप्रत्यय आज आपणांला आला आहे.

संपत्ति व तिच्यामुळें फोफावलेली संस्कृति यामुळें अगणित बहुजनसमाज हा हीनतेच्या भावनेनें ( Inferiority complex ) आजवर ग्रासलेला होता. दैववाद व अंध श्रद्धा यांनीं तो पीडिला होता. पण आपल्या या स्थितीला आपण कारण नसून पैसा व उत्पादनसाधनें आपल्या हातीं ठेवणारे मूठभर धनिक याला जबाबदार आहेत हें कळल्यानें बहुजनसमाजाचा तो हीनतेचा भाव लोपत आहे. मानव तेवढा सारखा असा रास्त विश्वास समाजवादानें उत्पन्न केला आहे. धर्मांनीं व धर्मदीपकांनीं देवाच्या द्वारीं जी समता स्थापिली ती व्यवहाराच्या पातळीवर प्रतिष्ठित करण्याचें महान् कार्य समाजवाद आज करीत आहे. स्पर्धा व युद्धें बंद करून सहकार्याचें राज्य सुरू करण्याचें ध्येय समाजवादानें बाळगलें आहे. यावावर्तीत जगानें, विशेषतः दलित व परतंत्र समाजानीं आपल्या अक्षौहिणी बिनदिक्कत समाजवादाच्या पक्षांकडे धाडून द्यावा.

पण समाजवादाच्या आर्थिक व राजकीय बाजूचा मी चहाता असलों तरी त्या तत्त्वज्ञानाची आध्यात्मिक व मानवशास्त्रीय बाजू माझ्या मनःप्रकृतीला मुळींच मानवत नाहीं. समाजवादी आग्रहानें कबूल न करोत, पण वैयक्तिक जीवनाची आबाळच नव्हे तर पायमल्ली करणारें हें तत्त्वज्ञान वाटतें. जुन्या रूढींच्या ऐवजीं नव्या रूढी समाजवादानें बनविल्या आणि नवी अंधश्रद्धा उत्पन्न केली. गूढगुंजनांत नव्हे तर गूढवादांत रमण्याचा आनंद मी कुठल्याहि ऐहिक सुखाकरितां सोडणार नाहीं. अतींद्रिय गोष्टींवर माझी श्रद्धा आहे. रुक्ष बुद्धिवादाची मजल कांहीं एका मर्यादेपर्यंत पोचूं शकते. पण उच्च आनंद साक्षात्कारानें म्हणजे बुद्धीचा प्रांत ओलांडल्यावर प्राप्त होतो हें माझें मत प्रसिद्ध आहे. ही विचारपद्धति समाजवादाच्या मूलतत्त्वांना अगदीं बाधक आहे हें मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. आणि म्हणूनच समाजवाद्यांचा मी

क्रिया म्हणून द्वेषाचा पंथ स्वीकारण्यानें कोणते धोके आहेत हें मीं विस्तारपूर्वक सांगितलेंच आहे. आम्हांला आमच्या संस्कृतीचें रक्षण तर करावयाचें आहेच; पण त्यासाठीं 'शठे शाठ्यम्' हा न्याय लावून आम्हींच रानटी बनूं लागलों तर संस्कृति कुठें राहिली? अशा आडमार्गांत कायमचें हित नाहीं आणि त्याची जरूरीहि नाहीं. आपल्या सर्व चळवळींत बहुजनसमाजाला प्राधान्य मिळालें आणि साम्राज्यविरोधाचा लढा हवा तेवढा तीव्र झाला म्हणजे जातीय प्रश्नांच्या दुष्ट गाठी आपोआप वितळूं लागतील.

समाजवादाबद्दल मी कांहीं सांगावें अशी अपेक्षा काहींनीं व्यक्त केली आहे. कारण प्रत्यक्ष किंवा सूचित असा त्याचा उल्लेख माझ्या लिखाणांतून अनेकदां आला आहे. हें एक नवीन आणि प्रभावशाली तत्त्वज्ञान आहे. आतांपर्यंतच्या मानवी इतिहासाच्या ओघात त्यानें प्रचंड खळबळ माजविली आहे, तेव्हां त्यावर चार वाक्यांत मीं कांहीं सांगणें अवश्य आहे. एखाद्या विषयांत आपण कुतूहलानें शिरतों. प्रथम त्याचा विस्तार आपणांला गुंग करतो. पुढें प्रत्यक्ष जरी नाहीं तरी बुद्धीनें त्या विस्ताराच्या मर्यादा आपणांला कळतात आणि आपण कांहीं बरें वाईट मत बनवितों. तसेंच समाजवादाबद्दल माझें झालें आहे.

इतिहासाच्या विकासाकडे पाहाण्याची एक नवी दृष्टि समाजवादानें आपणांला दिली. तिचा उल्लेख मीं 'नवी दृष्टि' या माझ्या पहिल्या लेखांत केला होता. आणि नंतरहि कित्येक गोष्टींचा उलगडा करण्यासाठीं तिचें साह्य घेतलें. पूर्वीच्या केवळ भावनात्मक किंवा गोंधळलेल्या दृष्टीपेक्षां या नव्या दृष्टीनें इतिहास आपणांला अधिक चांगला कळतो हें मान्य केलें पाहिजे. आपल्या पुढच्या योजनांत अशा या शास्त्रीय दृष्ट्या झालेल्या इतिहासज्ञानाचा फार उपयोग होईल. मानवी समाज हें कांहीं उत्पातांनीं व अपघातांनीं चाललेलें गाडें नसून त्याच्या गतींत कांहीं शिस्त आहे व आपण

प्रयत्न करून त्या गाड्याला अधिक गति व योग्य दिशा देऊं शकतों याचा आत्मप्रत्यय आज आपणांला आला आहे.

संपत्ति व तिच्यामुळें फोफावलेली संस्कृति यामुळें अगणित बहुजनसमाज हा हीनतेच्या भावनेनें ( Inferiority complex ) आजवर ग्रासलेला होता. दैववाद व अंध श्रद्धा यांनीं तो पीडिला होता. पण आपल्या या स्थितीला आपण कारण नमून पैसा व उत्पादनसाधनें आपल्या हातीं ठेवणारे मूठभर धनिक याला जबाबदार आहोत हें कळल्यानें बहुजनसमाजाचा तो हीनतेचा भाव लोपत आहे. मानव तेवढा सारखा असा रास्त विश्वास समाजवादानें उत्पन्न केला आहे. धर्मांनीं व धर्मदीपकांनीं देवाच्या द्वारीं जी समता स्थापिली ती व्यवहाराच्या पातळीवर प्रतिष्ठित करण्याचें महान् कार्य समाजवाद आज करीत आहे. स्पर्धा व युद्धें बंद करून सहकार्याचें राज्य सुरू करण्याचें ध्येय समाजवादानें बाळगलें आहे. याचावतींत जगानें, विशेषतः दलित व परतंत्र समाजानीं आपल्या अक्षौहिणी विनदिक्कत समाजवादाच्या पक्षाकडे धाडून द्यावा.

पण समाजवादाच्या आर्थिक व राजकीय बाजूचा मी चहाता असलों तरी त्या तत्त्वज्ञानाची आध्यात्मिक व मानवशास्त्रीय बाजू माझ्या मनःप्रकृतीला मुळींच मानवत नाहीं. समाजवादी आग्रहानें कबूल न करोत, पण वैयक्तिक जीवनाची आबाळच नव्हे तर पायमल्ली करणारें हें तत्त्वज्ञान वाटतें. जुन्या रूढींच्या ऐवजीं नव्या रूढी समाजवादानें बनविल्या आणि नवी अंधश्रद्धा उत्पन्न केली. गूढगुंजनांत नव्हे तर गूढवादांत रमण्याचा आनंद मी कुठल्याहि ऐहिक सुखाकरितां सोडणार नाहीं. अतींद्रिय गोष्टींवर माझी श्रद्धा आहे. रुक्ष बुद्धिवादाची मजल कांहीं एका मर्यादेपर्यंत पोचूं शकते. पण उच्च आनंद साक्षात्कारानें म्हणजे बुद्धीचा प्रांत ओलांडल्यावर प्राप्त होतो हें माझें मत प्रसिद्ध आहे. ही विचारपद्धति समाजवादाच्या मूलतत्त्वांना अगदीं बाधक आहे हें मीं सांगितलें पाहिजे असें नाहीं. आणि म्हणूनच समाजवाद्यांचा मी

'सहप्रवासी' (Fellow traveller) आपणांला म्हणवीत असलों तरी प्रकृतीनें आणि तत्त्वदृष्टीनें माझ्यात व समाजवाद्यात न तुटणारें अंतर कायम राहील.

समाजवादाला जें नवें जग उभें करायचें आहे तें निर्माण करण्यासाठीं समाजवाद जीं साधनें वापरणार म्हणतो तीं त्याच्या ध्येयासारखीं सात्त्विक नाहींत. जगांतल्या व प्रामुख्यानें हिंदुस्थानातल्या वतनदारीचें उचाटन व्हावें यावद्दलच्या आग्रहांत मी कुठल्याहि साम्यवादाला हार जाणार नाहीं. पण हें उचाटन रक्तपात व वर्गयुद्ध यांच्या साह्यानें करणें हा विचार मला भयावह वाटतो. **"पेरूनि नुसतीचि हिंसा। उगवेल कैसी अहिंसा। काय वापा धिवसा या। याज्ञिकांचा"** (नुसती हिंसा पेरून अहिंसा कशी उत्पन्न होईल! या याज्ञिकांच्या धटिंगणपणाला काय म्हणावें?) हें ज्ञानेश्वराचे उद्गार, ध्येय आणि साधनें यांच्या प्रपंचांत अवश्य सन्मानिले पाहिजेत. सर्वांना सुखशांति मिळावी आणि युद्धासारखी आपत्ति कायमची नष्ट व्हावी हें समतावादाप्रमाणेंच गांधीवादाचेंहि उद्दिष्ट आहे. पण हें उद्दिष्ट भौतिक परिस्थिति हवी त्याप्रमाणेंच दुरुस्त केली कीं साध्य होईल असें समाजवादास वाटतें तर माणसाचें अंतरंग बदलल्याशिवाय नुसत्या वरच्या बदलानें कांहीं साध्य होणार नाहीं असें गांधीवादाचें म्हणणें आहे. आणि अंतरंग बदलायचें म्हणजे ध्येयाप्रमाणेंच साधनांतहि शुचिता पाळली पाहिजे, ध्येय व साधनें यांच्यात सुसंगति पाहिजे असें गांधीजी म्हणतात. या माझ्या वक्तव्यावरून समाजवादापेक्षां गांधीवादाशीं माझा ऋणानुबंध अधिक निकटचा आहे असें तुम्हाला पटलें तर मला आनंद होईल. तथापि मी तुम्हाला त्या बाबतींत कुठलाच आग्रह करणार नाहीं. जगाच्या सांप्रतच्या दुरवस्थेंतून याला वर काढण्यासाठीं अंतःपूर्वक झटणारे हे दोनच पंथ आहेत. त्यांचा अभ्यास तुम्ही निष्ठेनें व निग्रहानें करा आणि मग भौतिक स्थिति बदलून जगदुद्धार करायला निघालेला समाजवाद व मानवाच्या अंतरंगांत पालट घडेल असा योग उपदेशून शाश्वत शांतीचें राज्य स्थापूं पाहणारा गांधी-

वाद यांतलें कोणतें तत्त्वज्ञान पत्करायचें याचा निर्णय तुम्हांला न गोंधळतां घेतां येईल.

याप्रमाणें आज आपल्या विचारविनिमयाचा समारोप करतांना मला जें जें सांगावयाचें होतें तें अगदीं मोकळ्या मनानें मीं सांगितलें. माझ्या या समारोपाच्या आरंभीं ज्या भक्तिमूलक कृतार्थतेचें वर्णन केलें ती कृतार्थता तुमच्या साह्यानेंच मीं मिळविली आहे. या कृतार्थतेचा आनंद व्यक्त करतांना तुमच्या सहकार्याबद्दल मला अंतःकरणपूर्वक आभार मानल्याबाचून राहवत नाहीं. पण हे आभार ऋणमुक्त होण्यासाठीं नाहींत तर केवळ कृतज्ञतेला भाविक उद्गार देण्यासाठीं आहेत एवढेंच नम्रपणें सांगतो. कारण स्नेहभावाचें ऋण कधींच फिटत नाहीं आणि तें वाढत जावें असें सारखें वाटत असतें. शेवटीं एका पौराणिक कथेचा दाखला देऊन मी ही लेखमाला संपविणार आहे. भारतीय युद्धाचे शेवटीं अर्जुन व अश्वत्थामा यांनीं एकमेकांवर सोडलेल्या अस्त्रांनीं जगांत प्रलय मांडला. जगाचा विनाशकाल समीप आला आहे असें भय वाटूं लागलें. तेव्हां ऋषि, मुनि, देव, गंधर्व यांनीं अर्जुन व अश्वत्थामा यांना आपापलीं अस्त्रें परत घेण्यास सांगितलें. अर्जुन हा शीलवंत व सरलहृदयी असल्यानें आपलें अस्त्र परत घेऊं शकला. पण आत्मिक बळाच्या अभावीं अश्वत्थाम्याला त्या आपल्या अस्त्राचा विधिपूर्वक संहार करतां येईना. शेवटीं नाइलाजानें त्यानें तें अस्त्र पांडव स्त्रियांच्या गर्भावर सोडलें आणि अशा रीतीनें जगाचा नाश वाचविला. अश्वत्थाम्याच्या अस्त्रानें पांडवांच्या कुलाची राखरांगोळीच व्हायची. पण श्रीकृष्णानें चपळाई करून परीक्षितीच्या भोंवतीं आपलें सुदर्शन चक्र फिरतें ठेविलें. त्यामुळें परीक्षितीवर अश्वत्थाम्याच्या अस्त्राचा परिणाम न होतां तो जिवंत राहिला. आणि पांडवांचा वंश जिवंत राहिला. आज जगांतली राक्षसी हिंसा जें जें उत्कृष्ट म्हणून आहे त्यावर आपलें अनावर झालेलें अस्त्र सोडीत आहे. अशा वेळीं नवीन जगाचा अंकुर कायम ठेवण्यासाठीं आपल्या तपस्येचें सुदर्शन तुम्ही फिरतें ठेवा. श्रीकृष्णाचें हें विधायक व जगाच्या धारणेचें सामर्थ्य तुम्ही वापरावें ही कळकळीची विनंति करून तुमची रजा घेतो.

---

परिशिष्ट

# गेलीं दोन वर्षें

दोन वर्षें होऊन गेलीं! कितीतरी घटना एवढ्या काळांत होऊन गेल्या आणि होऊं घातल्या आहेत. त्यातील कित्येक आज भाकड ठरलेल्या दिसत असल्या तरी वेळ येतांच त्यांचे परिणाम दिसूं लागतील. उलट असेंहि होईल कीं आज ज्याच्या प्रभावाकडे आपण दिपलेल्या डोळ्यांनीं पहात आहोंत त्याचें सत्त्व उद्यां संपुष्टातहि येईल. होऊं घातलेल्या घटनांचें स्वरूप आपण आज कल्पतों त्याहून कदाचित् वेगळेंहि होईल. असो. वेधशाळेंत ज्याप्रमाणें भूगोल-खगोलांतील फेरफार नोंदले जातात त्याप्रमाणें गेल्या दोन वर्षांतील इतिहासांतील महत्त्वाच्या घटना आपण नोंदून घेऊं या; मग अंदाज आणि चर्चा याचा मार्ग खुला आहेच.

ठिकाणीं दोस्त सेनांचें नेतृत्व देण्यांत आलें होतें. दोस्तांची तयारीच त्यावेळीं अपुरी असल्यानें वॅव्हेल यांना पुष्कळ ठिकाणीं अपयशाचे तडाखे सोसावे लागले हे खरें असलें, तरी वॅव्हेल यांनीं केलेली संघटना व रचलेले व्यूह अखेर दूरदर्शीपणाचे ठरले. आणि ॲलेक्झँडर, मॉटबॅटम, मँटगॉमेरी, मॅक आर्थर, आयसेनहावर इ॰ दोस्तांचे निरनिराळ्या आघाडीवरचे सेनासारंग आज वॅव्हेल यांच्या परिश्रमांचीं फळें उपभोगीत आहेत. युद्धारंभींच्या कठीण काळांत वॅव्हेल साहेबांनीं दाखविलेलें धैर्य व समरचातुर्य लक्षांत घेतल्यास हिंदुस्थानचे व्हॉईसरॉयपद त्यांना देण्यांत ब्रिटिश सरकारनें गुणग्राहकताच दाखविली यांत शंकाच नाहीं. पण वॅव्हेल साहेबांना ब्रिटिश साम्राज्यांतलें हें श्रेष्ठ अधिकारपद केवळ त्यांच्या समरपांडित्याचा गौरव म्हणूनच देण्यांत आलें नाहीं. क्रिप्स योजनेच्या वाटाघाटी चालू असतां राष्ट्रसभेचे अध्यक्ष मौलाना अबुल कलम आझाद यांची वॅव्हेल साहेबांशीं मुलाखत झाली होती. त्यावेळीं " या गृहस्थांत सेनापतित्त्वापेक्षां मुत्सद्दीपणाचेच गुण अधिक दिसतात." असे उद्गार मौलाना साहेबांनीं काढले असें म्हणतात. त्यांचा खरेपणा पुढें प्रत्ययाला आलाच. या दृष्टीनें वॅव्हेल साहेबांना येथें आणण्यांत केवळ त्यांचा गौरव करण्याचा हेतु साम्राज्य सरकारचे मनांत होता असें नव्हे तर युद्ध संपण्याच्या व नंतरच्या काळांत हिंदी राजकारणांत आपलें वर्चस्व ठेवणारा खंबीर मुत्सद्दीच या पदावर पाहिजे हा हेतु प्रमुख होता हें सिद्ध होतें.

वॅव्हेल साहेब 'बडे लाट' होण्याचे सुमारास पूज्य कस्तुरबांच्या निधनाची शोकच्छाया सर्व देशभर पसरली होती. पैसा, वैभव, विद्वत्ता, सत्ता यांचा कणहि नसतां कस्तुरबांनीं भारतांच्या इतिहासांत आपलें नांव अजरामर केलें. साधेपणा, पतिनिष्ठा, सोशिकपणा, स्वाभिमान, विशुद्धाचरण त्यागवृत्ति इ॰ गुणांनीं 'बा'नीं प्रवर्तित केलेला दीप अनेक शतकें तेवत राहील. त्यांच्या शुद्ध व तापसी जीवनाला शोभेसेंच मरण त्यांना आलें. २२ फेब्रुवारी १९४४ हा शिवरात्रीचा पुण्य दिन होता. त्या दिवशीं आपल्या जगद्वंद्य पतीच्या

सान्निध्यांत कारागृहामध्यें त्या स्वर्गस्थ झाल्या. कस्तुरबान्या नांवानें निघालेल्या स्मारकनिधीची रक्कम ४–६ महिन्यातच १। कोटीवर गेली. यावरून देशांत त्यांन्याविषयीं केवढा गाढ आदर वसत होता हें सहजच कळून येईल.

वॅव्हेल साहेबानीं आल्याबरोबर तडफेनें कामाला सुरवात केली. बंगालला भेट देऊन तेथील भूकमारीचा प्रथम बंदोबस्त केला. १४ एप्रिल ४४ रोजीं मुंबई शहरांत दारुगोळ्यानीं भरलेलीं जहाजें पेट्न भयंकर नुकसान झालें त्याची चौकशी करून भरपाईची सर्व हमी सरकारकडे आहे असें वॅव्हेल साहेबांनीं आश्वासन दिलें. आणि मलेरियानें गाधीजी आजारी आहेत असें पाहून त्या संधीचा वॅव्हेलनीं फायदा घेतला व ४ मेला आगाखान पॅलेसचे दरवाजे खोलून गांधीजीना मुक्त केलें!! वॅव्हेल साहेबाचें पुढील धोरण जरी फारसें हितावह ठरलें नसलें तरी या २–३ गोष्टी त्यांन्या कारकिर्दींत चांगल्या म्हणून गणण्यास कोणी हरकत घेणार नाहीं.

गाधीजींनीं आपल्या नेहमींच्या निरलसपणानें कारामुक्त होतांच कामाला सुरवात केली. १९४२ सालच्या ऑगस्ट महिन्यात गांधीजी व इतर कॅांग्रेस पुढारी यांना पकडल्यानंतर देशभर जो प्रचड प्रक्षोभ माजला त्याची जबाबदारी सरकार कॅांग्रेसवर टाकीत होतें इतकेंच नव्हे तर दोस्त राष्ट्रें युद्धाच्या अडचणींत सापडली आहेत हें पाहून हुकूमशाही राष्ट्रांच्या मदतीनें सरकारन्या अस्तित्त्वावर जहाल कॅांग्रेस पुढान्यांनीं चळवळीचें पिस्तुल धरलें असेंहि उघड व अप्रत्यक्ष आरोप करण्यांत आले. १९४३ च्या फेब्रुवारींत गाधीजींनीं उपोषण केलें त्यावेळीं सरकारनें "देशातील दंगेधोपे व कॅांग्रेसची जबाबदारी" या नावाचें एक चोपडें प्रसिद्ध करून जगभर कॅांग्रेसच्या आततायीपणाचा डांगोरा पिटण्याचा प्रयत्न केला. कारामुक्त होतांच गांधीजींनीं सरकार व आपण यात झालेल्या पत्रव्यवहाराचा पद्धतशीर प्रचार खाजगी रीतीनें सुरू केला. त्या खाजगीपणाला इतकें तीव्र व व्यापक स्वरूप येत चाललें कीं अखेर नाइलाजानें सरकारनेंच तो पत्रव्यवहार कायदेशीर रीतीनें जगा-

पुढें मांडला. गांधीजींची प्रांजल, राष्ट्रवादी, कळकळीची व ध्येयवादी विचारसरणी सामर्थ्यानें सर्वांपुढें आली.

ऑगस्ट १९४२ चा "चले जाव" (Quit India) ठराव अमलांत येण्यापूर्वीच सरकारनें जबाबदार काँग्रेस नेत्यांना अटक केली. या ठरावांत इंग्रजांनीं हिंदुस्थानवरची सत्ता संपूर्ण सोडून द्यावी अशी आग्रहाची मागणी होती. आणि ब्रिटिशांनीं ती मागणी मान्य न केल्यास देशानें 'करेंगे या मरेंगे' अशा बाण्यानें सामुदायिक चळवळ सुरू करावी असा आदेश होता. हें खरें असलें तरी गांधीजींनी व्हाईसरॉयची मुलाखत घेऊन तडजोडीचा अखेरचा प्रयत्न करावा असेंहि त्यांत होतें.

ठराव पास होतांक्षणींच रातोरात काँग्रेस नेत्यांची गठडी सरकारनें बांधून त्यांना अज्ञात स्थळी नेल्यानें तडजोडीचा तो प्रयत्न करून पाहण्याची संधि आलीच नाहीं. म्हणजे सरकारनेंच एक परीनें चळवळीस आव्हान दिलें. आणि त्यानंतर झालेल्या क्षोभाला दडपून टाकण्यासाठीं 'सिंहासारखी हिंसा' (Leonine Voilence) केली! तेव्हा देशांतील अस्वस्थतेस सरकारच जबाबदार होतें असें गांधीजींनीं आपल्या तेजस्वी व अननुकरणीय शैलीनें प्रतिपादन केलें. चळवळीचें सर्वाधिकारित्व काँग्रेसने आपणांला दिलें असलें तरी आपणांला अटक होतांच तें संपुष्टांत आलें असें गांधीजींचें म्हणणें होतें. *ऑगस्ट ठरावांतला स्वातंत्र्याच्या मागणीचा भाग हा प्रत्येक नागरिकाचा* जन्मसिद्ध हक्कच असल्यानें तो अविवाद्य होता. आणि चळवळ सुरू करण्याचा आदेश ज्या काँग्रेस कमिटीनें दिला तिनेंच त्या आदेशाचें विसर्जन करणें उजू ठरलें असतें. गांधीजींनीं हें सर्व युक्तीवादानें मांडून ऑगस्ट ठराव रद्द करण्याचें नाकारलें!

पण राजकारणांत कोंडी होऊन राहणें देशाच्या सार्वजनिक जीवनाला आरोग्यकारक नसतें. गांधीजी सर्वश्रेष्ठ सत्याग्रही असले तरी वस्तुस्थितीकडे

डोळेझांक करणारे ते नाहींत. देवाण-घेवाणाची वृत्ति ही तर सत्याग्रहात अंगभूतच असते. जेल्डर नावाच्या परदेशी पत्रपडिताला मुलाखत देऊन गांधीजींनीं आपला तडजोडीचा मसुदा सरकारला कळविला आणि कायदेभंग पुनः सुरु करण्याची इच्छा नसल्याचें स्पष्ट केलें. राजाजींन्या हिंदु-मुस्लिम ऐक्याच्या योजनेला सक्रिय पाठिंबा देण्याची तयारी दाखविली; आणि नंतर तर आगस्ट ४२ नंतर 'भुइखालील' देशभक्तांनीं म्हणून जीं 'हिंसात्मक' कृत्यें केलीं होतीं त्यावद्दल नापसंती दर्शवून गुप्त चळवळ्यांनीं प्रकट होऊन सरकारच्या स्वाधीन व्हावें असें सांगितलें !

यामुळें देशांत टीका प्रतिटीकाचें प्रचंड वादळ उठलें ! युद्ध परिस्थितीचा व्यवहारी दृष्टीनें फायदा घ्यायचा सोडून गाधीजींनीं उगीच चळवळ सुरु केली असें म्हणणारे व्यवहार पंडितच गाधीजी सरकारशीं तडजोड करण्यास पुढें येऊन राष्ट्राचा तेजोभंग करीत आहेत अशी टीका करूं लागले ! राजाजी योजनेला संमति देऊन गाधीजींनीं हिंदु जातिनिष्ठ पुढाऱ्यांचा रोष ओढवून घेतला ? गुप्त व हिंसात्मक चळवळीचा गाधीजींनीं निषेध केल्यानें तर अनेक पक्ष चवताळले ! वास्तविक या लोकांना त्या शूर भूमिगत देशभक्तांचें कांहींच सोयरसुतक नव्हतें. कारण त्या देशभक्ताना आपल्या अजस्र सामर्थ्यानें नेस्तनाबूद करणाऱ्या सरकारशीं तनुमनधनानें सहकार्य करण्यात हे पक्ष तल्लीन होते ! हे भूमिगत देशभक्त आणि गांधीजी याच्यातले मतभेद नवीन नव्हते आणि त्यांचें स्वरूप कांहींसें घरगुती भाडणासारखें होतें. गांधीजींनीं केलेल्या टीकेमुळें या राष्ट्रभक्तांना काय वाटलें हें जाहीर होण्यासारखी परिस्थितिहि नव्हती. पण तिचाच फायदा घेऊन गाधीजींवर हल्ले चढविण्याची हौस वर सांगितलेल्या पक्षांनीं भागवून घेतली. शांततेच्या काळीं याच पक्षांना आपण उगीचच त्या अज्ञात कार्यकर्त्यांचा कैवार घेऊन चोंबडेपणा केला असें म्हणण्याची पाळी न येवो म्हणजे झालें !

गुप्त चळवळींचा निषेध गांधीजींनीं केला याबद्दल दोन तीन प्रकारच्या मंडळींना बरें वाटलें. त्यापैकीं निष्ठावंत गांधीभक्तांचें समाधान आपण समजूं शकतों. "अहिंसा तंत्राचा अद्भुत प्रयोग करण्याचें साधन म्हणून परमेश्वरानें मला नियुक्त केलें आहे" असें जे गांधीजी गाढ श्रद्धेनें म्हणतात त्यांच्या अवतार कार्याला लहानसाहि हिंसेचा डाग लागूं नये ह्या निष्ठावंत गांधीवाद्यांच्या अपेक्षेत अनुचित असें कांहींच नाहीं. अन्याय व पारतंत्र्य याविरुद्ध झगडणाऱ्या भूमिगत देशभक्ताच्या त्यागाची पायरी कितीही उच्च असली तरी अहिंसेच्या बाबतींत त्याचा तोल सुटला असें दुःखपूर्वक या गांधीभक्तांना वाटलें. पण धोरण म्हणून गांधीवाद पत्करणारे, मनानें सनदशीर आणि वृत्तीनें क्रांतिविरोधी लोक या भूमिगत क्रांतिकारकांचा निषेध गांधीजींच्या सुरात सुर मिळवून करूं लागले तें दृश्य मात्र हास्यास्पद होतें! ऑगस्ट क्रांतीपासून अलिप्त राहिलेला कम्युनिस्टांचा गट तर भूमिगत चळवळयांच्या जिवावर उठलेला. कारण या चळवळयांच्या पराक्रमामुळेंच कम्युनिस्ट पक्षाचें क्रांतिघातक धोरण जगजाहीर झालें! अर्थात् या चळवळयांच्या कृत्यांचा गांधीजींनीं निषेध करताच कम्युनिस्ट हर्षानें वेडे झाले आणि आपल्या भेसूर राजकीय दुर्दशेचाहि त्यांना क्षणभर विसर पडला. पण काँग्रेसमधील काहीं जहालांना वेळीं अवेळीं 'पचम दळी' म्हणून 'उजव्या' पुढाऱ्यांबद्दल प्रेमाचा पान्हा फुटलेला दाखविण्याचें कम्युनिस्टांचें धोरण फारसें यशस्वी झालें नाही. हळूं हळूं जुने व जबाबदार 'उजव्या' गटाचे काँग्रेस पुढारी कारागृहांतून बाहेर पडत होते. यांतल्या करड्या लोकांनीं कम्युनिस्टांचें सरकारधार्जिणें धोरण जोखलें होतें. म्हणून काँग्रेससारख्या लढाऊ राष्ट्रीय संस्थेपासून या लोकांना कटाक्षपूर्वक दूर ठेवण्याचा या 'उजव्या' गटाच्या थोर पुढाऱ्यांनीं उपक्रम सुरू केला.

गांधीजींनीं राजाजी-योजनेला संमति दिली याबद्दल महासभा व तत्सम पक्ष तर क्षुब्ध झालेच. पण खुद्द काँग्रेसमध्येंहि पुरुषोत्तमदास टंडनसारखे वयो-

वृद्ध व माननीय पुढारी या गोष्टीबद्दल नापसंती दाखवूं लागले. राजाजींना तर हिंदुस्थानांत अनेक ठिकाणीं डांबर, अंडीं यांचा प्रसाद आहीर सभांतून मिळालाच. पण राजाजींची तरफदारी करण्यास निघालेल्या कित्येक प्रांतिक नेत्यांनाहि लोकक्षोभाचा त्रास सहन करावा लागला. राजाजींनीं मुस्लिम प्रधान प्रांतांचा स्वयंनिर्णयाचा हक्क मान्य करून पाकिस्तानला उघड संमति देऊन टाकली असा विरोधकांचा आक्षेप होता. पण राजाजींतर्फे कांहीं सांगता येण्यासारखें खास होतें. हिंदुस्थानला स्वतंत्रता मिळाल्यावर फाळणी अमलांत यावी, हिंदी स्वातंत्र्यासाठीं मुस्लिम लीगनें काँग्रेसशीं सरकार विरुद्ध सहकार्य करावें, मुस्लिम-प्रधान प्रांतात सर्वांच्या मतनोंदणींत बहुमतानें ठरलेला निर्णय अखेरचा समजण्यांत यावा, आणि अशी मोजणी होण्याच्या अगोदर 'अखंड भारतवादी' व 'पाकिस्तान वादी' अशा दोनही पक्षाच्या प्रचारकांना आपापला दृष्टिकोण जनतेला समजावून देण्याचें स्वातन्त्र्य असावें. राजाजी योजनेंत हीं जीं कलमें होतीं त्यांनीं त्या योजनेंतलें पाकिस्तानचें विषार मरून जाणार होतें. पण असें असलें तरी फाळणीच्या अराष्ट्रीय तत्त्वाला संमति तरी का द्यायजची असें राजाजींचे आक्षेपक विचारूं लागले.

सप्टेंबर १९४४ मध्यें राजाजी-योजनेच्या आधारें गांधीजी व जिना यांच्या वाटाघाटी सुरू झाल्या. आणि अखेर त्या नेहमींप्रमाणें निष्फळ ठरल्या! हिंदु व मुसलमान हीं दोन राष्ट्रें हिंदुस्थानात आहेत असला द्विराष्ट्रवाद मान्य करण्याचें गांधीजींनीं साफ नाकारलें! आणि तो पत्करल्या-शिवाय जिना पुढें बोलणें करायला राजीच होईनात! स्वयंनिर्णयाचें रास्त औदार्य दाखविणारे गांधीजीच अखेर खरे 'अखंड भारतवादी' ठरले. या वाटाघाटी सुरू व्हायच्या सुमारासच राष्ट्रीय सरकारबद्दल गांधीजींनीं सुचविलेली योजना वॅव्हेलनीं नाकारली!

इकडे जातीय ऐक्य झालें नाहीं आणि इकडे सरकारनें राजकीय पेच प्रसंग सोडविण्याचें नाकारलें! पण म्हणून गांधीजी स्वस्थ बसले का? हे

तसे वसतील तर त्यांचें लोकोत्तरत्व तें काय? जनतेच्या खऱ्याखुरा उद्धाराचा विधायक कार्यक्रम त्यांनीं हातीं घेतला. कस्तुरबा स्मारक निधीच्या विनियोगाची कल्पना स्पष्ट करून खेड्यापाड्यांतील स्त्रियांना व मुलांना उन्नत करण्यासाठीं नव्या कार्याचा व्याप मांडला. याच काळांत हिंदी पेचप्रसंग सोडविण्यासाठीं राष्ट्रीय सभेचे देशी विदेशी मित्र खटपट करीत होते. ने. ना. सर तेजबहादूर सप्रू यानीं यासाठीं वजनदार लोकांची एक समिति नेमली. इंग्लंडमध्यें मजुरांच्या विराट परिषदेंत हिंदी स्वातंत्र्याची मागणी उचलून धरणारा ठराव पास झाला. १४ नोव्हेंबर १९४४ रोजीं जवाहरलाल नेहरू यांचा वाढदिवस जगभर मोठ्या थाटानें साजरा झाला. अमेरिकेंत तर प्रमुख पत्रांनीं नेहरू विशेषांक काढले. "अमेरिकेचा स्वातंत्र्यदाता जॉर्ज वाशिंग्टन् यांच्या एवढी नेहरूंची योग्यता आहे." असे उद्गार अमेरिकन लोकांनीं काढले. "नेहरूंच्या मानानें त्यांना कैदेंत ठेवणारीं माणसें अत्यंत खुजीं आहेत" असा आहेर या माणसांच्या जातभाईनींच त्यांना दिला!! पंडितजींबद्दल जगभर केवढा गाढ प्रेमादर वसत आहे याचें यायोगें तर प्रत्यंतर आलेंच. पण हिंदी राष्ट्र व हिंदी स्वातंत्र्य याविषयींची जगाची आस्थाहि दिसून आली.

यंदाचें वर्ष एका दृष्टीनें फार महत्त्वाचें आहे. यंदा हिंदी राष्ट्रीय सभेस ६० वर्षे पुरीं होतात. १८८५ सालीं गोकुळदास तेजपाळ पाठशाळेंत मुंबई येथें कॉंग्रेसचें चिमुकलें पहिलें अधिवेशन भरलें. त्यानंतर आज कॉंग्रेसला केवढी जागतिक प्रतिष्ठा प्राप्त झाली आहे पहा! या हीरक महोत्सवाचे वेळीं कॉंग्रेसच्या कर्तृत्वाचा विशाल चित्रपट डोळ्यांसमोरून जातो. वैभवशाली, खळबळींचीं तशींच घेकायदा झालेलीं अनेक अधिवेशनें आठवतात. ध्येयें व साधनें यांची प्रगति व सुसंगति किती साधली व किती व्हावयाची आहे याचा आढावा घेण्याची सुवर्ण संधी या हीरक महोत्सवानें राष्ट्रवादी भारतास दिली आहे.

हिंदी राष्ट्रीय राजकारणाबद्दल एवढें सांगितलें. युद्धाच्या निरनिराळ्या आघाड्यांवरून फेरफटका मारून येण्यास निघालों म्हणजे गेल्या दोन वर्षांत सर्वत्र दोस्तांचा विजयच दिसतो. या दोन वर्षांत दोस्तांनीं दुसरी आघाडी उघडली आणि फ्रान्स स्वतंत्र केला. इकडे जगद्विजयी 'लाल' सेनानीं आपल्या देशांत शिरलेल्या नाझीं राक्षसांना बाहेर काढून चहूबाजूंनीं जर्मनींत प्रवेश केला. आज त्यांची विजयी दौड सारखी चालू आहे पूर्व युरोपांत नाझी अमलाखालीं आलेलीं राष्ट्रें हळूं हळू स्वतंत्र होत आहेत. पण या स्वातंत्र्याबरोबर नवे नवे प्रश्न निर्माण होत आहेत. नाझींची झेंप या देशावर पडताच येथील सरकारें परागंदा होऊन दूर सुरक्षित ठिकाणी जाऊन राहिलीं. नाझींचा राक्षसी टांपांचा नंगा नाच चालू असतां गुप्त संघटना करून, अलोट शौर्य व त्याग दाखवून ज्या देशभक्तांनीं व स्वातंत्र्यप्रिय जनतेनें नाझींचें जोखड झुगारून देण्याचे कामीं दोस्तांना मदत केली ते देशभक्त व जनता नवीन राजवटींत सत्ता मागणारच. ज्या आपल्या देशाला पारतंत्र्याच्या ग्रहणांतून त्यांनीं मुक्त केलें त्याचें राज्ययंत्र चालविण्याचा अधिकार त्यांनाच मिळाला पाहिजे. पण युद्धाच्या ऐन धुमश्चक्रींत दूर राहिलेलीं भेकड वतनदार सरकारें तो अधिकार आपला आहे असें म्हणूं लागलीं. या लढ्यांत रशियानें अर्थातच प्रत्यक्षाप्रत्यक्ष लोकांचा पक्ष घेतला. आणि ब्रिटन-अमेरिकेलाहि अखेर रशियाचेंच म्हणणें मान्य करावें लागलें. कांहीं काळापूर्वी काळ्या समुद्रावर याल्टा येथें रूझवेल्ट, चर्चिल, व स्टॅलिन् या 'बड्या दादां'ची बैठक झाली. जर्मनीचा पराभव झाल्यानंतर त्याचा नीट बंदोबस्त कसा करावा आणि त्यानें पुनः युद्धाची तयारी करून जगाची शांतता नष्ट करूं नये यासाठीं कोणत्या योजना कराव्या याचे आराखडे नक्की झाले. नवा समर्थ व कार्यक्षम राष्ट्रसंघ या युद्धांतून बाहेर येईल असें बेत चालू झाले.

जगाच्या आघाडीवर हिंदुस्थानचें पाऊल पुढें पडण्यास या देशाची आर्थिक उन्नति होणें जरूर आहे. अर्थात् मोठाल्या योजना राष्ट्रव्यापी पायावर करून त्या अमलांत आणल्याशिवाय हें काम होणार नाही. आतां वैयक्तिक प्रयत्नाचें युग संपलें. सामुदायिक सहकार्याशिवाय राष्ट्राचा अभ्युदय अशक्य आहे. ही गोष्ट न पटणारे दुर्मिळच निघतील. सर्व हिंदुस्थानचें राष्ट्रीय प्रमाणावर आर्थिक नियोजन केलें पाहिजे हें कॉंग्रेसनें केव्हांच ओळखलें होतें. पं. जवाहरलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं "राष्ट्रीय संयोजन समिति' ( National Planning Committee ) स्थापन करण्यात येऊन तिनें उत्तम कार्यहि चालविलें होतें. दुर्दैवानें युद्ध व स्वातंत्र्यसंग्राम यांत सांपडून तिचें काम तहकूब झालें! परंतु तिनें निर्मिलेली कल्पना मात्र लोकप्रिय होत गेली. आज ज्या आर्थिक योजना पुढें येत आहेत त्यांचें उगमस्थान ही आर्थिक संयोजन-समितिच आहे असें म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं.

"मुंबई योजना" (The Bombay Plan) ही मुंबईच्या नवकोट नारायणांनीं तयार केलेली योजना आहे. हिला "टाटा-बिर्ला योजना" असेंहि म्हणतात. दोघांच उद्योग-सम्राटांचा उल्लेख या नांवात येत असला तरी सर पुरुषोत्तमदास, कस्तुरभाई, डॉ. मथाई, सर अरदेसर दलाल इ० अनेक उद्योग-श्रेष्ठी व अर्थपंडित हिच्या मागें आहेत. योजनेचे प्रवर्तक सर अरदेसर दलाल यांना हिंदुस्थान सरकारनें पुनर्घटना-खात्याचे सभासद नेमून एकपरीनें या योजनेस आपला पाठिंबाच दिला आहे. पंधरा वर्षांत हिन्दुस्तानचें माणशीं उत्पन्न दुप्पट व्हावें व प्रचंड प्रमाणावर उत्पादन वाढावें असा प्रवर्तकांचा हेतु आहे. या योजनेंत खाजगी मालकीला स्थायिकपणा दिला आहे, पण कांहीं बाबतींत सामुदायिक सहकार्यहि आदेशिलें आहे. भांडवलशाही ज्या तत्त्वांत अपेशी ठरली तीं न पत्करणें, उलट समाजवादाला जें साधत नाहीं तेंहि वगळणें हें "मुंबई योजने"चें सूत्र आहे. या योजनेसाठीं लागणारें हजार दीड हजार कोटी रुपयांचें भांडवल कसें उभारावें याचीहि

रूपरेषा प्रवर्तकांनीं दिली आहे. ही योजना यशस्वी व्हावी यासाठीं "राष्ट्रीय सरकार" स्थापलें जाणें अवश्य आहे असें प्रवर्तक आग्रहानें सांगतात. अर्थात् हें "राष्ट्रीय सरकार" अखंड हिंदुस्थानच्या पायावरच स्थापतां येणार आहे.

"लोक-योजना" (The Peoples' Plan) ही भाई एम. एन्. रॉय यांची योजना आहे. बॅ. तारकुंडे व प्रो. पारीख या तरुण विद्वानांनीं ही रचिली असली तरी तिचे निर्माते, दिग्दर्शक वगैरे सर्व कांहीं भाई रॉय हेच आहेत. या योजनेला 'लोकयोजना' म्हणण्यात "मुंबई-योजना" ही जनतेची नाहीं असें ध्वनित करण्याचा हेतु दिसतो. उत्पादन करण्यापेक्षां तें रचविण्याचें सामर्थ्य देशांत सार्वत्रिक कसें होईल आणि शेतीची भरभराट कशी साधेल हीं लोक-योजनेचीं महत्त्वाचीं अंगें आहेत. "राष्ट्रीय सरकार" हें आज देशांत लोकप्रिय झालेलें ध्येय "लोकयोजने"च्या निर्मात्यांना मान्य नाहीं ! ते म्हणतात "हें सरकार वरच्या वर्गांचेंच राहील आणि त्यायोगें बहुजन समाजाची स्थिति मुळींच सुधारणार नाहीं." म्हणून "राष्ट्रीय सरकारा" ऐवजीं "लोकांचें सरकार" ही शब्दसंहति लोकांनीं पत्करावी असा "लोक-योजना" कारांचा आग्रह आहे. पण "राष्ट्रीय सरकार" या कल्पनेनें तें स्थापण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या नरम गरम चळवळींचें ज्ञान लोकांना होतें. तसें 'लोकांचें सरकार" म्हटल्यानें होत नाहीं 'लोकयोजने"चे प्रवर्तक तर आज साम्राज्यवादी व भांडवलवादी सरकारचे पगारी सहकारी झालेले दिसतात. या सहकार्यांतून "लोकांचें सरकार" कसें जन्माला यावें ? विष पेरून अमृतरसाचीं फळें निघतील काय ? असे कुतर्क येतात. तथापि भाई एम्. एन्. रॉय याच्यासारखा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा प्रचारक "लोकयोजने"स लाभल्यानें तिचाहि विचार सर्वत्र चालू आहे.

यानंतर येते "गांधी-योजना." (The Gandhian Plan) वर्धा येथील कॉमर्स कॉलेजचे प्रिन्सिपल श्री रामनारायण अग्रवाल यांनीं या योजनेची,

बांधणी केली आहे. "राष्ट्रीय सरकार" या योजनेंत अंतर्भूत आहेच हें सांगणें नकोच. "गांधी-योजने"त गांधींजींच्या समाजविषयक व अर्थशास्त्रविषयक दृष्टिकोणाला प्राधान्य आहे. वरील दोन योजनांप्रमाणें ही योजना सर्वस्वीं यंत्रारूढ नाहीं. यंत्रें आणि संचय यांच्या वेडापासून ही अलिप्त आहे. उत्पादन व धन यांचें केंद्रीकरण न करतां तें खेडोपाडीं पद्धतशीर पसरून द्यायचें हें तत्त्व "गांधी-योजनें"त प्राणभूत म्हणतां येईल. अर्थव्यवस्था ही नीतिशास्त्रापासून विभक्त नसावी, 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' हें तत्त्व आचरिलें जावें, श्रमाचें सौंदर्य माणसांना कळावें, आणि प्रत्येक खेडें हें स्वयंपूर्ण व्हावें यावर "गांधी-योजने"चा सारा भर आहे. आपल्या देशाची प्रतिभा व परिस्थिति गांधी-योजनेनें विशेष लक्षांत घेतली आहे. ही योजना निश्चित स्वरूपांत व आधुनिक परिभाषेंत अग्रवाल महाशयांनीं आज पुढें मांडली असली तर यांतील तत्त्वाचा प्रचार आपल्या लोकोत्तर वाणीनें लेखणीनें व चारित्र्यानें गांधीजी आज अनेक वर्षे करीत आहेत.

"कुठलीही अर्थ योजना यशस्वी होण्यास लोकांचें सहकार्य व उत्साह प्रवर्तकांना मिळविता आला पाहिजे." असे माननीय उद्गार रिझर्व्ह बँकेचे विद्वान् गव्हर्नर सर चिंतामणी देशमुख यांनीं नुकतेच काढले. "लंडन टाईम्स"नें "मुंबई-योजने"वर लिहितांना याच सुमारास म्हटलें कीं, "हिंदुस्थानांत परंपरेचें अधिराज्य अजूनही आहे. देशांतील बहुजनसमाजावर ज्या लोकनेत्यांचें वजन आहे त्यांचा आशिर्वाद ज्या योजनेस मिळेल ती यशस्वी होईल. कारण या लोकनेत्यांचा शब्दच जनता प्रमाण मानणार." हीं दोन वचनें अत्यंत मार्गदर्शक होण्यासारखीं आहेत. वरील योजनांत पुढें फेरफार होतीलहि. पण त्यांतून यशस्वी होण्याची शक्यता कोणाला आहे या बाबतींत मात्र वरील दोन अवतरणांतलें सत्य अबाधितच राहील.

दोन वर्षांतल्या कांहीं महत्त्वाच्या घटनांचें हें धावतें समालोचन आहे. मागील व्याख्यानांत ज्या कांहीं संस्था व तत्त्वें आपण चर्चेस घेतलीं होतीं

रूपरेषा प्रवर्तकांनीं दिली आहे. ही योजना यशस्वी व्हावी यासाठीं "राष्ट्रीय सरकार" स्थापलें जाणें अवश्य आहे असें प्रवर्तक आग्रहानें सांगतात. अर्थात् हें "राष्ट्रीय सरकार" अखंड हिंदुस्थानच्या पायावरच स्थापता येणार आहे.

"लोक-योजना" (The Peoples' Plan) ही भाई एम्. एन्. रॉय यांची योजना आहे. बॅ. तारकुंडे व प्रो. पारीख या तरुण विद्वानांनीं ही रचिली असली तरी तिचे निर्माते, दिग्दर्शक वगैरे सर्व कांहीं भाई रॉय हेच आहेत. *या योजनेला 'लोकयोजना' म्हणण्यांत "मुंबई-योजना" ही जनतेची* नाहीं असें ध्वनित करण्याचा हेतु दिसतो. उत्पादन करण्यापेक्षां तें रचविण्याचें सामर्थ्य देशांत सार्वत्रिक कसें होईल आणि शेतीची भरभराट कशी साधेल हीं लोक-योजनेचीं महत्त्वाचीं अंगें आहेत. "राष्ट्रीय सरकार" हें आज देशांत लोकप्रिय झालेलें ध्येय "लोकयोजने"च्या निर्मात्यांना मान्य नाहीं ! ते म्हणतात "हें सरकार वरच्या वर्गाचेंच राहील आणि त्यायोगें बहुजन समाजाची स्थिति मुळींच सुधारणार नाहीं." म्हणून "राष्ट्रीय सरकारा" ऐवजीं "लोकांचें सरकार" ही शब्दसंहति लोकांनीं पत्करावी असा "लोक-योजना" कारांचा आग्रह आहे. पण "राष्ट्रीय सरकार" या कल्पनेनें तें स्थापण्यासाठीं कराव्या लागणाऱ्या नरम गरम चळवळींचें ज्ञान लोकांना होतें. तसें 'लोकांचें सरकार" म्हटल्यानें होत नाहीं. "लोकयोजने"चे प्रवर्तक तर आज साम्राज्यवादी व भांडवलवादी सरकारचे पगारी सहकारी झालेले दिसतात. या सहकार्यांतून "लोकाचें सरकार" कसें जन्माला यावें ? विष पेरून अमृतरसाचीं फळें निघतील काय ? असे कुतर्क येतात. तथापि भाई एम्. एन्. रॉय याच्यासारखा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा प्रचारक "लोकयोजने"स लाभल्यानें तिचाहि विचार सर्वत्र चालू आहे.

यानंतर येते "गांधी-योजना." (The Gandhian Plan) वर्धा येथील *कॉमर्स कॉलेजचे प्रिन्सिपल श्री रामनारायण अग्रवाल यांनीं या योजनेची*

बांधणी केली आहे. "राष्ट्रीय सरकार" या योजनेत अंतर्भूत आहेच हें सांगणें नकोच. "गांधी-योजने"त गांधीजींच्या समाजविषयक व अर्थशास्त्रविषयक दृष्टिकोणाला प्राधान्य आहे. वरील दोन योजनांप्रमाणें ही योजना सर्वस्वीं यंत्रारुढ नाहीं. यंत्रें आणि संचय यांच्या वेडापासून ही अलिप्त आहे. उत्पादन व धन यांचें केंद्रीकरण न करतां तें खेडोपाडीं पद्धतशीर पसरून द्यायचें हें तत्त्व "गांधी-योजने"त प्राणभूत म्हणतां येईल. अर्थव्यवस्था ही नीतिशास्त्रापासून विभक्त नसावी, 'साधी राहणी व उच्च विचारसरणी' हें तत्त्व आचरिलें जावें, श्रमाचें सौंदर्य माणसांना कळावें, आणि प्रत्येक खेडें हें स्वयंपूर्ण व्हावें यावर "गांधी-योजने"चा सारा भर आहे. आपल्या देशाची प्रतिभा व परिस्थिति गांधी-योजनेनें विशेष लक्षांत घेतली आहे. ही योजना निश्चित स्वरूपांत व आधुनिक परिभाषेंत अग्रवाल महाशयांनीं आज पुढें मांडली असली तर यांतील तत्त्वांचा प्रचार आपल्या लोकोत्तर वाणीनें लेखणीनें व चारित्र्यानें गांधीजी आज अनेक वर्षे करीत आहेत.

"कुठलीही अर्थ योजना यशस्वी होण्यास लोकांचें सहकार्य व उत्साह प्रवर्तकांना मिळवितां आला पाहिजे." असे माननीय उद्गार रिझर्व्ह बँकेचे विद्वान् गव्हर्नर सर चिंतामणी देशमुख यांनीं नुकतेच काढले. "लंडन टाईम्स"नें "मुंबई-योजने"वर लिहितांना याच सुमारास म्हटलें कीं, "हिंदुस्थानांत परंपरेचें अधिराज्य अजूनही आहे. देशांतील बहुजनसमाजावर ज्या लोकनेत्यांचें वजन आहे त्यांचा आशिर्वाद ज्या योजनेस मिळेल ती यशस्वी होईल. कारण या लोकनेत्यांचा शब्दच जनता प्रमाण मानणार." हीं दोन वचनें अत्यंत मार्गदर्शक होण्यासारखीं आहेत. वरील योजनांत पुढें फेरफार होतीलहि. पण त्यांतून यशस्वी होण्याची शक्यता कोणाला आहे या बाबतींत मात्र वरील दोन अवतरणांतलें सत्य अबाधितच राहील.

दोन वर्षांतल्या कांहीं महत्त्वाच्या घटनांचें हें धावतें समालोचन आहे. मागील व्याख्यानांत ज्या कांहीं संस्था व तत्त्वें आपण चर्चेस घेतलीं होतीं

त्यांतल्या कित्येकांचें ध्येयांतून व्यवहारांत रूपांतर झालेलें नाहीं. ' घटना समिति ' फेडरेशन ' इ० अजून ध्येयेंच आहेत. त्यांच्या विषयीं नवें काय सांगावयाचें ' अहिंसे 'चें महत्त्व गेल्या दोन वर्षात अधिकच पटलें आहे. विनाशाच हात सर्व जगावर क्रूरपणानें फिरत आहे. लाखो देशभक्त, निरपराधी मुलें व स्त्रिया यांची आहुति पडली ! प्रचंड प्रमाणावर चाललेल्या या यमसत्रात एखाद्या लोकोत्तर साधुपुरुषाचें निधन झालें म्हणजे सर्व जगाला आपल आप्त गेल्याचें दुःख होतें व सार्वत्रिक संहारानें होत असलेल्या वेदना अधिकच तीव्र होतात !! फ्रेंच तत्त्वज्ञ व साहित्यसूर्य रोमाँ रोलाँ याचा स्वर्गवास ही अशीच वैयक्तिक आपत्ति जगातल्या प्रत्येक सात्त्विक माणसाला वाटली प्रेम शांतीचा संदेश देणाऱ्या ख्रिश्चन धर्माचा ते एक महान् आदर्श होते. "जग सुखी झाल्याशिवाय मी स्वस्थ बसणार नाहीं " या श्रेष्ठ मानव धर्माचा आदेश त्यांनीं दिला. युद्धाचें प्रळयंकर तांडवनृत्य चालू असतांच जर आपण रोमाँ-रोलाँच्या आदेशाचा आठव ठेवला व तो यथाशक्ति आचरणात आणला तर उद्याचें अधिक सुखी व उन्नत जग निर्माण करणें आपणांस शक्य होईल. रोमाँ रोलाँ यांना सहस्र प्रमाण असोत !

॥ वंदे मातरम् ॥